

वीरशैव (लिंगी ब्राम्हण) यांचा परमोच्च्य व मूळ ग्रंथ

# श्री
# सिद्धांतशिखामणी

अर्थात



# वीरशैव नंदादीप

बसप्पा वारद







श्री

# सिद्धांतशिखामणी

अर्थात

# वीरशैव नंदादीप



गुरुभक्तशिरोमणी, महाचार्यसेवाचंद्र, रूद्रकौस्तुभमणी,
शिवतत्वविशारद, महाचार्यसेवाधुरिण, धर्मालंकार,
कविभूषण, समाजकार्यधुरंधर, धर्मरत्न

## बसप्पा वीरभद्रप्पा वारद

भुसार गल्ली, सोलापूर.
यांनी छापून प्रसिद्ध केले.

# आशीर्वाद :

श्री १००८ जगद्गुरू वीर रुद्रमुनी शिवाचार्य महास्वामींजी महाराज वीर सिंहासनाधीश्वर रंभापुरी, यांचा शुभाशीर्वाद.

महाचार्यसेवाचंद्र, गुरुभक्तशिरोमणी, शिवतत्वविशारद, धर्मरत्न इत्यादि अनेक गौरवपदविभूषित श्रीमान बसप्पा वीरभद्रप्पा धारव सोलापूर यांसी शुभाशीर्वाद परंपरा अस्तु.

आपले प्रार्थना पत्र पोहोंचले. 'श्री सिद्धांतशिखामणी' हा वीरशैवांचा संस्कृतमधील मूळ ग्रंथ 'वीरशैव नंदादीप' या सार्थ नांवाने व योग्य वेळी मुद्रण करून सर्वश्री १००८ जगद्गुरू पंचाचार्यांचे प्रत्यक्ष शुभाशीर्वाद घेऊन व त्यांच्याच अमृत हस्ते प्रकाशन करण्याचा महान सुयोग आपण घडवून आणला आहे हें अत्यंत महत्वाचें आहे. आपण कवी, साहित्यिक भाविक व धर्मज्ञानाभ्यासू असल्याच्या योगानें अनेक धर्मग्रंथ रत्नें मुद्रण करून त्यांच्या हजारो प्रती भाविकांना विनामूल्य वितरण करून वीरशैव समाजाला खऱ्या अर्थानें सन्मार्गाचें दर्शन करविलें हें वैशिष्ठ्य होय.

धार्मिक व सामाजिक अशा अनेक क्षेत्रात आपण वेळोवेळी केलेली अबोलव जिद्दी सेवा पाहून अभिमानाने मान उंचावते व प्रेमानें छाती भरून येते. आपला ६१ वा वाढदिवस समारंभ श्री १००८ जगद्गुरू रेणुकाचार्य यांच्या अध्यक्षतेखाली खास विविध कार्यक्रमांनी पार पडला. ही आपल्या समाजसेवेची फलश्रुतीच होय. यापुढें देखील आपल्या हातून असे अनेक ग्रंथ प्रसिद्ध करण्यास व अशीच अविरत धार्मिक व सामाजिक सेवाघडण्यास अघटित घटना पटीयान दयाघन श्रीमहादेव सर्व सामर्थ्य देवो आणि अशाच प्रकारे सर्वांगी सेवेतून आपला १०१ वा वाढदिवस सर्वश्री १००८ जगद्गुरू पंचाचार्यांच्या दिव्य नेतृत्वाखाली साजरा होवो हेंच आशिर्वचन आम्ही देत आहोत. समस्त सन्मंगलानि भवंतु.

इत्यनंत शिवाशिषः

# आशीर्वाद :

श्री १००८ जगद्गुरू सिद्धेश्वर शिवाचार्य महास्वामीजी महाराज
सद्धर्म सिंहासनाधीश्वर उज्जयनी यांचा शुभाशिर्वाद

गुरुभक्तशिरोमणी, महाचार्यसेवाधुरिण, शिवतत्वविशारद, कविभूषण, धर्मालंकार इत्यादि पदवीविभूषित श्रीमान् बसप्पा विरभद्रप्पा बारद सोलापूर यांसी:--

श्री सिद्धांतशिखामणी हा वीरशैवांचा मूळ ग्रंथ होय. हा ग्रंथ संस्कृतमध्यें आहे. याचे कानडी भाषांतर बरेच लोकाकडून वेळोवेळी झाले आहे. सध्याच्या परिस्थितीत मराठी भाषेतून या ग्रंथमुद्रणाचीं अत्यंत जरुरी भासत असल्यामुळे आपण त्याची पूर्तता केली हे प्रशंसनीय व अभिमानास्पद आहे. या ग्रंथमुद्रणाने आपण वीरशैव समाजावर महदुपकार केले आहेत. हा ग्रंथ मराठी भाषिक वीरशैवाना अत्यंत उपयुक्त ठरेल मूळ ग्रंथाधार व त्यातील खरा भावार्थ सोडून स्वतःचे लेखन चातुर्य त्यामध्यें घुसडण्याची बहुसंख्य लेखकांना संवय असते ते असे कांहीं न घडण्याचें जबरदस्त पथ्य लेखकाने पाळले आहे हे नमूद करणें जरुरीचे वाटते.

हे उत्तम कवि व साहित्यिक आहेत. यांनी अनेक भक्तीरसप्रधान काव्यसुमनें व धार्मिक साहित्य ग्रंथ यांच्या हजारों प्रती स्वखर्चांने मुद्रण करून जनता जगन्नाथाच्या करकमली विनामूल्य वाहिल्या आहेत हें भूषणास्पद असून इतराना अनुकरणीय आहे. यांचा स्वभाव सुविचारी, शांतबोल, धर्मकार्येजिद्दी असून भाविक व रुद्रप्रेमी आहेत. यानी धार्मिक व सामाजिक क्षेत्रांत सर्वतोपरि सेवा केली आहे अशीच सेवा यापुढे देखील यांचेकडून घडो व असे अनेक धार्मिक ग्रंथ यांच्या हातून प्रकाशन व्हावेत असे सामर्थ्य आयुरारोग्य भाग्य, सुख, संपत्ती श्री जगद्गुरू रेणुकादि पंचाचार्यांकडून यांना लाभो असे शुभाशिर्वचन देत आहोत.

युगमानोत्सव शुभदिन गुडी पाडवा
चैत्र शुद्ध प्रतिपदा दि. २४-३-७४

शिवाशिषः

# आशीर्वाद :

श्री १००८ जगद्‌गुरू शांतलिंग महाशिवाचार्य महास्वामीजी रावळसाहेब वैराग्यसिंहासनाधीश्वर हिमवत्‌केदार यांचेकडून शुभाशिर्वाद

रुद्रकौस्तुभमणी, कवीभूषण, शिवतत्वविशारद, धर्मालंकार आदि अनेक पदवीविभूषित श्री. बसप्पा वीरभद्रप्पा वारद सोलापूर यांसी–

आपले प्रार्थना पत्र पोहोचले. वीरशैव धर्माचा संस्कृत व कानडी-मध्ये असलेला परमोच्च व मूळ ग्रंथ "श्री सिद्धांतशिखामणि" हा "वीर-शैव नंदादीप' या सार्थ नांवाने मराठी भाषेत मुद्रण करून मराठी भाषिक वीरशैवांच्या वीरोचित विचाराला उजाळा देऊन वीरशैव नंदादीपाची ज्योत वीरशैवांच्या वीर हृदयांत अखंड तेवत ठेवण्याचे कार्य वीरभद्र तनयानी "बसप्पा वीरभद्रप्पा वारद" यांनी खऱ्या अर्थातून योग्य वेळी केले आहे. यांनी यापूर्वी अनेक भक्तिरसप्रधान काव्यांच्या व लेखन साहि-त्याच्या माळा सरस्वतीच्या गळ्यात घातल्या असून धार्मिक व सामाजिक क्षेत्रात बहुमोल सेवा केली आहे. त्याचप्रमाणें यांनी हें महान कार्य केले असून समस्त वीरशैवांच्या व मुमुक्षु लोकांच्या करकमली मुक्ति मार्ग-दर्शक महादीपच दिला आहे. गुरूच्या कृपेने व मातापिता यांच्या आशीर्वादानें यांच्यात व घरांतील समस्त मंडळीत आचार, विचार, शील व भाविकता निर्माण झाली आहे, यांनी आपल्या कुटुंबीय मंडळीतून अतिरुद्र ( १४६४१ आवर्तन ) पारायण व कोटीशिव पंचाक्षर महामंत्र जपपारायण केले आहे.

या ग्रंथकार्य रचनेस गुरूभक्ती हीच कारणीभूत होय. या ग्रंथ पारायणानेच सर्व निजभक्त सुखसंपत्‌समृद्ध होऊन मोक्षास गेले आहेत. म्हणून प्रत्येक वीरशैवांनी या ग्रंथाचें नित्य पारायण करून पुनीत होऊन जीवन सफल करून घ्यावे. श्री जगद्‌गुरू पंचाचार्य यांच्या व श्री केदार-नाथ यांच्या कृपेनें आपणांस व आपल्या समस्त वंशलतेस दीर्घायुरारोग्य लाभो व सदैव आपल्या हातून अशीच समाजसेवा घडो असा शुभाशीर्वाद देत आहोत.

इत्यनंत शिवाशिष:

जा. नं. ७६९२, ता. ४।३।७४

# आशीर्वाद :

श्री १००८ जगद्गुरू वागीश पंडिताराध्य शिवाचार्य महास्वामीजी
सूर्य सिंहासनाधीश्वर श्रीशैल यांचा शुभाशीर्वाद

समाजकार्यधुरंधर, कवीभूषण, महाचार्यसेवाधुरीण, धर्मरत्न आदि पदवीविभूषित **श्रीमान् बसप्पाअण्णा वारद** सोलापूर इनको शुभाशी: परंपरा अस्तु

आपका ता. १४-३-१९७४ का विज्ञापना पत्र मिला। साथ "श्री सिद्धांतशिखामणी अर्थात वीरशैव नंदादीप" मराठी मुद्रित ग्रंथभी आकर पहुंचा, इस समय जो अत्यावश्यक था वही ग्रंथ आपके गुरुभक्तीसे भरा हुआ अंत:करणसे मराठीमें सार्थ नामाभिधानसे योग्य अवसर पर तयार हो गया। अत्यंत प्रसशंनीय कार्य किये है। सोलापूर वारद ग्रंथ-मालामे पहले 'सिद्धांतशिखामणि' प्रकट हुआ। उस ग्रंथसे वीरशैव मतके बारेमें बहुतही उपकार हुआ। बाद सिद्धांतशिखामणी सूर्य सिंहासन पीठनें और कर्नाटकमें अनेक लेखकोंने कन्नडमें प्रकट करवाया। उसे वीरशैवोंको धर्मज्ञानी होनेके लिए बहूतही सहाय्य किया। यहाँ ध्यान देनेकी बात यह है की प्रत्येक भक्त अपनी योग्य इष्टसिद्धि पूर्तीके लिए इस ग्रंथमें उल्लेखित विशिष्ठ मंत्रोंको जपकर इहपर सुख प्राप्त कर लेना।

श्री सिद्धांतशिखामणी अर्थात वीरशैव नंदादीप ग्रंथ सर्व स्वरूपसे प्रकट होकर सर्व महाराष्ट्र वीरशैवोंको परमावश्यक समादरणीय पर-मोपकारी ग्रंथ सिद्ध हो गया और सर्व मान्यताको यह ग्रंथ प्राप्त करेंगा इसमें बिलकुल संदेह नहीं। आप स्वयं कवी, साहित्यिक और धर्मज्ञानी रहनेके वजहसे समयानुकूल, सर्वादरणीय ग्रंथोंका हमेशा प्रकाशन करते रहते हैं, इससे हमको बहुत संतोष होता रहता है।

धार्मिक तथा सामाजिक सेवा सदैव करनेमें तथा आगे काव्य और साहित्य रचनामें आपको भगवान मल्लिकार्जूनजी सर्वसामर्थ्य प्रदान करे। आपको तथा आपके वंशलताको दीर्घायुरारोग्य श्रीं जगद्गुरू पंचाचार्यजी प्रदान करे यही हमारा आशीर्वचन है।

इत्यनंत शिवाशिष:

युगमानोत्सवदिन — चैत्र शुद्ध प्रतिपदा १८९६
गुडी पाडवा — दि. २४-३-१९७४

## आशीर्वाद :

परमपूज्य ज्ञान सिंहासनाधीश्वर श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामी श्रीक्षेत्र काशी यांचेकडून आशिर्वचन.

वीरशैवमत हे वेद आगम उपनिषत् प्रतिपादित असून शैवधर्मामध्ये " सिद्धांतमत " म्हणून प्रसिद्ध आहे.

या वीरशैव सिद्धांतास शक्ति विशिष्टाद्वैत विशेषाद्वैत-भेदाभेद शिवाद्वैत व सिद्धांत मत या अनेक नांवाने ओळखले जात आहे.

।। यदा यदा ही धर्मस्य ग्लानिर्भवति भूतलें ।।
।। तदा तदावतारो यं गणेशानां महेश्वरि ।।

या शिवागमोक्तिप्रमाणें सृष्टिचें आरंभापासून आजपर्यंत प्रत्येक युगामध्यें जगद्गुरू रेणुकादि पंचाचार्यांनी पंच जोतीलिंगातून योगसिद्धी म्हणजेच अणिमादि अष्ट सिद्धीच्या प्रभावानें अवतार घेऊन या पवित्र वीरशैव सिद्धांताची स्थापना करून वेळोवेळी या सिद्धांताचा उद्धार आणि प्रचारहि केला आहे.

वीरशैव मत अनादिकालापासून आजतागायत समृद्ध व शक्तिशाली असा आहे. याला श्री जगद्गुरू पंचाचार्यांची कृपादृष्टिच मूलत: कारण आहे.

आद्य जगद्गुरु पंचाचार्यांमध्ये जगद्गुरू रेणुकाचार्य हे अग्रेसर आहेंत. त्यांच्या ठिकाणी असलेली दिव्य शक्ति, अलौकिक कार्यकुशलता व अगाध व्यक्तिमत्व वर्णातीत आहे. म्हणूनच निरंजन गणाधीश्वर परंपरेत सुप्रसिद्ध येडेयूर ( तूमकूर जिल्ह्यातील ) श्री सिद्धलिंग शिवयोगी धर्मप्रचार करत, करत कोल्हापूर भागामध्ये आले असतांना अनेक कुटिल सिद्ध-मंत्रवादी लोकांबरोबर वादविवाद केला. त्यावेळी श्री सिद्धलिंगेश्वर शिवयोगी यांनी प्रतिपक्षीय मंत्रवादी लोकांना प्रतिवाद करतांना स्पष्ट केलें आहे कीं,–

" परमगुरू रेवणसिद्ध यतिराय गुरु ।
तर हर्षदिदे कोल्हापुरक्कैतरलु ।। "

कोल्हापूरमध्यें गोरक्षनाथान्नें निवासस्थानी जाऊन भिक्षा मागत असताना–

कुटिलसिद्धरुगळेंदेंदल्लणगे भिक्षवति ।
पटुतर पराक्रमिगे भिक्ष निजलिंगसंघटितंगे भिक्ष ।
नवनाथ सिद्धगुरूगळधिनाथंगे भिक्षभिक्षा ।
चटुलतरनेनिप कोल्हापूर दोळिह सिद्ध ।
रटमट के सिल्क दातगे भिक्षजननि युरु ।।
जठरदोळ बारदातगें भिक्षानिटिल नेलगें भिक्षवेंदेनुतिरे ।। १४ ।।

विरक्त तोंटदार्य विरचित सिद्धेश्वर महापुराण पांचव्या संधिमध्यें पद्य १३ ते १८ पर्यंत आलेला हा विषय म्हणजेच पूर्वी जगद्गुरू रेणुकाचार्यांनी केलेला गोरक्ष गर्व भंगाचा विषय, अत्यंत आदरपूर्वक केलेला ऐतिहासिक विषय म्हणून आढळत आहे तसेंच येडेयूर श्री सिद्ध-लिंगेश्वर यांनी सांगितले आहे कि--

आदियल्लि शिवतत्वदल्लि रेणुकनुदयनागदिर्दोडे ।
ईल्लि शिवलिंगदल्लि उदयवाद परियेंतो आशिवनल्लिये हुट्टि
शिवनल्लिये लयवाद रेवणसिद्धेश्वरनु ।।
आदिमुक्त नल्ला अवांतर मुक्त रेंब अज्ञानि गळिगे
नायक नरक तप्पदु ।। ( षटस्थल ज्ञानसारामृत आदिलिंगोद्भव स्थळ ६१ वचन )

असे अनेक ऐतिहासिक महत्वाचे विषय मिळत आहेत. इ. स १०७२ मध्यें उदयास आलेले श्रीकर भाष्यकर्ते श्रीपति पंडित यांनीही आपल्या भाष्यांत 'सिद्धांतशिखामणी' ग्रंथास प्रामाणिक ग्रंथ म्हणून अनेकदा उल्लेख केलेला आहे.

वीरशैव सिद्धांत वेदागमोपनिषत् प्रतिपादित असतांहि शिवागमाचा प्रभाव अधिकाधिक पडल्यामुळें शिवागम प्रतिपादित असें म्हणतां येईल-दुर्देवाने आगम ग्रंथ संपूर्ण उपलब्ध नाहीं. त्यामुळे मतसिद्धांत स्वरूप जाणून घेण्यास फारच कठीण झालें आहे. उपलब्ध असलेले शिवागमेतर ग्रंथांमध्यें अत्यंत प्राचीन ग्रंथ म्हणजे श्री रेणुकाचार्य आणि अगस्त्य महर्षि यांच्यामध्ये झालेला संवादरूपी विषय म्हणजेच 'सिद्धांतशिखा-मणी' ग्रंथ एकच असा आहे.

हा ग्रंथ म्हणजे सर्व शिवागमांचा सार गर्भितच आहे. या ग्रंथामध्यें मोक्ष स्वरूपाचें निरूपण केले आहे. साधकांना ( मुमुक्षु ) अत्यावश्यक असलेला आचाररूपी साधनमार्ग (आचारधर्म) अंगस्थलापासून ते ऐक्य स्थळापर्यंत एकशेंएक स्थळापर्यंत सविस्तररित्या म्हणजे लिंगांगसामरस्य ( शिवजीवैक्य ) तत्वज्ञानाचा विषय.

सर्व दार्शनिक ग्रंथामध्यें सांगितला आहे. परंतु शक्ति विशिष्टाद्वैत सिद्धांताचे वैशिष्टच एक निराळेंच आहे. कारण चेतना चेतन विशिष्ट, अखंड सच्चिदानंद परात्पर शिवलिंगरूपी परमात्म्याचें प्रतिपादन करित ।। लिंगामध्ये जगत सर्वं ।। या शिवागम वाक्यानुसार विश्वांतील कोणतीहि वस्तु लिंगा (परशिव ब्रम्ह) पासून भिन्न नाहीं. सर्व चराचरात्मक विश्व लिंगरूपी परमात्माच आहे. असें प्रतिपादन केलें आहे. म्हणूनच ।। न वीरशैव सदृशं मतमस्ति जगत्त्रये ।। या पारमेश्वरागमाच्या उक्तिप्रमाणें वीरशैव सिद्धांत सर्व मतामध्यें अत्यंत श्रेष्ठ आहे. सर्वोत्तम वीरशैव मत प्रतिपादन करणारा सर्वोत्कृष्ट हा 'सिद्धांत शिखामणि' ग्रंथ महाराष्ट्रांतील समाज बांधवांना उपयुक्त व्हावा या सदुद्देशानें श्री. बसप्पा वारद यांनी मराठी भाषेंत मुद्रण केला आहे म्हणून आम्हांस हार्दिक संतोष होत आहे.

यापूर्वि सोलापूरचे समाज रत्न, धर्मभूषण शिवैक्य रा. ब. मल्लप्पा बसप्पा तथा अप्पासाहेब वारद यांनीही सिद्धांतशिखामणि ग्रंथ मराठी भाषेंत प्रसिद्ध करून महत्वाचें असें समाज सेवेचें अनमोल कार्य केलें होते.

गुरुभक्त शिरोमणी, महाचार्यसेवाधुरीण, शिवतत्वविशारद, कविभूषण, समाजकार्य धुरंधर, धर्मरत्नादि गौरव पद-विभुषि श्रीमान बसप्पा विरभद्रप्पा वारद, सोलापूर यांनी आपला व्यापार उद्योग सांभाळून आज पर्यंत अनेक भक्तिरसप्रधान काव्य व धार्मिक ग्रंथ लिहून स्वखर्चानें छापून त्यांच्या हजारो प्रती विनामूल्य वितरण केल्या आहेत हे वैशिष्टच होय. हे अत्यंत भाविक, प्रेमळ, रुद्रभिषेकप्रेमी असून सत्कार्य घडवून आणणारे अबोल असे जिद्दी प्रयत्नवादी आहेत. आतापर्यंतच्या धार्मिक व सामाजिक क्षेत्रांत यांचा सिंहाचा वाटा आहे.

कुटिलसिद्धरुगळेंदेंदल्लणगे भिक्षवति ।
पटुतर पराक्रमिगे भिक्ष निजलिंगसंघटितंगे भिक्ष ।
नवनाथ सिद्धगुरूगळधिनाथंगे भिक्षभिक्षा ।
चटुलतरनेनिप कोल्हापूर दोळिह सिद्ध ।
रटमट के सिल्क दातगे भिक्षजननि युरु ।।
जठरदोळ बारदातगें भिक्षानिटिल नेलगें भिक्षवेंदेनुतिरे ।। १४ ।।

विरक्त तोंटदार्य विरचित सिद्धेश्वर महापुराण पांचव्या संधिमध्यें पद्य १३ ते १८ पर्यंत आलेला हा विषय म्हणजेच पूर्वी जगद्गुरू रेणुकाचार्यांनी केलेला गोरक्ष गर्व भंगाचा विषय, अत्यंत आदरपूर्वक केलेला ऐतिहासिक विषय म्हणून आढळत आहे तसेंच येडेयूर श्री सिद्ध-लिंगेश्वर यांनी सांगितले आहे कि—

आदियल्लि शिवतत्वदल्लि रेणुकनुदयनागदिर्दोडे ।
ईल्लि शिवलिंगदल्लि उदयवाद परियेंतो आशिवनल्लिये हुट्टि
शिवनल्लिये लयवाद रेवणसिद्धेश्वरनु ।।
आदिमुक्त नल्ला अवांतर मुक्त रेंब अज्ञानि गळिगे
नायक नरक तप्पदु ।। ( षटस्थल ज्ञानसारामृत आदिलिंगोद्भव स्थळ ६१ वचन )

असे अनेक ऐतिहासिक महत्वाचे विषय मिळत आहेत. इ. सं १०७२ मध्यें उदयास आलेले श्रीकर भाष्यकर्ते श्रीपति पंडित यांनीही आपल्या भाष्यांत ‘ सिद्धांतशिखामणी ’ ग्रंथास प्रामाणिक ग्रंथ म्हणून अनेकदा उल्लेख केलेला आहे.

वीरशैव सिद्धांत वेदागमोपनिषत् प्रतिपादित असतांहि शिवागमाचा प्रभाव अधिकाधिक पडल्यामुळें शिवागम प्रतिपादित असें म्हणतां येईल. दुर्दैवाने आगम ग्रंथ संपूर्ण उपलब्ध नाहीं. त्यामुळे मतसिद्धांत स्वरूप जाणून घेण्यास फारच कठीण झालें आहे. उपलब्ध असलेले शिवागमेतर ग्रंथांमध्यें अत्यंत प्राचीन ग्रंथ म्हणजे श्री रेणुकाचार्य आणि अगस्त्य महर्षि यांच्यामध्ये झालेला संवादरूपी विषय म्हणजेच ‘ सिद्धांतशिखा-मणी ’ ग्रंथ एकच असा आहे.

हा ग्रंथ म्हणजे सर्व शिवागमांचा सार गर्भितच आहे. या ग्रंथामध्यें मोक्ष स्वरूपाचें निरूपण केले आहे. साधकांना ( मुमुक्षु ) अत्यावश्यक असलेला आचाररूपी साधनमार्ग (आचारधर्म) अंगस्थलापासून ते ऐक्य स्थळापर्यंत एकशेंएक स्थळापर्यंत सविस्तररित्या म्हणजे लिंगांगसामरस्य ( शिवजीवैक्य ) तत्वज्ञानाचा विषय.

सर्व दार्शनिक ग्रंथामध्यें सांगितला आहे. परतु शक्ति विशिष्टाद्वैत सिद्धांताचे वैशिष्टच एक निराळेंच आहे. कारण चेतना चेतन विशिष्ट, अखंड सच्चिदानंद परात्पर शिवलिंगरूपी परमात्म्याचें प्रतिपादन करित ।। लिंगामध्ये जगत सर्वं ।। या शिवागम वाक्यानुसार विश्वांतील कोणतीहि वस्तु लिंगा (परशिव ब्रम्ह) पासून भिन्न नाहीं. सर्व चराचरात्मक विश्व लिंगरूपी परमात्माच आहे. असें प्रतिपादन केलें आहे. म्हणूनच ।। न वीरशैव सदृशं मतमस्ति जगत्त्रये ।। या पारमेश्वरागमाच्या उक्तिप्रमाणें वीरशैव सिद्धांत सर्व मतामध्यें अत्यंत श्रेष्ठ आहे. सर्वोत्तम वीरशैव मत प्रतिपादन करणारा सर्वोत्कृष्ट हा 'सिद्धांत शिखामणि' ग्रंथ महाराष्ट्रांतील समाज बांधवांना उपयुक्त व्हावा या सदुद्देशानें श्री. बसप्पा वारद यांनी मराठी भाषेंत मुद्रण केला आहे म्हणून आम्हांस हार्दिक संतोष होत आहे.

यापूर्वि सोलापूरचे समाज रत्न, धर्मभूषण शिवैक्य रा. ब. मल्लप्पा बसप्पा तथा अप्पासाहेब वारद यांनीही सिद्धांतशिखामणि ग्रंथ मराठी भाषेंत प्रसिद्ध करून महत्वाचें असें समाज सेवेचें अनमोल कार्य केलें होते.

गुरुभक्त शिरोमणी, महाचार्यसेवाधुरीण, शिवतत्वविशारद, कविभूषण, समाजकार्य धुरंधर, धर्मरत्नादि गौरव पद-विभुषि श्रीमान बसप्पा विरभद्रप्पा वारद, सोलापूर यांनी आपला व्यापार उद्योग सांभाळून आज पर्यंत अनेक भक्तिरसप्रधान काव्य व धार्मिक ग्रंथ लिहून स्वखर्चानें छापून त्यांच्या हजारो प्रती विनामूल्य वितरण केल्या आहेत हे वैंशिष्टच होय. हे अत्यंत भाविक, प्रेमळ, रुद्रभिषेंकप्रेमी असून सत्कार्य घडवून आणणारे अबोल असे जिद्दी प्रयत्नवादी आहेत. आतापर्यंतच्या धार्मिक व सामाजिक क्षेत्रांत यांचा सिंहाचा वाटा आहे.

सध्या शिवजीवैक्य तत्वज्ञानाचे अमूल्य ग्रंथरत्न सिद्धांतशिखामणी ग्रंथाचें मुद्रण करून १०–४–१९७४ रोजी माळकवठा येथे श्री जगद्गुरू पंचपीठाधीश्वरांचे पवित्र हस्ते प्रकाशन करण्याचें श्रीमान बसप्पाअण्णा वारद यांनीं ठरविले आहे. या ग्रंथ प्रकाशनामुळे समाज व मुमुक्षु लोकावर महद् उपकार केले आहेत. शिवयोगी शिवाचार्य यांनीं या ग्रंथाचा समारोप करतांना सांगितल्याप्रमाणें " श्री सिद्धांतशिखामणीं लिखति लेखयत्यादरात्। श्रोता श्रावयिता स याति विमलाम् भुक्ति मुक्ति च परां" या उक्तिप्रमाणें **श्रीमान बसप्पाअण्णा वारद** सोलापूर यांना व त्यांचे कुटुंबीय लोकांना दीर्घायुरारोग्य लाभो व इहपर सुख समृध्दि होवो म्हणून हार्दिक शुभाशिर्वाद देत आहोत.

शिवम् भूयात् इत्याशिषः

दिनांक २०–२–१९७४

महाशिवरात्री जंगमवाडी मठ
श्रीक्षेत्र काशी, वाराणशी.

## — प्रकाशकाचे दोन शब्द —

मानवी जीवनाची स्थित्यंतरे धार्मिक, आर्थिक, सांस्कृतिक, सामाजिक अशा निरनिराळ्या क्षेत्रांतून हजारों वर्षापासून होत आली असून अनेक उलाढाली झाल्या आहेत. आधुनिक काळांत जीवन गतीमान होऊन धकाधकीचे झाले आहे. धर्मतत्वचिंतन करून त्याप्रमाणें आचरण करणें अत्यंत कठीण व दुराप्रास्त होत आहे. कालीकलमानास अनुसरून वीरशैव (लिंगी ब्राम्हण) धर्मास आलेली ग्लानी अर्थात धर्मावरील अशुद्ध वातावरण व परिस्थिती खरोखर मोठी शोचनीय गोष्ट आहे. आपल्या धर्मातील आचार्य, उपाचार्य, वैदिक, शास्त्री यांनी शिष्यवर्गाला व भक्तांना आपापल्या परीनें अध्ययन, व्याख्यान, कीर्तन, प्रवचन, उपदेश वगैरे उपायांनी प्रथम संघटित करून नंतर ज्ञानदानाचें बोधामृत पाजवून धर्मजागृती करावी.

वीरशैव प्रतिष्ठितांनी व संपन्न अशा धर्माभिमानी लोकांनी कानाकोपऱ्यांत पडून राहिलेलें आपले दुर्मिळ ग्रंथ बाहेर काढून त्यांचे सोप्या व ललितरम्य भाषेंत लेखन करवून व प्रसंगी भाषातर करवून, छापून प्रसिद्ध करावीत. नास्तिकत्वाचे पाखंड माजवलेल्या व धर्माचरणावर विश्वास न ठेवणाऱ्या आजच्या या सुधारलेल्या व पुढारलेल्या जगात धर्मग्रंथ मुद्रण करून त्याचा प्रचार सर्व थरांतील लोकापर्यंत पोचवून त्याचे दैनंदिन कार्य आचरणात म्हणजे प्रत्यक्ष उपयोगात आणणें याशिवाय तरणोपाय नाहीं.

धार्मिक कार्यांत व त्यांच्या शास्त्रशुद्ध ग्रंथादि वैचारिक बैठकीत आस्थेने लक्ष घालून त्या दृष्टीने सेवा कार्यं घडत गेले व नित्याच्या आचरणात त्याचा उपयोग केला गेला तर आत्मिक शांतीबरोबरच सर्वथैव सुखशांती लाभते. म्हणून धार्मिक आचार विचार व धर्मग्रथ वाचन श्रवण तसेंच मनन हे प्राणीमात्राचे कल्याण करतात. सुधारलेल्या राष्ट्रातूनही हल्ली आध्यात्मिकदृष्टचा आस्था निर्माण होत असून धार्मिक भावनेला अर्थात श्रद्धेला औत्सुक्यतेने सुरूवात झाली आहे ही फार महत्वाची गोष्ट आहे. व्यक्तींच्या जीवनाचे मांगल्य हें त्याच्या पवित्रतम धार्मिक आचार विचारावर अवलंबून आहे हे विसरून चालणार नाही. धार्मिक विचाराचें अधिष्ठान हें महान् पवित्रतम तसेंच मूलग्राही आहे म्हणून ते कसे बळकट होईल त्याचा जेवढा आपल्या दृष्टीनें आचरणात उपयोग करून घेता येईल तेवढा करून घेतला पाहिजे आणि एवढ्याच

करता धर्मग्रंथाची व त्यांच्या श्रेष्ठत्वाची महती आपण जाणली पाहिजे, तसेच असे धर्मग्रथ नित्य वाचण्याची व त्याचा प्रचार करण्याची ईर्षा आपण बाळगली पाहिजे.

आमचा हा धर्मग्रंथ प्रसिद्ध करण्यामागील मूळतः हेतूच हा आहे कीं, धर्माचरण हे सदाचाराला स्फूर्ति देते व आपल्या सुखशांतीबरोबर इतरांनाही त्याचा योग्य लाभ घडतो. विचार व आचार हे फारच महत्वाचे प्रश्न आहेत. विचाराला गती धर्मग्रंथ देतात पण आचाराला गती देण्याचें कार्य मात्र ज्यांनी त्यांनी केले पाहिजे ही फार महत्वपूर्ण अशी समस्या आहे. केवळ विचाराला महत्व नसून आचाराला महत्व आहे आणि म्हणूनच धर्मग्रंथांचे नित्य वाचन पठण हे घडत गेल्याने आचारात मोलाची भर पडते व जीवन सुखसमृद्धीमय होते. तेव्हां प्रत्येकांनी धर्मग्रंथ हे पूज्य मानून आपल्यापरीने सदाचारयुक्त वागण्याचा प्रयत्न करावा व आपले कल्याण करून घ्यावे हीच आमची उत्कट इच्छा व प्रेरणा आहे. याच सद्हेतुने धर्मभूषण रा. ब. मल्लप्पा बसप्पा वारद यांनी यापूर्वी अनेक धर्मग्रंथ मुद्रण करून वीरशैव समाजावर महान् उपकार केले आहेत, ग्रंथकामी वे. मू पं. अल्लमप्रभु शास्त्री हिरेमठ याचे सहकार्य लाभले आहे.

श्री सिद्धांतशिखामणी हा वीरशैव धर्माचा (नूतन मुद्रित मराठी) मूळ ग्रंथ श्रीमद् जगद्गुरू पंचाचार्य महास्वामीजी यांच्या मंगल आशीर्वादाने भारलेला असून त्यांच्याच अमृतहस्ते प्रकाशन होणारा मराठी भाषेंतील हा पहिलाच ग्रंथ आहे ही गोष्ट मोठ्या आनंदाने व अभिमानाने येथें नमूद केल्याशिवाय राहवत नाहीं. आतापावेतो भजनसंग्रह, काव्यकुसुमांजली, भक्तीगीतबोधिनी, रतन, पुण्यसंग्रह, रुद्रार्थदीप, नंदीध्वजदीप, शिवपूजादीप. वीरशैवधर्मकार्य दीप शिवानंददीप अशी पुस्तके अर्थात भावसुमने प्रत्येकी एक हजार मुद्रित प्रती म्हणजे एकूण दहा हजार प्रती भाविकांच्या करकमली विनामूल्य वाहून जनसेवा केली आहे श्री सिद्धांतशिखामणी अर्थात वीरशैव नंदादीप ग्रंथ प्रसिद्ध करण्याची बहु दिवसापासून मनात ठाव धरून बसलेलीं सद्इच्छा पूर्ण केली व त्यायोगे मी कृत कृत झालो अशी माझी विचारधारा आहे. हा ग्रंथ अति अल्प अवधीत मुद्रण केला त्यायोगे काही न्यूनाधिक अगर मुद्रणदोष असल्यास भावज्ञ व गुणज्ञ वाचक गोडच करून घेतील. या नंदादीपाच्या दिव्य ज्योतीचे महान् तेज प्रत्येक भाविकाच्या हृदयांत अखंड तेवत राहील असा विश्वास आहे. सर्वांना सादर वंदे. — बसप्पा वारद

वीरशैव ( लिंगी ब्राम्हण ) यांचा परमोच्च्य व मूळ ग्रंथ

# श्री

# सिद्धांतशिखामणी

अर्थात

# वीरशैव नंदादीप

## = दीप १ ला =

श्रीस्वामी सोमेश्वर ह्याचा जय असो, त्याचें चंद्रासारखें तेज आहे, हा श्रेष्ठ शिव आहे, ह्याचें तार रूप आहे, निर्मल ब्रह्मरंध्रांत असणाऱ्या पांढऱ्या कमलाप्रमाणें सुशोभित कमलाचे तीन कोपरे असणाऱ्या, इच्छा ज्ञान आणि क्रिया नांवाच्या, तीन प्रकारच्या लिपि असणाऱ्या ह् क्ष ल हे वर्ण पुढें मागें असणाऱ्या परिपूर्ण मुख्य बिंदूमध्यें तो रहातो ? चित् आणि अचित् ह्या दोहोंचा तो उदय करणारा असून दृष्टि आणि क्रिया हे त्याचे दोन बळकट पाय आहेन, हा सिद्धांतशिखामणिग्रंथ अनेक प्रकारच्या सिद्धांतशास्त्रांच्या ग्रंथांत श्रेष्ठ आहे, ह्यास कोणताही दोष नाहीं. ह्यांत वीरशैवांच्या मतांचा निर्णय केलेला असून ह्यांत एकशें एक स्थलांचें वर्णन आहे. ह्यांत रेणुकाचें आणि अगस्त्याचे संभाषण आहे. हा सिद्धांतशिखामणिग्रंथ वेद आणि शिवागम ह्यांस संमत आहे, त्याचा अर्थ फार खोल आहे, तो शिवयोगीश्वरानें सुलभ रीतीनें कळेल असा केला –

त्रैलोक्यांतील संपत्तिरूप चित्र काढण्याची मूर्तिमंत भित, अशा सच्चिदानंदस्वरूप शिवपरब्रह्मांला नमस्कार असो.

वेदान्ती लोक ज्याला ब्रह्म असें नांव देण्यास योग्य आहे असें मानतात व जो सर्व जगांचें मूलकारण आहे अशा त्या श्रेष्ठ शिवाला नमस्कार असो.

शंकर हा चैतन्यमहासमुद्र आहे, छत्तीस तत्वांचा समुदाय हा त्या चैतन्यसमुद्राच्या लाटांवरील बुडबुड्यांचा आभास आहे, व तो निर्मल आहे, त्या शंकराला माझा नमस्कार असो.

ज्या शंकराच्या तेजानें सर्व विश्व प्रकाशित होतें, ज्या शंकराच्या सुखानें सर्व जग सुखी असतें, तो शंकर अमर्याद ऐश्वर्यवान् आहे, व परमेश्वर आहे, त्याला माझा नमस्कार असो.

सदाशिवाच्या मुखांतील सर्व तत्वांचा विस्तार करणाऱ्या, निर्दोष स्वभाव असणाऱ्या त्या शांतस्वभावाच्या शंभोला नमस्कार असो.

ज्यानें आपल्या इच्छेनें शरीर धारण केलें आहे, जो आपल्या इच्छेप्रमाणें वर्तन करितो, ज्यानें आपल्या इच्छेनें त्रैलोक्य निर्माण केलें आहे. त्या पार्वतीसह असणाऱ्या शिवास नमस्कार असो.

ज्याला स्वाभाविक व अनुपमेय असा ईश्वर हा शब्द योग्य रीतीनें लागू पडतो, त्या शूल धारण करणाऱ्या, सर्व देवांच्या देवाला, महादेवाला नमस्कार असो.

शास्त्र जाणते लोक जिला सर्व लोकांची प्रकृति असे ह्मणतात त्या शंकराच्या पत्नीला श्रेष्ठ पार्वतीला मी नमस्कार करितों.

जिच्यामुळें त्रैलोक्यपति शंकर देहधारी बनला, त्या मायास्वरूप श्रेष्ठशक्ति पार्वतीला नमस्कार असो.

ज्याप्रमाणें वस्त्र अगोदर उत्पन्न झाले किंवा वस्त्रांतील पांढरेपणा अगोदर उत्पन्न झाला हें सांगतां येत नाहीं, त्याप्रमाणेंच शिव अगोदर उत्पन्न झाला किंवा पार्वती अगोदर उत्पन्न झाली, ह्याचा निश्चय करितां येत नाहीं अशो, जी पार्वती परकुंडलिनी आदिकरून सात शक्तींहून श्रेष्ठ आहे, सर्व जगाची माता आहे व कल्याणकारक आहे, तिला हा नमस्कार असो.

इच्छा ज्ञान वगैरे रूपांनीं जी शंकराची विश्व निर्माण करण्याचे कामांत बरोबरी करिते, व अतिशय आनंद आणि ज्ञान ह्यांची जी मूर्ति आहे अशा पार्वतीला नमस्कार असो.

मोक्षप्राप्ति आपणास व्हावी, अशी इच्छा करणाऱ्यास जी पार्वती चांगली विद्या शिकविते, ( देते, ) त्या महादेवाच्या स्त्रियेला ( पार्वतीला ) मी नेहमीं नमस्कार करितों

आचारामुळें सिद्धपणा पावलेल्या शिवयोग्यांचा प्रमुख कोणी शिवयोगी नांवाचा प्रसिद्ध विद्वान् होता, तो शिवज्ञानाचा समुद्रच होता.

त्या शिवयोग्याची वाचा शिवभक्तिरूप अमृतसमुद्रास भरतीं आणणारें. स्वच्छ चांदणेंच होतें, व त्यामुळें सर्व पृथ्वीस बहुधा संतोष होत होता.

त्याच्या वंशांत मोत्यांप्रमाणें स्वच्छ असा मुद्दव नांवाचा आचार्य जन्मला, तो सर्व शिवयोग्यांत श्रेष्ठ होता.

त्या मुद्ददेवाला "मुद्ददेव" असें नांव पडण्याचें कारण, तो आपणास शरण आलेल्या सर्व प्राणिमात्रांस संतोष देत होता, त्यामुळेंच "मुद्ददेव" संतोष देणारा, असें नांव जगांत प्रसिद्ध झालें.

मुद्ददेवाचा मुलगा सिद्धनाथ नांवाचा शांत आणि पवित्र आचरण करणारा होता; तो शिवसिद्धान्ताचा निर्णय करणारा असून शिवमती होता, व केवळ शिवस्वरूपच होता.

श्रेष्ठ लोक हा सिद्धनाथ वीरशैवांचा मुकुटमणि आहे, उत्तम प्रकाराच्या आचाराची मूर्तिमंत संपत्ति आहे, व शिवज्ञानाचा महासमुद्र आहे, अशी प्रशंसा करीत असत.

सज्जनांस आचार शिकविणारी माता अशी शिवभक्ति ज्या सिद्धनाथाच्या कुळांत उत्पन्न झाली होती ( सिद्धनाथाचा वंश मोठा शिवभक्त होता. ) ह्मणून त्या सिद्धनाथाच्या अंगांत शिवभक्ति निश्चळपणानें राहिली.

त्या सिद्धनाथ वीरशैवाचार्य मुकुटमणिचा मुलगा शिवयोगी नावांचा होता, समुद्रास जसा चंद्र मुलगा सुख देतो, तसाच तो बापास सुख देणारा होता.

चिदानंदरूप व ब्रह्मरूप अशा शिवाचा अनुभव आल्यामुळें त्याचें शिवयोगी असें नांव अगदी रास्त होतें.

शिवागमाचें ज्ञान परिपूर्ण दशेला आल्यामुळें सुगंधित झालेल्या त्याच्या कीर्तिरूप पुष्पांनी दहाही दिशा सुगंधित झाल्या होत्या. ( हा शिवयोगी शिवागमाचा पूर्ण ज्ञाता आहे असा त्याचा लौकिक दाही दिशांत पसरला होता.

ज्यानें बौद्धादिक अनेक अन्यमति लोकांच्या मतरूपी अंधाराचें सूर्याप्रमाणें खंडन करून सनातन अशा शिवभक्तीचें रक्षण केलें.

तो शिवयोगी महावीरशैवांचा धर्ममार्ग स्थापन करणारा होता, व शिवज्ञानरूप चांदण्यानें तो चंद्रासारखा शोभत होता.

त्यानें कामिकागमापासून वातुलागमापर्यंत अठ्ठावीस आगम व सर्व शैवपुराणें लक्ष्य लावून वाचिलीं होती.

वेदमार्गास बाध न येईल अशा रीतीनें, एकप्रकारचा उत्तम आचार प्रसिद्धीस आणण्यासाठीं, दुष्टमार्गींचा नाश होण्यासाठीं व विद्वान् लोकांस संतोष होण्यासाठीं,

वीरशैव लोकांचें भूषणभूत सर्व तऱ्हेचे अर्थ स्पष्ट रीतीनें कळविणारे, निर्दोष व विद्वान् लोक ज्याला आवडीनें स्वीकारतात, असें एकोत्तर शतस्थल वीरशैवाचें तंत्र केलें.

तें एकोत्तरशतस्थल सर्व शिवागमामध्यें व सर्व पुराणांमध्यें वर्णिलेलें असून, तें पूर्वीं शंकरानीं पार्वतीला आणि षडाननास सांगितलें होतें.

शिवसंप्रदायानें वागणाऱ्या रेणुक नांवाच्या श्रेष्ठ प्रमथानें तेंच पुन्हां पृथ्वीवर अगस्त्यऋषीस सांगितलें.

हा शिवयोगी, एकोत्तरशतस्थालाचा कर्ता, मोठा विद्वान् असून त्यानें लोकांचा उपयोग व्हावा ह्या हेतूनें हें रचिलें आहे.

सर्व शैवतंत्रांतील ग्रंथांपेक्षां हा ग्रंथ श्रेष्ठ असून सर्वांस निरूत्तर करणारा आहे, ह्मणून त्यास सिद्धान्तशिखामणी असें नांव दिलें आहे.

ह्या ग्रंथांवरून सर्व तऱ्हेचे अर्थ समजून घेतात, सर्व तऱ्हेच्या शैवतंत्रांवरून हा ग्रंथ तयार केला असल्यामुळें शिवबोधाचें ज्ञान होऊन शिवाद्वैतमत चांगल्या रींतीनें ह्या ग्रंथावरून समजतें, शैवमतांत हा ग्रंथ श्रेष्ठ मानला जात असून विद्वान् लोकांस हा ग्रंथ मान्य आहे, ह्यासाठीं वीरशैव लोकांनी ह्या ग्रंथाकडे आपलें लक्ष्य लावावें.

ह्याप्रमाणें महावीरशैव माहेश्वराचार्य शिवयोगी याने तयार केलेल्या, वेद, शिवागम, पुराण वगैरे गंथांत श्रेष्ठ असणाऱ्या सिद्धान्तशिखामणींतील अनुक्रमवर्णन नांवाचा पहिला परिच्छेद संपला.

## = दीप २ रा =

सच्चिदनंदास्वरूप, भावाभाव प्रपंच दाखविण्याला कारण अस-

णारा, स्वयंभू, ( आपोआप जन्मलेला, ) व ज्याच्याबरोबर प्रमथगण असतात, त्या पार्वतीसहित असणाऱ्या शिवास नमस्कार असो.

जी शंकराच्या मुखांतील सर्व तत्वरूप मोत्यांची शिंपली आहे, जी महामाया असून आदिरूपिणी आहे, जी महेश्वराची शक्ति आहे, त्या पार्वतीला नमस्कार असो.

शिव नांवाचें परब्रह्म सच्चित्सुखस्वरूप आहे, त्याचें लक्षण ह्मणून करितांच येत नाहीं, त्याला विकल्प नाहीं, त्याला आकार नाहीं, त्याचा नाश होत नाहीं.

त्याचे विभाग होण्याचें तर नांव देखील काढण्यास नको, त्याचें अलौकिक सामर्थ्य आहे, तें प्रत्यक्ष, अनुमान, उपमान, शब्द वगैरे प्रमाणांवरून कळण्यासारखें नाहीं.

तें नेहमी आपल्याच तेजानें प्रकाशित असतें, त्याला रोग नाहीं, त्याला उपमा नाही. तें सर्वज्ञ आहे, त्याची सर्वत्र गति आहे. तें शांत आहे, तें सर्वांहून शक्तिमान् आहे. त्याला कोठेंही प्रतिबंध होत नाहीं.

त्याला शिव, रुद्र, महादेव, भव वगैरे नांवें आहेत. त्यासारखें दुसरें कोणी श्रेष्ठ नाही, तें अमुक तऱ्हेचें आहे ह्मणून सांगतां येत नाहीं, तें अनादिकालापासून असून श्रेष्ठ ब्रह्मस्वरूप आहे.

त्या ब्रह्मांत सृष्टीच्या पूर्वी तें चेतन आणि अचेतन जग लीन झालेलें होतें; तें ब्रह्म आत्मस्वरूपांत सर्वदा लीन असलेल्या जगाला, आपल्या तेजानें उत्पन्न करणारें आहे; असें तें विचित्र आहे.

त्या शिव नांवाच्या परब्रह्मानें जग निर्माण करण्याच्या इच्छेनें, कांहींएक विशिष्ठ रीतीचें सुख आणि ज्ञान असणारें स्वरूप घेतलें.

तें स्वरूप असें आहे कीं, त्याला दोष तर मुळींच नाहीं, त्याला उपाधि नाहीं, त्याला नाश नाहीं, तें दिव्य असून अलौकिक आहे, तें नित्य आहे, त्याला नीलकंठ म्हणतात, त्रिलोचन ह्मणतात.

त्याच्या मस्तकावर अर्धचंद्र आहे. तें शुद्ध आहे, तें निर्मळ स्फटिकासारखें आहे. निर्मळ मोत्यांसारखे तेजदार आहे, तें देहधारी मनुष्यांनीं उपासना करण्यायोग्य आहे.

तें निष्पाप ज्ञान होण्यास कारणीभूत आहे, तें योगीश्वरांना अभ्यासाच्या योगानें प्रत्यक्ष प्राप्त होण्यासारखें आहे, कोटिसूर्यांसारखें

त्याचें तेज आहे, कोटिचंद्रासारखें तें शीतळ आहे. तें अलौकिक गुणांस आधारभूत आहे व अनंत महिम्याचें स्थान आहे.

त्याची परा नांवाची शक्ति सच्चिदानंद स्वरूपाचें लक्षण आहे; व ज्याप्रमाणें माती ही घटाला कारण असून, कार्यस्वरुप ह्मणजे घटाचें स्वरूप घेते, त्याप्रमाणेंच ही पराशक्ति विश्वाला कारण असून विश्वस्वरूप होते.

शंकराच्या इच्छेप्रमाणें ती त्याच्या स्वरूपास अनुसरून रूप घेते. तो शंभु भगवान् ईश्वर सर्वज्ञ असून सर्वांपेक्षां शक्तिमान् आहे.

जग निर्माण करावें, ह्या हेतूनें, त्यासर्व विश्वाचा ईश्वर अशा, शंकरानें सर्व जगाचे अगोदर ब्रह्मदेवास उत्पन्न केलें; तो ब्रह्मदेव सृष्टिकर्ता झाला.

त्या सर्वज्ञ व सर्वशक्तिमान शंकरानें त्या प्रथम जन्मलेल्या मुलाला, ( ब्रह्मदेवाला, ) कृपा करून सर्व विद्या शिकविल्या.

पुढें तो ब्रह्मदेव सर्व जग निर्माण करण्याचा उद्योग करू लागला; त्यानें शंकराच्या आज्ञेप्रमाणें जग निर्माण करण्याचा उद्योग केला, तरी तो मायावश झाल्यामुळें, त्यास सृष्टि निर्माण करण्याचा उपाय सुचेना,

मग सर्व लोक ( जग ) कसें उत्पन्न करावें ? याचा उपाय समजण्यासाठीं पुन्हा त्या ब्रह्मदेवानें तीन नेत्र असणाऱ्या सर्व देवाधि-देवाची ( शंकराची ) प्रार्थना केली.

हे देवाधिदेवा, तुला नमस्कार असो, दयासमुद्रा, तुला नमस्कार असो, आमच्यासुद्धां सर्व त्रैलोक्याची उत्पत्ति करण्यास तूं समर्थ आहेस.

सृष्टि उत्पन्न करण्याचा उपाय तूं मला सांग, तूं जग उत्पन्न करणारा आहेस, तूं सर्व जगाचा ईश्वर आहेस, तूं सर्वज्ञ आहेस, सर्वां-पेक्षां शक्तिमान् आहेस, तूं सर्व जग उत्पन्न करणारा असून तूं अनादिकालापासून आहेस.

ह्याप्रमाणें ब्रह्मदेवानें त्या विश्वनायकाची प्रार्थना केल्यावर, त्यानें ( शंकरानें ) त्यास सृष्टि उत्पन्न करण्याचा उपाय सुचविला.

शंकरानें जग निर्माण करण्याचा ब्रह्मदेवास उपाय शिकविला, तरी

ब्रह्मदेवास हें नानाप्रकारचें जग उत्पन्न करितां येईना.

पुन्हां ब्रह्मदेव अगदीं थकून गेला, व पुन्हा त्यानें शंकराची प्रार्थना केली; देवाधिदेवा, महादेवा, तूं सर्व जग उत्पन्न करण्यास मूल कारण आहेस,

तूं सच्चिदानंदस्वरूप आहेस, तूं आपल्या इच्छेप्रमाणें शरीर ( रूप ) धारण करून शोभतोस, तुला कोणी भव, शर्व महेशान अशा नावानें हांक मारतात, तूं सर्व कारणांचा कारण आहेस.

तूं मला जग निर्माण करण्याचा प्रकार शिकविलास खरा, परंतु त्यापैकी मला कांही समजलें नाहीं; ह्यासाठीं तूं अगोदर सृष्टि निर्माण कर, तूं परमेश्वर आहेस. पार्वतीपते, तूं सृष्टि उत्पन्न केलेली पाहून मला सृष्टि कशी करावयाची तें समजेल, नंतर मी सृष्टि उत्पन्न करीन.

ह्याप्रमाणें जग निर्माण करणाऱ्या ब्रह्मदेवानें शंकराची प्रार्थना केली, तेव्हां त्या शंकरांनीं आपल्यासारखेच प्रसिद्ध, ज्यांना पाहिजे तेथें जाण्यायेण्याची शक्ति आहे, ( जे व्यापक होते ) जे सर्वांपेक्षां जास्त वळकट आहेत असे प्रमथगण उत्पन्न केले.

ते प्रमथगण अतिशय ज्ञानी असून शिवानंदांत त्यांची मनें नेहमी पोंहत असत, जग निर्माण करणें, आणि जगाचा संहार करणें,ह्या दोन्ही गोष्टी त्यास सहज करितां येतील इतकी त्यांची शक्ति होती.

परमेश्वर श्रीशिवानें अशा तऱ्हेनें तो प्रमथांचा समुदाय उत्पन्न केला, त्यांत रेणुक आणि दारुक नांवांचे दोघे प्रमथ शिवाच्या अत्यंत प्रीतीतील होते.

ते सर्व विद्येतील मर्म जाणत असून ते सर्व कामांत मोठे चतुर होते ; मायेच्या संबंधानें उत्पन्न होणारे आणवमल, मायामल आणि कार्मिकमलापासून ते अलिप्त होते, त्याचा प्रभाव फार मोठा असून ते तेजःपुंज होते.

आत्मस्वरूपाचे आनंदाचा अनुभव घेण्यांत ते नेहमी गढून गेले होते, व शिवतत्वाचें यथार्थज्ञान झाल्यामुळें त्यांचा संसाररूपी रोग दूर झाला होता. ( त्यांस जन्ममरणांचें भय नव्हतें. )

अनेक प्रकारचीं मतें आणि महाशैवतंत्र ह्यांची त्यांस यथार्थ माहिती होती व वेदांतशास्त्रांतील तात्पर्यांचा अर्थ त्यांस चांगल्या रीतीनें समजत होता;

ते दोघे नित्यसिद्ध असून त्यांस कोणतीहीं पीडा नव्हती, व त्यांच्या पराक्रमास मर्यादा नव्हती. ते दोघे तशा प्रकारचे व मोठे भाग्यवान् आहेत असें पाहून,

शिवाचा त्या दोघांजणांवर मोठा विश्वास बसला. व ते तसेच सर्व कामांत प्रवीण होते. त्या दोघां इंद्रियनिग्रहवानांस महादेवानें आपल्या अन्त:पुराचे (स्त्रीसमुदाय राहतो त्या ठिकाणचे) द्वारपाल केले.

द्वितीयेचा चंद्र मस्तकावर धारण करणाऱ्या शंकराचे ते दोघेजण गणेश्वर मोठे विश्वासांतील होते; ते नेहमीं अन्त:पुराच्या दारावर पहारा करीत व वेळोवेळीं शंकराची सेवा करीत होते.

ह्याप्रमाणें सिद्धान्तशिखामणि ग्रंथांतील रेणुक आणि दारुक ह्या दोघां प्रमथगणांचा जन्म नांवाचा दुसरा परिछेद संपला.

## = दीप ३ रा =

कैलास पर्वतावर सोन्याच्या मोठमोठ्या शिला आहेत, व तो पर्वत गंधर्वांच्या बायकांचा क्रीडा करण्याकरितां केलेला मोत्यांचा आरसा असल्यासारखा दिसतो.

कैलासावर पारिजात, बकुल, अशोक, आंबा वगैरे जातींची अनेक झाडें आहेत. कैलासावर बटमोगरा वगैरे फुलझाडांच्या सुवासिक फुलांतील मकरंद पिऊन भुंगे पुष्ट झालेले होतें.

लाल रंगाच्या सुवासिक फुलांच्या झुपक्यामुळें कैलासपर्वताच्या सर्व दिशा सुगंधित झालेल्या असतात; व कैलास पर्वतावरील झाडांवर अनेक कोकिलपक्षी बसून मधुर गायन करितात; त्यांचा मधुर शद्ब सर्वत्र पसरलेला असतो.

कैलास पर्वतावर किन्नरांच्या बायका मधुर स्वरानें गायन करितात; त्यांच्या मंजुल शद्बानें तेथील सर्व गुहा दुमदुमून जातात, व त्या गुहांत मोठमोठे समाधियोग साधणारे योगी ध्यान लाऊन बसल्यामुळें त्यास अप्रतिम शोभा येते.

कैलास पर्वतावरील मानस सरोवरांत उत्तम तऱ्हेनें सुवर्णकमलें फुललेलीं असल्यामुळें, त्या पाण्यास एक प्रकारची गोडी आलेली असते. कैलास पर्वतावर सोन्याचे मोठमोठें उंच शेंकडों खांब आहेत.

कैलासावर रत्नांचे दीप असल्यामुळें, त्यांचा प्रकाश दहा दिशांत पसरत असून फार शोभा येते. कैलास पर्वतावरील मोठमोठ्या वाड्यांच्या दारांच्या दोन्ही बाजूस, शंख आणि पद्म हीं दोन चित्रे काढलेली दिसतात.

कैलास पर्वतावर वाड्यांत मोठमोठीं छतें बांधून त्यांस मोत्यांच्या झालरी बांधलेल्या असतात, त्यांतील मोत्यें नक्षत्रांसारखीं शोभतात. कैलास पर्वतावरील वाड्यांच्या भिंतींस परिस आणि इंद्रनीलमणि ह्यांचे तुकडे बसविलेले असल्यामुळें, ते फार शोभतात.

कैलास पर्वतावर प्रमथगण इकडून तिकडे फिरत असतात, त्या वेळीं त्यांच्या पायांतील पैंजण वाजत असतात. मोठमोठ्या वाड्यांच्या-बारगज्यांवर क्रीडागृहास शोभा येण्यासाठीं पोंवळीं बसविलेली असतात.

वर वर्णन केलेल्या त्या कैलासपर्वतावर एकवेळ उत्तम तऱ्हेच्या रत्नसिंहासनावर शंकर बसले होते, त्या वेळीं शंकरास नमस्कार करणाऱ्या देवांच्या मुकुटावरील पारिजातांच्या फुलांचा सुवास सुटला होता.

शंकर कैलासावरील आपल्या सभेंत बसले होते; ते सर्व त्रैलोक्याचे ईश्वर असून, तीन वेदरूपी कमलांच्या अरण्यांत विहार करणाऱ्या राजहंसाप्रमाणें दिसत होते.

ॐकाररूप शिंपेंतील शंकर हे तेजदार मोत्यांसारखे शोभत होतें, श्रेष्ठ शंकर हें अनेक प्रकारचीं कल्याणकारक कृत्यें व सुंदरपणा ह्यांच्या समुदायाचें घरच होत, (शंकर हे कल्याण आणि सौंदर्य ह्याची खाण होते)

शंकर हे संसारविषानें मूर्च्छित झालेल्या जीवांस संजीवन करणारें उत्तम औषधच होय. तें नेहमीं तेजःपुंज आणि शुचिर्भूत असे आहेत. ते भक्तांस मोक्षप्राप्ति करून देणारे कल्पवृक्ष होत.

तें ज्याची मर्यादा नाहीं अशा आनंदरूपी रसाचा भृंग्याप्रमाणें उपभोग घेणारे आहेत ( ते नेहमीं आनंदी असतात. ) आत्मशक्तिरूप वेली प्रफुल्लित होऊन तिला त्रैलोक्यरूपी कळी आल्याप्रमाणें शंकर दिसत होते.

शंकर, ब्रह्माण्डरूप पात्र फुटून छिन्नभिन्न झाल्यास तें एक कर-

ण्याचे कामांत कुशल होते, सर्व देवतांच्या समुदायाचें शंकर सार्वभौम राजे होत.

दहा हजार चंद्रासारखें शंकराचे सौंदर्य होतें व नमस्कार करणाऱ्या देवांच्या रत्नमुकुटाच्या किरणांनीं शंकराचें वस्त्र पिंगट दिसत होतें.

कोमल कमलतंतूंसारख्या चंद्रकलेमुळें, त्यांच्या मस्तकास तुरा खोंवल्याप्रमाणें शोभा आली होती; कल्याणकारक फुलाची कळी त्यांनी आपल्या कानावर खोंविली असल्यामुळें तें शोभत होते.

मोत्यांनीं गुंफलेली मुंडमाला त्यांनीं आपल्या गळ्यांत घातली असल्यामुळें, त्यांस एका प्रकारचीं विचित्र शोभा आली होती, व पूर्णचंद्राप्रमाणें त्यांचें तोंड सुशोभित दिसत होते.

सकाळीं टवटवीत झालेल्या कमलांप्रमाणें शंकराचे तीन डोळे सुशोभित दिसत होते, मंद हास्यामुळें व मितभाषणामुळें त्या शंकराच्या नाजूक ओंठास शोभा आली होती.

शंकराच्या गालांवर मकरकुण्डल लोळत होते; हलाहल विष प्राशन केल्यामुळें त्यांचा गळा काळसर झालेला होता.

रत्नकंकण आणि बाजुबंद ह्यांच्या किरणांनीं त्यांच्या हाताचीं बोटें शोभिवंत दिसत होतीं, अशा कल्पवृक्षासारख्या चार हातांमुळें, शंकरास अवर्णनीय शोभा आली होती.

शंकर हे अर्धनारीनटेश्वर असल्यामुळें पार्वतीस आलिंगन दिल्यामुळें, त्यांचे दोहों हातांचा मध्यभाग सढळ झाला होता; त्यांच्या गळ्यांत सोन्याचें यज्ञोपवीत असून तें (शंकर) पातळ व उंची रेशमी वस्त्र नेंसले होते.

त्यांनीं आपल्या गळ्यांत बेंबींपर्यंत लोंबणारी उत्तम उत्तम तेजदार मोत्यांची माळ घातली होती, त्यामुळें जटांतून निघणारी गंगा त्यांच्या अंगावर सर्वत्र पसरल्याप्रमाणें दिसत होती.

पायांतील रत्नांच्या पैंजणांच्या सभोंवतीं पसरणाऱ्या शोभेनें चंद्रासारख्या स्वच्छ स्फटिकाच्या सिंहासनास जास्त शोभा आणून, एक पाय आंखडून व एक पाय पसरून शंकर बसले होते.

शंकराच्या जवळ डावीकडील बाजूस पार्वती बसलीं होती; तिनें

आपल्या आवडीचा मंगलकारक वेष घेतला होता. ती सर्व जग निर्माण करतेवेळीं कार्यस्वरूप होत असते.

इच्छा, ज्ञान, आणि क्रिया इत्यादि पुष्कळ शक्तींनीं पार्वती युक्त होती; पार्वती, कोणत्याही रीतीची न्यूनता नाही अशा विद्यातत्वाचा प्रकाश करणारी व नेहमी शंकराजवळ राहणारी होती.

पार्वती ही संसाररूप विषवन जाळून टाकणारी मूर्तिमन्त दवाग्नीची (वणव्याचीं) ज्वालाच होती, पार्वतीनें आपल्या बुचडयांत बटमोगऱ्याची फुलें खोवली होतीं, त्यांच्या सुवासानें भृंगे गुंजारव करीत तिच्या केशांभोंवती फिरत होते.

पौर्णिमेच्या स्वच्छ चंद्रासारखें मी तेज:पुंज आहे, असें पार्वतीचें कमलासारखें तोंड स्पष्टरीतीनें बोलून दाखविते, असें वाटें. नाकांतील नथेंच्या मोत्यांच्या तेजामुळें पार्वतीच्या हंसण्यास एक प्रकारची शोभा आली होती.

कानांत पार्वतीनें रत्नांचीं ताटकें ( बुगडया ) घातलीं होती, त्यांच्या तेजामुळें तिच्या डोळयांच्या दोन्ही बाजूंस शोभा आलेली होती; निळया कमळांच्या शोभेस लाजवितील असे पार्वतीचे नेत्र सुशोभित होते.

पार्वतीच्या दोन्ही भोंवया मदनाच्या धनुष्याप्रमाणें शोभत होत्या. जास्वंदीच्या फुलासारखे पार्वतीचे दोन्ही ओंठ लाल होते.

पार्वतीचा गळा मदनाच्या हातांतील शंखास लाजविणारा होता, नीलकमलांच्या माळेस लाजवितील इतके पार्वतीचे दोन्ही हात नाजुक होते

पार्वतीचें वय नेहमीं तरुण असून तिच्या शरीराचे सौंदर्य अवर्णनीय होतें. तिचे स्तन मोठे व घट्ट असल्यामुळें त्यांचे तिला ओझें होत होते.

वेलीसारख्या असलेल्या कमळाच्या देठाच्या तंतूसारखी तिची कंबर फार नाजुक होती; पार्वतीचें ढुंगण श्रृंगाररूप नदीच्या मोठया वाळवंटाप्रमाणें शोभिवंत दिसत होतें.

पार्वती कुसुंब्याच्या फुलाप्रमाणें रंग असलेलें व तसेंच नाजुक असलेलें वस्त्र नेसलेली होती; श्रृंगाररूप वनांतील कोंवळया कोंवळया

केळीसारख्या तिच्या मांड्या नाजुक होत्या.

आंब्याच्या कोंवळ्या पानांसारखे लाल रंगाचे पार्वतींचे पाय होते. नित्य व मंगलदायक असे अलंकार घातल्यामुळें तिचे शरीर फार सुभोभित दिसत होतें.

पार्वतीच्या गळ्यातींल मोत्यांच्या माळा, पायांतील पैंजण, व बाहुभूषण, ह्यांच्यामुळें तिच्या शरीरास अवर्णनीय शोभा आलेली होती, पाहणाऱ्यांच्या डोळ्यास आनंद होईल अशा वेलीसारखें तिचें रूप होते; पार्वतो हीं सुखरूप असून मंगलकारक व उत्तम गुण तिच्या अंगांत परिपूर्णरीतीनें भरलेले होते.

जगांतील स्त्रीपुरुषांची जोडपी पार्वतीच्या रूपापासून झालेलीं आहेत. त्या पार्वतीसहवर्तमान कैलासावरील आपले सभेंतील रत्नसिंहासनावर शंकर बसले असतां, तेथें विलक्षण प्रकारची शोभा आली होती. प्रमथगणांचे समुदाय शंकराच्या भोंवती आपापल्या योग्यतेप्रमाणें बसले होते.

महालक्ष्मीनें शंकरपार्वतीवर पांढरें शुभ्र छत्र धरलें होतें; तें पांढऱ्या कमलाप्रमाणें स्वच्छ होते, व पौर्णिमेच्या संपूर्ण चंद्राप्रमाणें शोभिवंत होतें.

शंकराच्या जवळ सरस्वती आपल्या हातांत वीणा घेऊन व त्याच्या तारांच्या झणत्कारानें मंजुळ ध्वनि काढून, अमृतासारख्या मधुर स्वरानें गायन करीत होती.

उपनिषद्रूपी स्त्री हातांतील रत्नकंकणाचा रुणझुण असा मंजुळ ध्वनि होत असतां, ॐकाररूप पंख्याने शंकरास वारा घालीत होती.

आपल्या हातांनीं शंकरावर चवऱ्या ढाळीत असतां, ज्यांच्या हातांतील रत्नकंकणें रुणझुण रुणझुण वाजत होती, अशा कितींएक देवकन्या शंकरपार्वतीच्या बाजूस उभ्या राहून सेवा करीत होत्या,

चवऱ्या वरचेवर वारूं लागल्यामुळें मधून मधून चवऱ्या वारणाऱ्या देवकन्यांचीं तोंडें वरून राजहंसपक्षी फिरतां फिरतां त्याचे छायेखालील कमळें एखादेवेळीं अवचित नजरेस पडावीं त्याप्रमाणें शोभत होती.

परिपूर्ण ऐश्वर्य असणारे वेद आपापल्या मंत्रानें भक्तीपूर्वक स्तवन

करीत होते, मस्तकावर जसें एखादें रत्न घ्यावे त्याप्रमाणें सर्व वेद शंकराची आज्ञा शिरसामान्य करीत होते.

शंकराची शस्त्रास्त्रें धारण करणाऱ्या, त्या वेषाला शोभतील असे अलंकार आपापल्या आंगावर घालणाऱ्या शंकराच्या अंगभूत कितीएक स्त्रिया त्या शंकरास भजत होत्या.

नातलगांतील अधिकारी अनंत वगैरे आठजण विद्येश्वर शंकराच्या बाजून उभे राहून सेवा करीत होते.

तदनंतर नंदी, महाकाळ, चंड, भृंगी रिटि, घंटाकर्ण, पुष्पदंत, कपाली, वीरभद्र.

इत्यादिक प्रमुख प्रमुख भाग्यवान् मोठमोठे शक्तिमान् पराक्रमी व ज्यांच्या शक्ती कोठेंच कुंठित होत नाहींत असे प्रमथगण शंकराची सेवा करीत होते.

त्या प्रमथगणांच्या अष्टमहासिद्धि दासीसारख्या होत्या, फार काय परंतु ब्रह्मादिक देव देखील त्यांची आज्ञा मोडण्यास भीत होते.

मोक्षरूप लक्ष्मीचें आलिंगन मिळाल्यामुळें ते मनांत संतुष्ट होते, त्या प्रमथांस पृथ्वी उत्पन्न करणें किंवा पृथ्वीचा संहार करणें ह्या दोन्ही गोष्टी कसपटासारख्या वाटत असत.

त्या प्रमथगणांची ज्ञानशक्ति सर्व वस्तूंचें यथार्थज्ञान करून देणारी व मोठी होती, ब्रह्मदेव विष्णु वगैरे देवांचीं ऐश्वर्यें त्यांच्या मनास अगदीं थोडें सुख देणारीं वाटत असत ( त्या ऐश्वर्यांस ते तुच्छ मानीत असत. )

योगसाधनांत निमग्न राहणारें ऋषि आपणांस प्रमथांची योग्यता कधीं येईल ? म्हणून नेहमीं वाट पहात असतात. प्रमथगणांच्या मनांत अमुक वस्तु पाहिजे असे येतांच ती वस्तु प्रत्यक्ष कल्पवृक्ष त्यांस आणून देत होता.

कर्म, काल व कृपणपणाचीं काळजी त्या प्रमथगणांस मुळींच नव्हती, ते इतके पराक्रमी होते कीं, त्यांस पाहून प्रत्यक्ष मृत्यु देखील आपणास मृत्यु आला असें मानीत होता, ते शिवसारूप्य पावलेले प्रमथगण शिवाची सेवा करीत होते.

तसेच त्र्यैलोक्याचीं सूत्रें हातांत असणाऱ्या शंकराच्या ब्रह्मा,

विष्णु, इंद्र वगैरे देव आपापल्या हातांत शस्त्रास्त्रें घेऊन बाजूस उभे राहिले होते व शंकराची सेवा करीत होते,

तसेच आदित्य वसु, रुद्र, यक्ष, गंधर्व, किन्नर, दानव, राक्षस, दैत्य, सिद्ध, विद्याधर, सर्प वगैरे सर्व जातीचें सेनापति व सैन्य महादेवाचीं आज्ञा मानण्यास तयार होते.

वसिष्ठ, वामदेव, पुलस्त्य, अगस्त्य, शौनक, दधींचि, गौतम सानंद, शुक, नारद,

उपमन्यु, भृगु, व्यास, पाराशर, मरींचि, इत्यादि सर्व मुनिश्वर शंकरास भजत होते.

शंकराच्या आजुबाजूस जो सेवकगणांचा समुदाय उभा होता त्यांच्या स्वच्छ शरीरांत शंकराचीं प्रतिबिंबें पडून मी सर्वांन्तर्यामी आहे असें शंकर उघड रीतीनें सर्वांस दाखवीत आहेत अशाप्रमाणें शोभले.

एखादे वेळीं शंकरांनीं सर्व देवांस अमुक अमुक काम करा म्हणून सांगावें, एखादे वेळीं गंधर्वांचें सुस्वर गाणें ऐकावें.

एखादे वेळीं ब्रह्मदेव, विष्णु वगैरे देवांबरोबर सुखासमाधानाच्या गोष्टी सांगाव्या, एखादे वेळीं क्षणभर देवस्त्रियांचे नाचण्याचे प्रकार पहावे.

एखादे वेळीं वेदाचा उच्चार फार चांगला म्हणून शंकरांनीं व्यासादिकांची स्तुति करावी, एखादे वेळी पिकल्या तोंडल्याप्रमाणें ओंठ असणाऱ्या पार्वतीच्या मुखाकडे आपली दृष्टि लावावी.

एखादे वेळीं भृंगीच्या हांसण्याकडे व नाचण्याकडें लक्ष द्यावें, शंकराच्या जवळच नंदिकेश्वर उभा होता, त्यानें आपल्या हातांत वेताची छडी घेतली होती, सर्व कामाचा त्याचेकडे शंकरांनी अधिकार दिलेला होता.

शंकराच्या जवळ नेहमीं नंदिकेश्वरानें राहावें व शंकराच्याच मनाप्रमाणें नंदिकेश्वरानें नेहमीं वागावें; त्या नंदिकेश्वराकडून शंकरांनीं ज्यांस बोलाऊन आणावयाचें त्यांस बोलाऊन आणावें, कितिएकांस नेत्रसंकेत करून घालवून द्यावें. कितीएकांचा आदर सत्कार नंदिकेश्वराकडून करवावा व कितीएकांस शासन करवावें.

शंकर हे सर्वत्रैलोक्याचे प्रभु असल्यामुळें त्यांची आज्ञा सर्व देव

शिरसामान्य करीत असत, शंकराची शक्ति अमर्याद असून स्वाभाविक सौंदर्यामुळें त्यांचा आकार फार सुंदर होता.

त्या शंकराचे अंगी नेहमी कायमचे तारुण्य असल्यामुळें त्यांचें शरीर सुगंधीत व सुशोभित दिसत असे. आत्मशक्तिरूप अमृतरसाची गोडी त्या शंकरास लागली असल्यामुळें ते नेहमीं आनंदित असत.

शंकराचें स्वाभाविक ऐश्वर्य आणि विश्रांतिसुख अमर्याद होतें. त्यांचें शरीर निर्दोष अशा सत्वगुणानें निर्माण केलें आहे असें वाटे.

शंकर कितीही शत्रु आले तरी त्यांचा पराभव करण्यास पूर्ण समर्थ होते, तें प्रसन्न झाल्यावर चिंतामणिरत्नाप्रमाणें भक्तलोकांच्या इच्छा परिपूर्ण करीत.

ते शंकर सभेंत बसले असतां त्यांनीं त्या मुख्य रेणुक प्रमथश्रेष्ठास सुलभ तांबूल प्रसाद देण्यासाठीं जवळ बोलाविलें,

शंकरांनीं आपणास प्रसाद देण्यासाठी जवळ बोलाविलें इतक्यामुळें त्यास मोठा आनंद होऊन त्या आनंदाच्या घाईघाईंत तो दारुकास ओलांडून त्यास न जुमानतां शंकराजवळ गेला.

तो दारुकास ओलांडून आला असें पाहतांच आपल्या भक्ताचा मोठेपणा प्रकट करण्यासाठीं शंकर त्या सभेंतच रेणुकास म्हणाले. अरेरे दुष्टा, रेणुका, तूं आतां ह्या दारुकाचा सभेंत उपमर्द केलास, दारुक माझा परमभक्त आहे. माझ्या भक्ताचा कोणीं उपमर्द केल्यास त्यापासून त्यावर अनेक संकटें गुदरतात माझ्या भक्तांचा उपमर्द करणाऱ्या प्राणिमात्रांच्या आयुष्याचा. संपत्तीचा. कुलाचा व कीर्तीचा नाश होतो.

पूर्वीं यमानें माझ्या मार्कण्डेय भक्ताचा असाच छळ केला त्यामुळें माझी त्याला अशी जोरानें लाथ बसली तिच्यामुळें तो लागलाच मरण पावला, तसेच माझे परमभक्त भृगु आणि शंकुकर्ण यांचा विष्णूनें असाच छळ केला, त्यामुळें विष्णूचे केश नाहींसे होऊन त्यास दहावेळ निर-निराळ्या योनींत जन्म घ्यावे लागले.

माझा भक्त दधीचि ह्या बरोबर पूर्वीं विष्णूनें युद्ध केलें त्यांत त्याच्या सुदर्शनचक्राचा नाश होऊन त्याचा पराभव झाला.

दक्ष ब्रह्यानें अश्वमेघ यज्ञ केला व सभेमध्यें माझ्या भक्तांचा उपमर्द केला त्यामुळें त्यास बोकडाचें तोंड झालें.

श्वेत नांवाचा माझा भक्त मोठा पराक्रमी होता त्याकडे दुर्लक्ष केल्यामुळें मीं पूर्वी यमास देखील जाळून टाकिलें. असें दुसरेही कितिएक माझ्या भक्तांचा उपमर्द केल्यामुळें पराभव पावले व नाश पावले. सारांश, माझे भक्त मोठे पराक्रमी होत, त्यांचा कोणीही उपमर्द करितां कामास नयें.

रेणुका, त्वां मूर्खपणानें ह्या माझ्या दारुक भक्ताचा उपमर्द केलास, त्या पातकामुळें तुला पृथ्वीवर जन्म घेतला पाहिजे.

भक्तांचा मोठेपणा सुचविणाऱ्या शंकरानें असें म्हटल्यावर रेणुक शंकरास नमस्कार करून म्हणाला.

मनुष्ययोनीमध्यें मोठमोठी दुःखें वरचेवर येतात. जाति, आयुष्य, सुखोपभोग, व दुःख उत्पन्न करणारी अनेक प्रकारची कर्मं तेथें घडतात. मनुष्ययोनींमध्यें अनेक देवांची सेवा करावी लागते, मनुष्ययोनि तर कृपणपणाची जन्मभूमि आहे. आध्यात्मिक, अधिभौतिक, व आधिदैविक अशीं मोठमोठीं दुःखें तेथें भोगावीं लागतात. त्या योनींत जाति आणि आश्रम वगैरे अनेक अडचणी आहेत. अशा ठिकाणीं मी तुझ्या चरण-कमलाची सेवा करणें सोडून कसा राहूं ? हे ईश्वरा, तूं कृपेचा समुद्र आहेस, सर्व देवांचाही देंव आहेस, ज्या तऱ्हेनें मला पृथ्वीवर मनुष्यजन्म घ्यावा लागणार नाहीं असा माझ्यावर अनुग्रह कर.

रेणुकानें अशी प्रार्थना केल्यावर महादेव म्हणाले, रेणुका, भिऊं नकोस, माझ्या भक्तांस संकटें कशीं उत्पन्न होतील ? कधींच होणार नाहींत.

श्रीशैल्य पर्वताच्या उत्तरेकडे तेलंग देशांत कोल्लिपाक नांवाचा फार मोठें गांव आहे. तेथें मी सोमेश्वर असें नांव घेऊन राहतों. त्या माझ्या सोमेश्वर लिंगापासून तूं जन्मशील, तुला मनुष्याच्या स्त्रीच्या पोटी जन्म घेऊन गर्भवासांत पडावें लागणार नाही.

तूं माझ्या सोमेश्वर लिंगापासून जन्मलास, सर्व प्राणिमात्रांचें हित करणारा आहेस असें समजतांच माझें आज्ञेप्रमाणें सर्व लोक तुझी सेवा करूं लागतील. तूंही माझ्या आज्ञेप्रमाणें माझें श्रेष्ठ अद्वैतशास्त्र वेद आणि वेदांत ह्यांस मान्य असणारें पृथ्वीवर विस्तार करशील व त्यामुळें सर्वांचें कल्याण होईल.

तूं माझा आणि माझ्या भक्तांचा पराक्रम वेदमार्गाला बाध न येईल अशातऱ्हेनें पृथ्वीवर प्रसिद्धीस आण. इतकें बोलून शंकर आपल्या सिंहासनावरून उठले, ब्रम्हदेव, विष्णु वगैरे देवांस त्यांनीं नेत्रसंकेतानें (आपल्या डोळ्यांच्या खुणेनें) आपापल्या स्थानांस जावयास सांगितलें व आपल्या आवडत्या प्रमथगणांस मात्र आपल्याबरोबर घेऊन पार्वती-सहित आपल्या अन्त:पुरांत गेले; शंकराचे आज्ञेप्रमाणें रेणुक कोल्लिपाक गांवांतील सोमेश्वर लिंगापासून पृथ्वीवर जन्मास आला. ह्याप्रमाणें श्रीसिद्धान्तशिखामणि ग्रंथांतील रेणुकाचें पृथ्वीलोकावर जन्मास येणें हे वर्णन असलेला हा तिसरा दीप संपला.

## = दीप ४ था =

मग तेलंग देशांत कोल्लिपाक नांवाच्या गांवांत सोमेश्वर लिंगा-पासून तो रेणुक जन्मला. शिवलिंगासून तो अतिशय तेजस्वी रेणुक जन्मलेला पाहून तेलंग देशांतील सर्व लोकांस मोठें आश्चर्य वाटलें.

रेणुकाच्या सर्व आंगास भस्मलेपन केलेलें होतें. उत्तम उत्तम रुद्राक्षांच्या गळयांत माळा घातल्या होत्या. मस्तकावर मुकुटासारख्या जटा बांधलेल्या होत्या व कपाळास विभूतीचा त्रिपुंडू लाविलेला होता. कमरेस वस्त्रासारखीं कंथा गुंडाळली होती व त्यानें हातांत योगदंड आणि भस्म ठेवण्याचा कमंडलु घेतला होता.

शिवाचें अद्वैत शास्त्र त्यास चांगल्या रीतीनें समजल्यामुळें तो अत्यानंदांत निमग्न झाला होता. सर्वप्रकारच्या संसारवासनांचे दोष त्याचे तुटले होते.

शिवागमरूप अमृतसमुद्रास तो भरती आणणारा मूर्तिमन्त चंद्रच होता. तो आपल्या हृदयकमलांत शिवाचे दोन्हीं चरण नेहमी आठवीत होता. यम नियम प्राणायम वगैरे योगसाधनांची आंगें त्यास माहीत होतीं. तो सर्व कर्मांमध्यें स्वतंत्र होता व सर्व सिद्धवंशाच्या समुदायांत तो प्रमुख असा होता.

वीरशैवमताचा प्रसार करण्याचा जणु काय त्यानें विडा उचललेला होता व त्याचें दर्शन झाल्याबरोबर प्राणिमात्रांचें सर्व पाप दूर होईल इतका रेणुक पवित्र होता.

त्याला पाहतांच तेलंग देशांतील सर्व लोकांनीं त्यास नमस्कार करून, तूं कोण? म्हणून विचारिलें; कां तर त्याचें तें अद्भुत तपःसामर्थ्य पाहून त्या लोकांस मोठें आश्चर्य वाटले.

त्या लोकांनीं असें विचारल्यावर शिवाच्या अद्वैतशास्त्राच्या परमानंदांत बुडालेल्या त्या रेणुकानें उत्तर दिलें कीं, मी महादेवाचा अगदी जवळ राहणारा सेवक रेणुक नांवाचा प्रमथ आहे.

मीं कांहीं कारणामुळें येथें ह्या सोमेश्वरलिंगापासून जन्मास आलों माझें नांव रेणुकसिद्ध असून मी सर्व सिद्धवंशाचा प्रमुख (मुख्य) पुरुष आहे. मी कोणाचा ताबेदार नाहीं. मी स्वच्छंदपणानें ह्या जगामध्यें राहून शिवशास्त्राचें रक्षण करणार आहे. जैन, चार्वाक, बौद्ध वगैरे शिवधर्मांचा द्वेश करणाऱ्यांच्या शास्त्राचा मी उच्छेद करीन.

रेणुकेश्वरानें असें म्हटलें तेव्हां तेलंग देशांतील सर्व लोक त्याजकडे टक लावून पाहूं लागले; इतक्यांत तो तेथून उठून सर्वांच्या समक्ष आकाशमार्गानें मलय पर्वताकडे चालता झाला. मलय पर्वतावर चंदनांचीं झाडें अतिशय असल्यामुळें त्यांवरून मंद मंद वाहणाऱ्या वायूंमुळें सर्वत्र सुवास सुटला होता त्या पर्वतावर नेहमी नागस्त्रिया मधुर मधुर गायन करीत त्यांचा मंजुळ ध्वनि सर्वत्र ऐकूं येत होता. तेथें हत्तींच्या लहान लहान छाव्यांनीं आपल्या सोंडानीं भराभर वेलदोंड्याच्या वेली उपडाव्या, त्यामुळें त्यांचा सुगंध चोहोंकडे सुटलेला असे, व तेथील रानडुकरांनीं आपल्या दाढांनीं वाळ्याचीं मुळें उपडावीं, त्यांचाही सुवास मलयपर्वतावरील गुहांत चोहोंकडे पसरत असे. मलय पर्वतावरील फांसेपारधी लोक चंदनाच्या पानांचे पलंग करून त्यावर आपल्या बायकांसह सुखानें निजत असत, तसेच त्या पर्वतावर जाई, जुई, बटमोगरा ह्यांच्या फुलांचा मंजुळ्यांचा व परागांचा चोहोंकडे सुगंध सुटलेला असे.

त्या पर्वतावर सहा ऋतूंत सर्व झाडांस फुलें येत असत, अमुक ऋतूंमध्यें अमुक झाडांस फुलें यावीं, असा नियम तेथें मुळींच नव्हता, त्या मलय पर्वतावर अगस्त्यऋषींचा सुशोभित आश्रम रेणुकानें पाहिला. त्या आश्रमांत पारिजाताचीं व चंदनाचीं झाडें इतकी दाट लागून गेली होतीं कीं त्या झाडींतून आकाशांतील चांदण्या त्या झाडांच्या शेंड्यावर आलेल्या पांढऱ्या पांढऱ्या फुलांप्रमाणें शोभत असत. ऋषींच्या कन्या

आपल्या हातांत घागरी घेऊन पाणी घालून आश्रमांतील झाडें वाढवितात, त्या झाडांच्या आळ्यांतील पाणी पिऊन हरिणींचा समुदाय सुखानें रवंथ करीत बसत होता.

तेथील (आश्रमाजवळ) सरोवरांतील सुवर्णकमलांतून गळणाऱ्या मधुर मधुर मकरंदाचा जलास सुवास येतो, व कमलावर बसून राजहंसपक्षी मधुर शद्ब करितात, त्यामुळें पाण्यांतील लाटांची मोठी मौज दिसे. तेथील सरोवरांत नीलकमलें इतकीं आहेत कीं, त्यांच्या तेजानें दहा दिशा देखील निळ्या झालेल्या दिसतात, व तीं नीलकमलें अशीं शोभतात कीं, अगस्त्यऋषीची स्त्री लोपामुद्रा ही सरोवरावर जातांना वाटेंत तिचीं पावलें उमटलीं आहेत किंवा काय ? असा भास होत होता.

सरोवरांतील पाणी फार स्वच्छ असून तें मोत्यांच्या माळा, बर्फ, कापूर, शंकराचें हांसणें ह्याप्रमाणें पांढरें शुभ्र दिसे, व त्यांत अनेक तपस्वी लोक नियमानें नित्य स्नान करीत असत. सरोवराच्या पायऱ्या उत्तम उत्तम रत्नांच्या केलेल्या होत्या, त्या आश्रमांत वैरभाव तर कोणत्याहि प्राण्यांस माहीत नव्हता. (सर्व प्राणिमात्र स्नेहभावानें वागत असत. ) ह्यामुळें तो दुसरा सत्यलोकच आहे असें भासे. जागोजाग होमहवन होत असल्यामुळें त्यांत जळणाऱ्या तुपाचा वास येणारा धूर चोहोंकडे पसरला होता, तेथील बाळगलेले राघु देखील वेद आणि शास्त्र ह्यांतील वाक्यें भराभर बोलत असत.

त्या आश्रमांत चंदनाच्या झाडाखालीं अगस्त्य ऋषि बसले होते, त्या चंदनांची कोंवळी कोवळी पानें इतकीं दाट होतीं कीं, त्यांतून अगस्त्याचे अंगावर ऊन्ह तर मुळीच पडत नव्हतें. विजेसारख्या पिंगट रंगाच्या जटा डोकीवर असणारे, कपाळाला भस्माच्या त्रिपुण्ड्राचे टिळे लाविलेले, सर्व अंगावर भस्माचे पट्टे ओढलेले गळ्यांत उत्तम उत्तम अशा रुद्राक्षांच्या माळा घातलेले.

नवीन वल्कलें (झाडांच्या सालीचीं वस्त्रें) नेसलेले, अनेक प्रकारचे नियम करणारे, मोठेमोठे ऋषीश्वर, प्रमथगण ज्याप्रमाणें शंकराची उपासना करितात त्याप्रमाणें अगस्त्यऋषीची उपासना (सेवा) करीत सभोंवती बसले होते. विजेसारख्या लखलखीत ज्वालांमुळे जसा अग्नि शोभावा त्याप्रमाणें तपश्चर्यारूप वृक्षाचे पानाप्रमाणें शोभणाऱ्या

(तपश्चर्येमुळें वाढलेल्या) तेज:पुंज जटांच्या समुदायामुळे अगस्त्यऋषि शोभत होते. गंगानदीमुळें पांढऱ्या शुभ्र दिसणाऱ्या मोठमोठ्या शिलांमुळें जसा हिमालय पर्वत शोभावा, त्याप्रमाणें पांढऱ्या शुभ्र भस्मानें काढलेल्या कपाळावरील त्रिपुण्ड्राच्या रेषांमुळें अगत्स्यऋषि शोभत होते.

अगत्स्यऋषीनीं आपल्या सर्व अंगास भस्म लावलेलें होतें, त्यामुळें ते पृथ्वीवर उतरलेल्या चंद्राप्रमाणें शोभत होते, ते नवे वल्कल नेसले होते तें सकाळच्या उन्हासारखें शोभिवंत दिसत होतें. वडवाग्नीच्या ज्वालांनी युक्त असणाऱ्या समुद्राप्रमाणें अगस्त्य ऋषि दिसत असत, आणि सर्व प्रकारच्या विद्यांच्या समुदायाचे अगस्त्यऋषि हे राहण्याचें एक मुख्य ठिकाण होते. (त्यांस सर्व विद्या येत होत्या.)

अगस्त्यऋषीस सामान्य मनुष्याप्रमाणें गर्व मुळींच नव्हता, त्यांची शंकरावर अतिशय श्रद्धा होती सर्व जगाच्या पसाऱ्यास ते कसपटाप्रमाणें तुच्छ मानीत असत. अष्टमहासिद्धींचे अगस्त्यऋषि हे भरभराटीचे स्थान होते. (अगस्त्यऋषीस अष्टमहासिद्धि अनुकूल होत्या.)

अगस्त्यऋषि मोहरूप अंधकारास सूर्यासारखे होते, (ज्ञानी होते,) मूलज्ञानाचे वृक्ष होतें, अशा त्या कलशापासून जन्मलेल्या अगस्त्यऋषीस त्या श्रेष्ठ योगीश्वरानें (रेणुकानें) पाहिलें. तो महायोगी रेणुकेश्वर प्रमथपति आपल्याकडे येतो आहे असें ज्ञानदृष्टीनें अगस्त्यांनी जाणलें. अगस्त्यांनीं त्याचें सामर्थ्य जाणून रेणुक येतांच ते एकदम उठून उभे राहिले, व मुद्दाम लोपामुद्रेच्या हातानें निर्मळ पाणी आणवून त्या शिवयोग्याचे त्यांनीं पाय धुतले, नंतर त्याची यथाविधि पूजा करून त्याची आज्ञा घेऊन तो विनयशील अगस्त्यऋषि आपण दुसऱ्या आसनावर बसला. पृथ्वीवर सामर्थ्यवान् म्हणून जितके लोक आहेत, त्या सर्वांत रेणुक मुख्य होता, तो रेणुक मुनीश्वर आसनावर बसल्यानंतर सर्व सिद्ध लोकांत मुख्य तो रेवणसिद्धं अगस्त्यास शांतपणानें म्हणाला, अगस्त्यऋषे, खुशाल आहेस ना ? तुझी नियमक्रिका निर्विघ्नपणानें चालत आहे ना ? अगस्त्यऋषे, तूं स्वत: सामर्थ्यवान् आहेस, तुला विघ्नें कोठून येतील ? विश्वाचा नाश करण्यास प्रवृत्त झालेला विंध्याद्रि पर्वत तूं जमिनीवर पुन्हा पूर्ववत् निजविलास, तुझ्या थोड्याशा रागानें उन्मत्त झालेला नहुष राजा सर्पयोनीस गेला.

तूं पूर्वी सर्व समुद्र एका आचमनानें पिऊन टाकल्यामुळें सर्व समुद्रांत फक्त चिखल काय तो शिल्लक राहिला, तुझ्या पोटामध्यें पूर्वी वातापिदैत्य खाण्याच्या अन्नाप्रमाणेंच पचून गेला. अशा प्रकारची तुझी अलौकिक व चमत्कारिक कृत्यें आहेत, तुझी बरोबरी करणारा ह्या जगांत दुसरा कोणी नाहीं. शिवाच्या अद्वैतशास्त्रापासून अतिशय आनंद होतो, हे लोकांच्या नजरेस आणून देण्यांस तूं नेहमी तयार आहेस, तुझी सर्वलोक प्रशंसा करितात, तूं स्वाभाविकरीतीनें नि:संग ( सर्व संगपरित्याग केलेला ) आहेस.

पूर्वी कार्तिकस्वामीनें ( पार्वतीच्या मुलानें ) त्यास शिवांनी जें शिवधर्मशास्त्र शिकविलें होतें तें त्यानें तुला सांगितलें आहें. शंकराची भक्ति अतिशय भयंकर अशा संसाराचें भय दूर करणारी आहे, ती शिवभक्ति आणि तें शिवधर्मोत्तर शास्त्र तुझ्यामुळे लोकांत प्रसिद्धीस आलें. अशा प्रकारचें रेणुकसिद्धाचें बोलणें ऐकून तो अगस्त्यऋषि भक्तिपूर्वक प्रौढभाषेनें त्यास म्हणू लागला. सर्व मुनींश्वरांमध्यें मींच काय तो एक धन्य आहें, कां तर तूं घरीं यावेस इतकी योग्यता माझ्याखेरीज दुसऱ्या कोणाचीच नाहीं.

माझें शिवज्ञान स्थिरपणा पावलें, माझ्या तपश्चर्येच्या सर्व क्रिया स्थिर आहेत. तुझें मला दर्शन झालें म्हणून मला मुनिराज (मुनिश्रेष्ठ) असें नांव पडलें तें योग्य आहे असें मी मानतो. संसाररूप साप चावून मूर्च्छित झालेल्या प्राणिमात्रांस तुझी कृपादृष्टी सुखकारक असें संजीवनी नांवाचें औषध आहे.

सर्व लोकांच्या अंगाचा दाह करणारा आध्यात्मिक आधिभौतिक व आधिदैविक असा तीन प्रकारचा तापरूप अग्नि तुझें चरणकमलरूप जल प्राशन केल्याबरोबर शांत होतो. रेणुकनाथा, मी तुला ओळखतों, तूं प्रमथांत मुख्य असून शिवाच्या अगदीं प्रीतींतील आहेस, माझ्यावर कृपा करण्यासाठीं तूं ह्या पृथ्वीवर अवतरला आहेस.

शिवज्ञानामुळें तुमचें जन्ममरण चुकलें आहे, अशा तुमच्यासारख्या योगीश्वरांचा लोकांवर उपकार करण्याचा धर्मच आहे. ( लोकांवर उपकार करण्याची स्वाभाविकपणानें तुमची बुद्धि असते. ) वेदास संमत असणारें शिवशास्त्र मीं तुझ्या तोंडानें ऐकूं इच्छितों, तूं प्रत्यक्ष सर्वज्ञ

आहेस. सर्व मनोरथ पूर्ण करणारें तें शैवशास्त्र तूं मला सांग. शैवधर्म-शास्त्र प्राणिमात्रांचें सर्व मनोरथ पूर्ण करितें, सर्व योगीश्वर ते मनापासून ऐकतांत, दुराचारी लोकांस मात्र तें आवडत नाहीं, तरी वेद जाणणारे लोक तें शैवधर्मशास्त्र आवडीनें ऐकतात. व तें शैवशास्त्र शिवाचें आत्म्याशीं ऐक्य झाल्यामुळें उत्पन्न होणाऱ्या ज्ञानातिशयाचा संप्रदाय वाढविणारें आहे.

रेणुकेश्वरा, तूं मोठा योगीश्वर आहेस, शिवधर्मशास्त्रापासून सर्व लोकांचा मोठा उपयोग आहे, यांत सिद्धांतांचा संग्रह आहे, व इतर मतांचा त्यांत समावेश केला नाहीं, असें तें शैवधर्मशास्त्र मला सांगून मी अनेक आगम वाचले असल्यामुळें माझ्या मनांत अनेक प्रकारच्या कल्पना (संशय) आहेत त्या सर्व घालवून मला सुखी कर.

ह्याप्रमाणें श्रीसिद्धान्तशिखामणींतील रेणुकाचार्य आणि अगस्त्य ह्यांची भेट झाल्याचें वर्णन असलेला हा चवथा दीप संपला.

## = दीप ५ वा =

मग अगस्त्याचें बोलणें ऐकून तो रेवणाचार्य गणेश्वर क्षणभर पार्वतीसह महादेवाचें ध्यान करून शांतपणानें अगस्त्यास म्हणू लागला. अगस्त्यऋषें तूं सर्व मुनीश्वरांत श्रेष्ठ आहेस, सर्व आगमांत पारंगत आहेस, शिवज्ञान उत्पन्न करणारा सिद्धांन्त मी तुला सांगतो, नीट लक्ष्य देऊन ऐक. अगस्त्यऋषे, आपापल्या आवडींप्रमाणें वेगळें वेगळे आचार सांगितले व वेगळे वेगळें अर्थ प्रतिपादन केलेलें अनेक सिद्धान्त प्रसिद्ध आहेत. त्यांत सांख्य, योग, पांचरात्र, वेद आणि तसेंच पाशुपत हीं मतें प्रमाणभूत आहेत, ती युक्तिवादानें खंडित होणारी नाहीत.

मुनीश्वरा, सांख्य वगैरे सर्व मतांस वेद मान्य आहे, ही सर्व मतें वेदाच्या तंत्रानें चालतात, म्हणून त्यांस प्रामाण्य आहे हे सिद्ध झालें. पांचरात्र, सांख्य आणि योग ही मतें वेदांच्या कांही थोडया भागास अनुसरून आहेत, सर्वथैव वेदास अनुसरून नाहीत, तशीं शैवतंत्राची स्थिति नसून तें सर्वतोपरी वेदमय ( वेदापासून तयार झालेलें ) वेद-स्वरूप असें आहे. वेदांच्या कांही कांही भागास सांख्य वगैरे मतें अनु-

सरून असल्यामुळें सर्वतोपरी वेदमय असलेल्या शैवमताचें महत्व त्यांच्यापेक्षा जास्त आहे.

शिवानी स्वतः सांगितलेलें सिद्धान्तनांवाचें शैवशास्त्र होय, तें सर्वतोपरी वेदाच्या अर्थास अनुसरून असल्यामुळें त्याला वेदाप्रमाणें प्रामाण्य आहे. परमेश्वर शंकरानें पुष्कळप्रकारचे आगम सांगितलें आहेंत त्यांत शैव, पाशुपत, सोम, लाकुल असे चार भेद आहेत. त्यापैकी शैवमतांत चार भेद आहेत, व ते सर्व तंत्रांत प्रसिद्ध आहेत, त्यांची नांवे वाम, दक्षिण, मिश्र आणि सिद्धान्त अशीं होत. वाम नांवाचें शैवतंत्र शक्तिची उपासना करणारें आहेत, दक्षिण नांवाचें शैवतंत्र भैरवाची उपासना करणारे आहे, मिश्र नांवाचें शैवतंत्र सात मातृकांची उपासना करणारे असून सिद्धान्त नांवाचें शैवतंत्र वेदास अनुसरून आहे. वेदांत जे जे धर्म सांगितलें आहेत तेच धर्म सिद्धांतशैवागमांत सांगितलें असल्यामुळें व सिद्धांतशिवागम वेदानें बहिष्कृत केलेल्या जैन चार्वाकांचे मताचा नाश करणारा असल्यामुळें वेदसंमत असा मानला जातो.

वेद आणि सिद्धान्त हे दोन्हीही एकाच अर्थाचें प्रतिपादन करितात, त्यामुळें विद्वान् लोकांनीं वेदाचें व सिद्धान्ताचें प्रामाण्य (महत्व) सारखें आहे असें समजावें. शंकरांनीं कामिकापासून वातुलापर्यंत जे आगम सांगितले आहेत त्यांस सिद्धान्त महातंत्र म्हणतात, त्यांत उत्तरभागांत वीरशैवमताचें वर्णन असून पूर्व भागांत शैवमताचें वर्णन आहे.

ज्या अर्थी शिवस्वरूपी विद्येमध्यें हे दैवशाली वीरशैवलोक जास्त जास्त रममाण होतात (अभ्यास करितात) म्हणून ह्यांस वीरशैव असें नांव पडलें आहे. विशद्बानें विद्या असा अर्थ घ्यावयाचा, ती विद्या शिव आणि जीव ह्यांच्या ऐक्याचें ज्ञान करून देणारी आहे, त्या विद्येमुळें जे शैवलोक सुख मानतात (त्या विद्येचा अभ्यास करितात) ते वीरशैव होत.

हे वीरमाहेश्वर शिवस्वरूपी विद्येमध्यें रममाण होतात व टाकण्यास योग्य अशा मायेचा कुत्र्याचा त्याग केल्याप्रमाणें त्याग करितात, म्हणूनच त्यांस वीरमाहेश्वर असें नांव पडलें आहे. जें ज्ञान वेदांतापासून उत्पन्न होतें त्यास विद्या असें म्हणतात, त्या विद्येचा जे अभ्यास करितात ते वीर होत.

वीरशैव आणि वीर माहेश्वर यांची आभ्यंतर कृत्यें आणि बाह्य-

कृत्यें (लिंगार्चन) हीं सारखींच आहेत. शिव आणि महेश्वर ह्यांच्यांत फारसा निराळेपणा नाहीं. तसाच वीरशैव आणि वीरमाहेश्वर ह्यांच्यांत निराळेपणा नाहीं. शिवमताभिमानी जे वीरशैव लोक मानसिक लिंग-पूजेची आवड करितात त्यांस वीरशैव असें म्हणतात.

माहेश्वर हस्तकमलांतील क्रिया लिंगपूजेची आवड करितात म्हणून त्यांची वीरमाहेश्वर म्हणून लोकांत प्रसिद्धि आहे. ह्यासाठीं वीरशैव लोकांनीं आपल्या हृदयकमलांत ज्ञानकांडांत सांगितलेलें प्राणलिंगि, शरण, शिवैक्य यांत मोडणाऱ्या (समावेश होणाऱ्या) लोकांप्रमाणें धर्माचरण करावें, व वीरमाहेश्वरांनीं बहि:कर्मकांडांतील भक्त, माहेश्वर प्रसादि ह्यांत समावेश होणाऱ्या लोकांप्रमाणें धर्माचरण करावें.

वीरशैवांचे स्थल आणि धर्म ह्यांच्या निरनिराळेपणामुळें सहा भेद होतात, व त्यांस शास्त्रांत पारंगत असणाऱ्यांनीं भक्त माहेश्वर अशी नावें दिलीं आहेत. वीरशैव लोकांचे शास्त्र स्थलभेदांमुळें, धर्मभेदांमुळें आणि अधिकारिभेदांमुळें सहा प्रकारचें झालें आहे.

प्रथमचे स्थलास भक्तस्थल म्हणतात, त्यानंतरचे दुसरे स्थलास माहेश्वरस्थल म्हणतात, तिसरे स्थलास प्रसादिस्थल म्हणतात त्यानंतरचे प्राणलिंगिस्थल होय. अगस्त्येऋषे, मी अगोदर तुला भक्तस्थल आणि त्याचे दुसरे पोटभेद काय आहेत तें सांगतो, नीट लक्ष देऊन ऐक.

जाला शिवाची भक्ति करावी अशी इच्छा उत्पन्न होऊन तो भक्ति करूं लागला त्यांस भक्त म्हणावें, व तो आपल्या कर्तव्यकर्मा-प्रमाणें स्वधर्मानें जें आचरण करितो त्यास भक्तस्थल म्हणावें.

भक्तस्थलाचे पंधरा पोटभेद (निराळे भेद) विद्वान् लोकांनीं मानिले आहेत, ते येणेंप्रमाणें– १ पिंडस्थल, २ पिंडविज्ञानस्थल, ३ संसारहेयस्थल, ४ दीक्षास्थल, ५ लिंगधारणस्थल, ६ विभूतिधारण-स्थल, ७ रुद्राक्षधारणस्थळ, ८ पंचाक्षरीजपस्थल, ९ भक्तमार्गस्थल, १० गुर्वर्चनस्थल, ११ लिंगार्चनस्थल, १२ जंगमार्चनस्थल, १३ गुरु-प्रसादस्थल, १४ लिंगप्रसादस्थल, १५ जंगमप्रसादस्थल हे होत.

ह्या भक्तस्थलांत ज्ञानी लोकांनीं तीन प्रकारचें दान सांगितलेलें आहे. त्यांचीं नांवें १ उपाधिदान, २ निरुपाधिदान, ३ सहजदान हीं होत. हीं तिन्हीं दानें शिवभक्तानें अवश्य करावीं, अनेक जन्मांत केलेल्या

पुण्यामुळें त्याचा पातकांचा समुदाय नाश पावला असल्यास त्यास हीं दानें करण्याची वृद्धि होते.

शंकरपार्वतीपासून उत्पन्न झालेल्या ह्या संसारांत निष्पाप मनाच्या प्राण्यास पिंड म्हणतात व तो सर्वापेक्षां श्रेष्ठ होतो. ज्याचें पुण्य जास्त आहे, ज्याचें पाप नाहींसें झालें आहे, ज्याचें मन शुद्ध आहे तो पिंड समजावा, असा पिंड प्रत्यक्ष एक शंकरच आहे. तो चित्स्वरूप असून परमेश्वर आहे. त्यास विकल्प नाहीं, तो निराकार आहे, तो निर्गुण आहे, तो निष्प्रपंच आहे. अनादिकालाच्या अज्ञानाच्या संबंधामुळें त्या पिंडाचा अंश, जीव असें नांव पावला.

देव, पशु, पक्षी, मनुष्य वगैरे अनेक प्रकारच्या निरनिराळ्या जातींत तो मायामहेंश्वर (मायेसहवर्तमान परमेश्वर) त्यांच्या मनांत राहतों. व त्यांस तशा तशा रीतीनें वागण्यास लावतो. चंद्रकांत मण्यामध्यें जसें पाणी असते, सूर्यकांत मण्यामध्यें असा अग्नि असतो, धान्याच्या बीजामध्यें जसा अंकुर स्वाभाविकपणें असतोच, तसाच आत्म्यामध्यें शिव रहातो.

ज्याप्रमाणें सूर्यामध्यें बिंबपणा आणि प्रतिबिंबपणा हे दोन्ही गुण राहतात त्याचप्रमाणें ब्रम्हस्वरूपामध्यें एके ठिकाणीं जीवपणा आणि ईश्वरपणा हे दोन्ही गुण राहतात. श्रेष्ठ तत्व अशा चित्स्वरूपांत भोक्तृत्व ( उपभोग घेणाराचा गुण ), भोग्य (उपभोग घेण्याचा गुण), प्रेरकत्व ( प्रेरणा करण्याचा गुण ) हे तिन्हीहीं कल्पिलेले आहेत. त्या परब्रम्हस्वरूपामध्यें सत्वरजस्तमोमय ( त्रिगुणात्मिका ) शक्ति ही अनादि सिद्ध आहे, तिच्या विषमपणामुळें त्या परब्रम्हस्वरूपांत तीन वस्तूंचा निराळेपणा झाला.

रजोगुणात थोडे सत्व आणि थोडे तामस गुण असल्यास त्यास भोक्तृ ( जीवचैतन्य ) असें नांव आहें, अतिशय तामसपणाच्या उपाधियुक्त चैतन्याला भोज्य ( रस वगैरे ) म्हणतात. भोक्ता, भोज्य आणि प्रेरयिता ह्या तीन वस्तु ( वस्तुत्रय ) होत. ब्रम्हस्वरूप अखंड आहे तरी त्याच्यांत सत्वगुण, रजोगुण, तमोगुण ह्यांच्या संबंधानें हें वरील वस्तुत्रय मानिलेलें आहे. ह्या ब्रम्हस्वरूपांत प्रेरणा करणारा शंकर शुद्धउपाधि ( शुद्ध स्वरूप ) असून त्यास महेश्वर म्हणतात. मिश्रा-

सहित असणाऱ्या उपाधि ह्या सर्व भोक्ते होत, त्यांस पशु म्हणतात जें स्पष्ट नव्हें तें भोज्य होय, तें निव्वळ तमोगुणी आहे, प्रेरणा करणारा शंकर हा सर्वज्ञ आहे. जीवास अल्पज्ञ असें म्हटलें आहे, ज्याचें चैतन्य फारच गुप्त आहे अशा जडास अव्यक्त म्हणतात.

उपाधींचे दोन भेद आहेत, एक शुद्ध उपाधि आणि दुसरी अशुद्ध उपाधि, शुद्ध उपाधि ही श्रेष्ठ माया होय, ती आपल्याच स्वरूपांच्या आश्रयानें राहतें व मोहांत पाडते. अशुद्ध उपाधि ही अविद्या होय,त्या अविद्येच्या संबंधानें परमात्मा मोहांत पडतो अविद्या शक्तीच्या भेदामुळें हे अनेक प्रकारचे जीव निर्माण झालेले आहेत असें समजावें. मायाशक्तिच्या सामर्थ्यानें परमेश्वर अनेक प्रकारचे अवतार घेतो. तो सर्वज्ञ आहे, सर्व-कर्ता आहे, नित्यमुक्त आहे व महेश्वर आहे हें सर्व खरें आहे परंतु त्यास मायेमुळें अवतार घ्यावेच लागतात.

जीव हा लहानसहान कर्मे करणारा असून अल्पज्ञ आहे, बद्ध आहे अनादि कालापासून तो देहधारी बनलेला आहे, त्या अविद्येनें भुलून गेलेले प्राणिमात्र (जीव) ब्रम्हैक्याचें ज्ञान न झाल्यामुळे आपापल्या कर्मांप्रमाणें देव, पशु, पक्षी, मनुष्य वगैरे चौऱ्यांशी लक्ष योनींमध्यें जन्मून संसारांत फिरत असतात.

चाकाची धाव ( वाटोळी चाकावरील लोखंडी पट्टी ) वाटेवर जातांना चाकाप्रमाणें सदोदित सारखी फिरत असते, त्याप्रमाणेंच हे देहधारी जीव संसारांत सदोदित फिरत असतात. त्या प्राण्यांस जाति, आयुष्य, भोग, वैषम्य सुख दुःख वगैरे कमजास्ती करण्यास कर्म कारण ( मूळ ) आहे. ( कर्माप्रमाणें त्यांस जाति, आयुष्य, सुख दुःख भोगावें लागतें. ) कर्मरूप यंत्राच्या फेऱ्यांत सांपडून गरगर फिरणाऱ्या ह्या प्राणिमात्रांचा परमेश्वर (शिव) प्रेरक (प्रेरणा करणारा) व साक्षी (साक्षीदार आहे.) प्राणिमात्रांचा शंकर हा प्रेरक असून कल्याणकारक मार्गांचा उपदेश करणारा आहे, जन्म मरण चुकवून मोक्षप्राप्तीचा उपदेश करणारा आहे.

आपलें कर्म परिपक्व झालें (क्षय होण्याच्या स्थितीस येऊन पोंचलें) म्हणजे वाईट वाईट इच्छांचा नाश होतो व नंतर शंकराचे कृपेनें ह्या जीवांचे मन शुद्ध होतें. शुद्ध कर्माचा उदय आला म्हणजे

जींवाचें अंतःकरण शुद्ध होतें व शंकराच्या कृपेनें त्याच्या हातून उत्तम प्रकारची शिवभक्ति घडते. जो जीव त्याच देहामध्यें (त्याच जन्मामध्यें) मोक्षास जातो त्या प्राण्यास पिंड म्हणतात.

शरीर आणि आत्मा (जीव) ह्याचें ज्याला ज्ञान असतें तो पिंडज्ञानी होय. चार्वाक (नास्तिक लोक) शरीरालाच आत्मा म्हणतात. चार्वाकमताच्या योग्यतेचे दुसरे कोणी मतवाले इंद्रियांच्या समुदायास आत्मा म्हणतात. बुद्धि हेंच मुख्य तत्व मानण्यावरून ज्यांस बौद्ध असें नांव पडलें आहे ते बौद्ध बुद्धीलाच आत्मा म्हणतात.

इंद्रियांस किंवा शरीरास किंवा बुद्धीस आत्मा मुळीच म्हणतां येत नाही कां तर मी असा शब्द करणारा कोणी तरी निराळा आहे असें उघड रीतीनें दिसून येतें. सारांश, शरीर, बुद्धि आणि इंद्रिय ह्यांहुन आत्मा हा निराळा आहे आणि तो चिरकालापासून आहे. असा आत्मस्वरूपाचा ज्याला विचार आहे त्याला पिंडज्ञानी म्हणावें.

कर्मप्रमाणें अनेक तऱ्हेचीं घ्यावीं लागणारीं रूपें (शरीरें) हीं नश्वर (नाशवंत) आहेत त्या शरीरांत राहणारा आत्मा हा नित्य आहे त्याचा नाश होत नाहीं असा विचार करणें त्याला शहाणपण (पिंडज्ञान) म्हणावें. शरीराहून आत्मा वेगळा आत्म्याहून ईश्वर वेगळा आणि तो ईश्वरच प्रेरक आहें त्या ईश्वराला जो जाणतो त्याला पिंडज्ञानी म्हणावें.

ज्याच्या मनोरूप कमलांतील (मनांतील) वाईट वासना सर्व नाहीशा झाल्यामुळें जो प्राणी आत्मा नित्य आहे शरीर अनित्य आहे असा मनामध्यें नेहमी विचार करितो त्याला चांगली बुद्धि उत्पन्न झाली म्हणजे तिच्या सामर्थ्यानें संसार सोडून द्यावा असें वाटूं लागतें.

ह्या लोकांत (मृत्युलोकांत) मुलें बायको वगैरेपासून होणारें सुख क्षणभंगुर आहे असें समजून आल्यावर स्वर्गलोकांत तरी जन्म मरण आहेतच तेव्हां स्वर्गसुखाविषयीं आवड कोणता शहाणा मनुष्य करील ? कोणीं करणार नाहीं. (मृत्युलोकाच्या सुखाप्रमाणेंच स्वर्गलोकाचें सुख क्षणभंगुर आहे.)

जो जन्मला त्याला मरण आहेच जो मेला त्याला पुन्हा जन्म आहेच. सारांश, प्राणी जन्ममरणामुळें चाकासारखा फिरत असतो.

विष्णु महासामर्थ्यवान आहे खरा. परंतु कर्म कोणास चुकलें नाहीं मत्स्य, कूर्म, वराह, नारसिंह, दाशरथि राम, परशुराम वगैरे अनेक जन्म त्यानें घेतलें तो महासामर्थ्यवान होता परंतु मरण त्यासही चुकलें नाहीं. जितकें वेळ जन्मास आला तितकेच वेळ मरण पावला. कर्मांच्या स्वाधीन असणारा प्राणी ब्राम्हण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र वगैरे जातीमध्ये जन्मला तरी आध्यात्मिक, आधिभौतिक, आधिदैविक ह्या तीन प्रकारच्या तापरूप अग्नीमध्यें भाजून सारखा तळमळत असतो. दुःखाचें मूळ कारण कर्म आहे. त्या आध्यात्मिक, आधिभौतिक आधि-दैविक नांवाच्या तीन प्रकारच्या दुःखानें गांजून गेलेल्या मनुष्यास विश्रांति कोठून मिळणार ?

त्या तीन प्रकारच्या दुःखापैकीं आध्यात्मिक नांवाचे ( आत्म्या-पासून होणारें ) दुःख पहिलें होय, आधिभौतिक ( इतर लोकांपासून होणारें ) दुसरें असून आधिदैविक ( देवादिकापासून भूतपिशाचांपासून होणारें ) दुःख तिसरें होय, अशी तीन प्रकारचीं दुःखें आहेत. आध्या-त्मिकाचें दोन भेद आहेत एक वाह्य आणि एक अभ्यन्तर, वात, पित्त, कफ वगैरेपासून उत्पन्न होणारें बाह्याऽध्यात्मिक दुःख होय. काम क्रोध, राग, द्वेष, वगैरे षड्रिपूंपासून उत्पन्न होणारें दुःख अभ्यन्तराध्यात्मिक होय. राजा वगैरें इतर लोकांपासून उत्पन्न होणारें दुःख आधिभौतिक होय.

ग्रह, यक्ष, भूत, पिशाच इत्यादिकांपासून उत्पन्न होणारें दुःख आधिदैविक होय. ह्या तीन प्रकारच्या दुःखानीं पींडलेल्या कर्मबद्ध मनुष्याला तो स्वर्गांत असो किंवा मृत्युलोकीं असो त्याला सुख म्हणून मिळत नाहीं. विजांमध्यें, पाण्याच्या लाटांमध्यें, दिव्याच्या प्रकाशा-मध्यें तसेंच कर्माप्रमाणें प्राप्त होणाऱ्या संपत्तीविषयी स्थिरपणाची बुद्धि कोणाची असेल ? विजा, पाण्याच्या लाटा, दिव्याचा उजेड आणि संपत्ति ह्या सर्व चंचल आहेत असें सर्वांस कळून चुकलें आहे.

हें शरीर विष्ठा, मूत्र, वगैरे दुर्गंधि पदार्थांचें कोठार आहे, त्यापासून आत्म्यास अनेक प्रकारची मोठमोठी दुःखे सोसावी लागतात. व तसेंच हे शरीर विजेप्रमाणें चंचल आहे. ह्याविषयीं कोणता शहाणा अभिमान धरील व ह्यावर प्रीति करील ? ह्या शरीरावर कोणताही

शहाणा प्रीति करणार नाहीं. आत्मसत्व नित्यानंदस्वरूप असून चित्स्वरूप आहे त्या तत्वाचा त्याग करून कोणता शहाणा मनुष्य नाशवंत अशा आणि अनेक प्रकारची दुःखें भोगण्यास लावणाऱ्या शरीरावर प्रेम करील ? शहाणा मनुष्य शरीरावर प्रेम करून आत्मस्वरूपाकडे दुर्लक्ष्य कधींही करणार नाहीं.

ज्यांचें मन निष्पाप आहे व ज्याला आत्मस्वरूपाचा वास्तविक अनुभव आला आहे तो विचारी मनुष्य दुःखाचे मूळ अशा आपल्या स्वतःचें शरीराविषयीं, स्त्रियेविषयी, मुलाबाळाविषयी, मित्राविषयी, नातलगांविषयीं, द्रव्याविषयीं वंशाच्या रीतीविषयीं हें सर्व क्षणभंगुर आहेत असें समजून त्यांवर प्रेम न करितां उदासीनपणें राहून वैराग्य धारण करतो.

जो विचारी आहे व विषयसुखाविषयीं निरिच्छ आहे, आत्मस्वरूपाची आवड करणारा आहे त्या मनुष्याला संसारातील दुःखाचा नाश व्हावा अशी बुद्धि उत्पन्न होते.

जो मनुष्य नित्य काय ? आणि अनित्य काय ? ह्याचा विचार करितो, जो वेदशास्त्रांत सांगितलेलीं सत्कर्मे करितो ज्याचें मन निष्पाप आहे. ज्याला ब्रम्हदेव, विष्णु, इंद्र वगैरे मुख्य मुख्य देवांचें ऐश्वर्य देखील क्षणभंगुर असल्यामुळें तुच्छ वाटतें त्या मनुष्याला नित्य आनंदमय असणाऱ्या, सर्व जगांतील लोकांच्या संसारदुःखाचा नाश करणाऱ्या, चंद्र मस्तकावर धारण केलेल्या शंकराविषयीं भक्ति उत्पन्न होते. ती भक्ति संसारदुःखाचा नाश करिते.

ह्याप्रमाणें वीरशैवांच्या धर्मांचा निर्णय असलेल्या सिद्धान्तशिखामणींतील भक्तस्थलांतील पिंडज्ञान आणि संसारहेयस्थल (संसार सोडून देण्याची बुद्धि होणें) हें वर्णन असलेला हा पांचवा दीप संपूर्ण झाला.

## = दीप ६ वा =

नंतर शिवभक्तीची आवड उत्पन्न झालेला, निष्पापमनाचा मनुष्य विचार करून करून वैराग्य उत्पन्न झाल्यावर शिवपरब्रम्ह महालिंग समजून घेण्यासाठीं सर्व संसारांतील पातकांचा नाश करणाऱ्या शिवयोग्यास (श्रीगुरूला) शरण जातो तो शिवयोगी (गुरु) सामान्य नव्हे

तो सर्व लोकांत प्रसिद्ध असा असतो, त्याला मोह आणि लोभ हे नसतात तो नेंहमी आत्मतत्वाचा विचार करीत असतो, त्याची विषय सुखाची भ्रांति दूर झालेली असते. शिवसिद्धान्ताचें रहस्य त्यास कळून चुकलेलें असतें, त्याचे सर्व संशय आणि हौस वगैरे पुरलेली असते ( त्याची कशांतही आशा गुंतलेंली नसते) सर्व तंत्रे आणि त्याचे प्रयोग त्यास माहीत असतात. तो धार्मिक असून सर्वदा खरें बोलतो, तो आपल्या वाडवडलांपासून चालत आलेली रीति कधी सोडीत नाही तो वाईट रीतीनें कधीही वागत नाही तो नेंहमी शंकराचें ध्यान करण्यांत गुंतलेला असतो, त्याचा स्वभाव फार शांत असतो, तो नेह्मी शिवतत्वाचा विचार करीत असतो. तो नेह्मी आपले आंगांस भस्म लावितो व भस्माच्या रहस्याचा नेह्मी विचार करितो, त्याला त्रिपुंड्र लावण्याची फार आवड असते, व त्यानें गळयांत रुद्राक्षाच्या माळा घातलेल्या असतात. तो नेंहमी लिंगधारण करितो, तो नेह्मी लिंगपूजा करण्यांत गुंतलेंला असतो, लिंग, अंग आणि संबंध ह्याची त्याला माहिती असते त्याची शिवाच्या अद्वैत शास्त्रावर फार आवड असते. लिंगांगस्थलांतील एकोत्तर शतस्थलाची त्यास माहितीं असते, तो नेह्मी शिवनामाचा जप करीत असतो. त्या श्रेष्ठ आचार्याची गुरूचीं मन शुद्ध झालेला भक्त भक्तिपूर्वक व त्या गुरूच्या योग्यतेमुळें स्वाभाविकपणाच्या भीतीने नम्रपणानें सेवा करतो.

ती सेवा गुरु प्रसन्न होईपर्यंत सहा महिने किंवा वर्षभर देखील करावी लागते शिष्याच्या वर्ष सहा महिन्याच्या भक्तीनें गुरु प्रसन्न झाल्यावर त्या तत्वज्ञानाचा मार्ग दाखविणाऱ्या श्रेष्ठ आचार्यास (गुरूस) नम्रतापूर्वक दोन्ही हात जोडून शिष्य प्रार्थना करितो कीं, हे गुरुश्रेष्ठा, तूं मोठा भाग्यवान् आहेस, शिवज्ञानाचा महासमुद्र आहेस. हे श्रेष्ठा गुरुवर्या, मी तुला शरण आलों आहे मला संसाररूप रोग झाला आहे तो बरा करून माझें रक्षण कर. ह्याप्रमाणें निष्पापमनाच्या शिष्यानें विनती केल्यावर तो श्रेष्ठगुरु हा शिष्य शक्तिपात करण्यास योग्य आहे (अनुग्रह करण्यास योग्य आहे) असें जाणून त्याला दीक्षा देण्याचा विचार करितो.

ज्या दीक्षेमध्यें शिष्याला गुरुकडून शिवज्ञान मिळतें व त्याचें

संसाराचें बंधन तुटतें म्हणून त्या संस्कारास शहाणे लोक दीक्षा असें म्हणतात.

अगस्त्यऋषे, शिवागम जाणणाऱ्यांनीं ती दीक्षा तीन प्रकारची मानलेली आहे, तो अशी, १ वेधारूपादीक्षा, २ क्रियारूपादीक्षा, ३ मंत्ररूपादीक्षा, गुरुनें शिष्याकडें कृपादृष्टीनें पाहणें व त्याच्या मस्तकावर आपला वरद हात ठेवणें ह्यामुळें त्या शिष्याचे आंगीं जो शिवपणा येतो ती वेधादीक्षा होय.

ज्या दीक्षेमध्यें फक्त गुरु शिष्याला मंत्राचाच उपदेश करितो ती मांत्रीदीक्षा होय. कुंड, मंडल वगैरे क्रिया करून जी दीक्षा देतात ती क्रिया दीक्षा होय. ह्या दीक्षेनंतर लिंगधारण करावें लागतें म्हणून तिला क्रियादीक्षा म्हणतात

चांगल्या महिन्यांत चांगल्या तिथीस, चांगल्या दिवशीं चांगल्या वेळीं शिव भक्तांस अगोदर विडा देऊन नंतर विभूति देऊन विधीपूर्वक योग्यरीतीनें गुरु शिष्यास दीक्षा घ्यावयाच्या ठिकाणी आणून, त्यास स्नान करण्यांस सांगून स्नान करवितो, त्यास पांढरें वस्त्र नेसण्यास देतो. त्याचे दांत घांसून तोंड स्वच्छ धुणें झाल्यावर त्या शिष्याचे तोंड पूर्वेकडे करून त्याला मंडलावर बसवितो व आपण त्या मंडलावर उत्तरेंकडें तोंड करून बसतो व शिवाचें नांव घेण्याचें सांगून त्याचेंच वारंवार चिंतन करावयाचें सांगतो

त्याचे कपाळीं विधीप्रमाणें योग्य ठिकाणी विभूति लावतो. नंतर पांच ब्रम्हस्वरूप म्हणून तेथें स्थापन केलेल्या कलशांतील पाणी घेऊन गुरू ऋत्विजांकडून शिष्यास तीनवेळा सिंचन करवितो. शिष्यास ऋत्विजांनी सिंचन केल्यावर त्या मंडलावर बसलेंल्या शुचिर्भूत अशा त्या शिष्यास संसाराच्या भयापासून सोडविणाऱ्या शिवपंचाक्षरी मंत्राचा उपदेश त्याचे उजव्या कानांत करितों. तो मंत्र कोणास ऐकूं न जाईल इतका हळू स्वरानें करितो, त्या मंत्राचा ऋषि, छंद स्वरूप त्याची देवता व त्याचा न्यास करण्याचा क्रम वगैरे सर्व सांगतो. येथें गुरुकारुण्य स्थल संपलें. नंतर गुरु त्या शिष्याकरिता स्फटिकाचें किंवा पर्वतावरील एखाद्या उत्तम दगडाचें किंवा चंद्रकांत मण्यांचें, नर्मदानदीत सांपडणाऱ्या बाणाचें किंवा सूर्यकांत मण्याचें एक लिंग आणवितो.

लिंग कोणत्याही तऱ्हेनें दोष देण्यास योग्य नसून निर्दोष असलें म्हणजे तें पुन्हा शुद्ध करून सिंहासनावर ठेवून त्यास अभिषेक करितो व त्यास गंध आणि फूल वाहतो. व शिष्याचा प्राण त्या लिंगांत स्थापन करितो. नंतर तें लिंग मंत्रानें पवित्र झालें म्हणजे गुरु त्या लिंगांत शिवकला शिष्यमस्तकांतील (शिवशक्ती) योग्य रीतीनें स्थापन करितो. तें लिंग त्या शिष्याचे प्राणांत दृढ निश्चयानें स्थापन करितो. इतकें करून गुरु शिष्याच्या हातांत लिंग देतो.

हे लिंग तूं प्राणासारखे जपत जा, केव्हांहीं व कोठेंही तुझ्या शरीराची आणि ह्या लिंगाची तुटातूट होऊं देऊं नकोस. नेहमीं शरीरावर हें लिंग राहूं दे. एखादे वेळीं हयगयीमुळें तुझ्या शरीरावरून खालीं जमीनीवर लिंग पडेल तर लागलाच जीव दे म्हणजें तुला मोक्षप्राप्ति होईल. असा उपदेश दिल्यावर शास्त्र जाणणाऱ्या गुरूच्या आज्ञेप्रमाणें त्या शिष्यानें शंकराच्या शक्तीनें युक्त असणारें तें लिंग आपल्या प्राणासारखें धारण करावें (त्या लिंगास प्राणासारखें जपावें) लिंगाचें धारण करणें हें पुण्यकारक असून त्यापासून सर्व पातकांचा नाश होतो असे आगमाचा अर्थ जाणणारे सर्व ऋषीश्वर माननात.

सर्व प्रकारचे मनोरथ पूर्ण करूं इच्छिणाऱ्या, मोक्षप्राप्तीची इच्छा करणाऱ्या, मुनीश्वरांनीं बाह्य आणि अभ्यंतर असे लिंगधारणाचे दोन प्रकार मानिले आहेत. चित्स्वरूप हें शंकराचें श्रेष्ठ लिंग असून सर्व जगाला कारण आहे तें चित्स्वरूपलिंग जो मनामध्यें धारण करितो तें अभ्यंतर लिंगधारण होय.

चिद्रूप हें श्रेष्ठ तत्व आहे, त्याला शिव म्हणतात, तें सर्व जगाला कारण आहे, विश्वांतील (जगांतील) अनेक प्रकारच्या पातकांचा तें नाश करितें, ते निष्कल (कलाहीन) असून त्यास विकल्प नाहीं. अक्षय आनंदमय असून प्रकाशमय असल्यामुळें ज्याचा प्रकाश जिकडे तिकडे व्यापलेला आहे, अतएव तुर्य पदार्थाच्या पलीकडे असणाऱ्या ज्या सप्तदशकला (सतरा कला) त्या कलांनी व्याप्त आहे, असें ब्रम्हरूपाचें वर्णन करतात. त्याचें प्रमाण करतां येत नाही, तें अमुक प्रकारचें आहे म्हणून दाखवितां येत नाहीं. मुक्ति प्राप्त व्हावी म्हणून इच्छा करणारे लोक त्या चित्स्वरूपाची उपासना करितात.

तें लिंग ब्रम्हस्वरूप असून तें श्रेष्ठ आहे, तें प्रपंचातीत (निष्पपंच) आहे, त्यास नाश नाहीं. हेंच लिंग सर्व प्राणिमात्रांच्या मनांत स्थूल, सूक्ष्म व कारण ह्या शरीरांत परिपूर्णपणानें भरलेलें आहे. तें महालिंग सर्व प्राणिमात्राच्या पूर्ण हृदयांत, मध्य हृदयांत, भोंवयांच्या मध्यभागीं नेहमीं राहतें त्याला सर्व आगम ब्रम्ह असें म्हणतात.

लिंग हें परिपूर्ण आहे, त्याचे भाग होत नाहींत, तें उघड रीतीनें दिसत नाहीं, तें सनातन आहे तरी भक्त लोकांस उपासना करितां यावी ह्यासाठीं तें लिंग आपल्या मायेच्या सामर्थ्यानेंच इष्ट, प्राण आणि भाव असें तीन रूपांचें झालें आहे.

हें सर्व स्थावर जंगम विश्व ज्यांत लय पावतें व पुन्हा पुन्हा जन्मास येतें (उदय पावतें) तें हें लिंग ब्रम्हस्वरूप असून शाश्वत आहे. म्हणूनच ह्याला लिंग म्हणतात. तें लिंग सत्तास्वरूप, आनंदस्वरूप आणि चित्स्वरूप आहे. त्यांत मोठेपणा व सृष्टि उत्पन्न करण्याची शक्ति असल्यामुळे त्यास ब्रम्ह म्हणतात.

आधाराच्या ठिकाणीं, हृदयाचे ठिकाणीं, किंवा दोन्ही भोंवयांचे मध्यभागीं तेजःपुंज लिंगाचें ध्यान करणें हें आभ्यंतरलिंगधारण होय. आधारस्थलांत शिवयोग्यानें सुवर्णासारखें लिंग मानून त्याचें ध्यान करावें. हृदयांत पोंवळ्यासारखे लिंग आहे असें मानून त्याचें ध्यान करावें. दोन्हीं भोंवयांच्या मध्यें स्फटिकासारखें स्वच्छ लिंग आहे असें मानून त्याचें ध्यान करावें.

आभ्यंतर लिंग धारण करणें ह्याला निरुपाधिक (उपाधिरहित) लिंगधारण असें म्हटलें आहे. हें आभ्यंतर लिंगधारण बाह्य लिंगधारणापेक्षां कोटिपटीनें ज्यास्त श्रेयकर आहे. जें पुरुष चित्स्वरूप शंकराचें लिंग हृदयांत धारण करितात त्यांस ह्या भयंकर संसारचक्रांत पुन्हां जन्म घ्यावा लागत नाहीं.

आभ्यंतर लिंगधारण करणें, आत्मविद्येचा परिश्रम करणें, गुरूची सेवा करण्यांत आपली सर्व शक्ति खर्च करणें ह्या तीन गोष्टी मोक्षरूपसंपत्ती प्राप्त होण्यास कारण आहेत. (ह्या तीन गोष्टींमुळें मोक्षप्राप्ति होते.) जे लोक स्वतः वैराग्यवान् असून ज्यांस तत्वज्ञान झालें आहे, ज्यांचें मन स्थिर आहे, त्यांची बुद्धि अभ्यंतर लिंगाचें ध्यान करण्याकडे

लागते, बाह्यलिंगाकडे लागत नाहीं.

ब्रम्हदेव, विष्णु, रुद्र, इंद्र वगैरे लोकपाळ सर्व मुनि, सिद्ध, गंधर्व, दानव, मानव तसेच. सर्व प्राणी ज्ञानाच्या साधनानें सर्व कारणांस कारण असणारें परमानंद ज्याचें लक्षण आहे असें लिंग आपल्या हृदयांत ध्यान करितात (पाहतात). ह्यासाठीं हरएक प्रकाराचें तें उत्तम लिंग सर्व प्रकारचे कष्ट दूर होण्यासाठीं विद्वान् मनुष्यानें हृदयांत आठवावें (ध्यान करावें).

मनांत लिंगधारण करण्यास जो कोणी असमर्थ असेल किंवा समर्थ असूनही तसें करण्यास कांहीं अडचण असेल तर त्यानें बाह्यलिंगधारण करावें तें आभ्यंतर लिंगाचेंच स्वरूप आहे असें पक्कें ओळखावें. महालिंगाचे तीन भेद आहेत, ते असे—स्थूल, सूक्ष्म आणि परात्पर हे होत. स्थूल लिंगास इष्टलिंग म्हणतात तें लिंग बाह्य शरीरावर (अंगावर) धारण करावें लागतें.

इष्टलिंग भक्ति करण्यास योग्य असून त्याचीं जितकीं भक्ति करावी तितकी थोडीच आहे, ते स्पष्ट दिसत (समजत) नाहीं, त्याला श्रेष्ठ शंकर असें नांव आहे. ह्यापासून (इष्टलिंग धारण केल्यापासून) सर्व संकटें दूर होतात, ह्यासाठीं ज्ञानीं मनुष्यानें नेहमीं इष्टलिंग आपल्या शरीरावर धारण करावे.

शंकराचीं शक्ति असणारें तें इष्टलिंग डोकीवर किंवा गळ्यांत किंवा काखेंत किंवा उरावर किंवा कमरेस किंवा हातास तरी बांधावें. लिंग धारण केल्यावांचून राहूं नये. बेंबीच्या खालीं लिंग धारण केल्यास (बांधल्यास) पाप लागतें तसेंच जटांच्या शेंड्यास (केशांच्या टोकास), पाठीस किंवा मलमूत्र विसर्जन करण्याच्या इंद्रियांस लिंग बांधूं नये. लिंग धारण करणारा मनुष्य नेहमीं पवित्र असतो. त्यानें आपलें मनोहर लिंग जीवापेक्षां ज्यास्त जपावें व आपल्या हस्तरूपी सिंहासनावर गंध, फुलें वाहून त्याचीं पूजा करावी.

दुसरें इतर धातूंचें सिंहासन करण्यापेक्षां हें हाताचें सिंहासन फार चांगलें आहे, सर्व वीरशैव लोक आणि मोक्षप्राप्तीची इच्छा करणारे मुमुक्षु लोक आपल्या हस्तरूप सिंहासनावरच इष्टलिंगाची पूजा करितात ब्रम्हदेव, विष्णु वगैरे देव, गौतमादिक मुनीश्वर नेहमीं बहुत करून

आपल्या मस्तकावर इष्टलिंग धारण करितात. लक्ष्मी वगैरे सर्व शक्ति शिवभक्तांची फार आवड असल्यामुळें नेहमीं आपल्या डोकीवर लिंग-धारण करितात. वेद शास्त्र पुराण व कामिकागम वगैरे आगमांत वीरशैवांनीं लिंगधारण अवश्य केलें पाहिजे म्हणून सांगितलें आहे.

ऋग्वेद म्हणतो, हे ब्राम्हणश्रेष्ठा, तुझें लिंगधारण करणें पवित्र असल्याबद्दल सर्वत्र प्रसिद्धि आहे. ह्यासाठी तें आरोग्यकारक शिवलिंग अवश्य धारण करावें. तें पवित्र आहे.

ब्रम्ह म्हणजे लिंग होय. ब्रम्हाचा म्हणजे लिंगाचा पति ईश्वर आहे, ह्यामुळें त्या लिंगाची प्रसिद्धि असून तें पवित्र आहे, तें शिवलिंग धारण केल्यानें मनुष्याचें शरीर पवित्र होतें. ज्यानें तपश्चरण केलें नाही, जो अज्ञान आहे ज्यास पुरतें वैराग्य झालें नाहीं, ज्याला शिवमंत्राचा संस्कार झाला नाहीं, ज्यानें दीक्षा घेतलेली नाहीं, त्यानें इष्टलिंग कधींही धारण करूं नये.

यजुर्वेदांत असें म्हटलें आहे कीं, हे शंकरा, तुझें शरीर भयंकर नाहीं, निष्पाप स्वभावांच्या भक्तांच्या मनांत तें सदोदित शोभतें, तें तुझें शरीर मंगलकारक आहे तेंच लिंग होय, तें लिंग ज्याअर्थीं वीरशैव आणि शैव धारण करितो त्याअर्थीं तो निष्पाप आहे. त्याला पातक मुळींच लागत नाहीं.

जो मनुष्य इष्टलिंग धारण करितो, ज्यानें आपली इंद्रियें वश केलीं आहेत, जो नेहमीं आपलें लक्ष्य शिवपूजेकडे लावितो, त्यानें सर्व पातकांचा नाश व्हावयासाठीं भस्म लावण्याचा जसा विधि शास्त्रांत सांगितला आहे त्या विधीनें भस्म लावावें. भस्म हें चांगले आणि पातक नाश करणारें आहे.

ह्याप्रमाणें वीरशैव धर्माचा निर्णय असलेल्या सिद्धान्तशिखामणि-ग्रंथांतील भक्तस्थलांतील गुरुकृपेनें लिंगधारण करण्याचा विधि सांगितला असलेला हा सहावा दीप संपला.

## = दीप ७ वा =

श्री सांबसदाशिवास नमस्कार असो. विभूतिस्थल– जो मनुष्य भस्म धारण करितो जो पवित्र असतो, ज्याचे इंद्रियगण नेहमीं ताब्यांत

असतात भस्माला शिव म्हणतात. भस्म सुशोभित दिसतें ह्या त्याचें गुणावरून त्यास भसित म्हणतात. शंकराचें सर्व अंग भस्मानें लेपन केलेलें असतें त्यामुळें तों महादेव तेजःपुंज दिसतों त्याचें स्मरण करून जे दैवशालीं भस्म लावितात ते मुख्य आणि धन्य होत.

तंत्रवेत्ते ( शिवागम चांगल्या तऱ्हेनें जाणणारे लोक ) पंचब्रम्ह मंत्रांच्या न्यासांमुळें शिवमंत्रसंस्कृत अशा अग्नीपासून जें भस्म तयार होतें त्यास उपाधिकभस्म असें म्हणतात. विभूति, भसित, भस्म, क्षार, रक्षा हीं पांच नांवें पांच कारणांवरून भस्मास पडलेलीं आहेत.

भस्म लावल्यानें भूति (ऐश्वर्य) येते म्हणून भस्मास विभूति असें नांव पडलें. भस्म लावल्यानें शिवरहस्याचें भासन होतें म्हणून भस्मास भसित असें नांव पडले. पातकांचें भर्त्सन (निंदा) करून त्या पातकास भस्म दूर पिटाळून लावितें म्हणून त्यास भस्म म्हणतात. भस्म धारण केल्यामुळें संकटें नाश पाऊं लागतात म्हणून भस्मास क्षार असें नांव पडलें. भस्म लावल्यापासून भूत, प्रेत, पिशाच वगैरेपासून आपलें रक्षण म्हणून भस्मास रक्षा असें नांव पडलें

नंदा, भद्रा, सुरभी, सुशीला, आणि सुमना. ह्या पांच गाई शंकराच्या सद्योजात वगैरे पांच मुखांपासून पांचजणी उत्पन्न झाल्या, सद्योजात मुखापासून नंदा झाली, वामदेवमुखापासून भद्रा झाली अघोर-मुखापासून सुरभि झाली. तत्पुरुषमुखापासून सुशीला झाली व ईशानमुखापासून सुमना उत्पन्न झाली. त्यांचें रूप अनुक्रमानें कपिल, काळें, पांढरें, धुरकट आणि लाल असें आहे. नंदा कपिल वर्ण आहे, भद्रा काळी आहे. सुरभी पांढरी आहे, सुशीला धुरकट रंगाची असून सुमना लाल आहे. सद्योजातमुखापासून उत्पन्न झालेल्या नंदेपासून विभूति झाली, वामदेवमुखापासून उत्पन्न झालेल्या भद्रेपासून भसित झालें. अघोरमुखा-पासून उत्पन्न झालेल्या सुरभीपासून भस्म झालें, तत्पुरुषमुखापासून उत्पन्न झालेल्या सुशीलेपासून क्षार झालें. ईशानमुखापासून उत्पन्न झालेल्या सुमनेपासून रक्षा झाली व तें भस्म तयार होण्यास त्या त्या मुखापासून उत्पन्न झालेल्या नंदा, भद्रा, सुरभि, सुशीला आणि सुमना ह्या पांच गाई कारण आहेत.

नित्यकर्माचे वेळीं विभूति अवश्य लावावी, एखादेवेळीं कांहीं

नैमित्तिकाकार्ये करणें झाल्यास भसित लावावें सामान्य कार्यांच्या वेळीं क्षार लावावें. तसेंच विज्ञान् मनुष्यानीं कोणत्याही प्रकारची प्रायश्चित्तें करणें झाल्यास विधिपूर्वक भस्म लावावें आणि मोक्ष प्राप्त करून घ्यावयाचा असेल त्यावेळीं रक्षा लावावी.

नंदा, भद्रा, सुरभि, सुशीला आणि सुमना ह्या पांच गाईंचे रंग कपिल, काळा, पांढरा, धुरकट आणि लाल म्हणून सांगितला आहे त्याचप्रमाणें विभूतीचा कपिल रंग, भसिताचा काळा रंग, भस्माचा पांढरा रंग, क्षाराचा रंग धुरकट असून रक्षेचा रंग लाल असतो.

आगमशास्त्र जाणणाऱ्यांनीं भस्माच्या उत्पत्ति चार प्रकारच्या मानिलेल्या आहेत त्या अशा १ कल्प, २ अनुकल्प, ३ उपकल्प आणि ४ अकल्प ह्या होत. ह्या चार जातीपैकीं कल्पजातीचें भस्म उत्तम आहे, बाकी तीन जाती उत्तम भस्म मिळालेंच नाहीं तर उपयोगांत आणाव्या. शेण गोळा करण्याच्या ज्या रीति शास्त्रांत सांगितल्या आहेत त्या रीतीप्रमाणें ताजें शेण जमा करावें. सद्योजात मंत्रानें तें ताजें शेण जमीनीवर न पडूं देतां अधांतरींच धरावें आणि वामदेवमंत्रानें त्या ताज्या जमविलेल्या शेणाचे लहान लहान गोळें तयार करावे. तत्पुरुषमंत्रानें ते गोळे चांगले वाळवावे व वाळल्यानंतर अघोरमंत्रानें ते गोळे शिवमंत्र-संस्कृत झालेल्या अग्नीनें जाळून भस्म तयार करावें. ईशानमंत्रानें तें भस्म बेलाच्या वगैरे पात्रांत ठेवावें त्या भस्मास कल्प (उत्तम भस्म) म्हणतात. आतां अनुकल्प कशास म्हणतात तें सांगतों. रानांतील शेण वाळलेलें असेल तें आणून त्याचा चुरा करून तें पूर्वीच्या रीतीप्रमाणें जाळून जें भस्म तयार होतें तें अनुकल्प भस्म होय. बाजारांतील भस्म वस्त्रानें गाळून तें गोमूत्रांत पुन्हां चांगलें भिजवून त्याचे तयार केलेले गोळे. वाळल्यावर पूर्वीच्या विधीप्रमाणें जाळले असतां जें भस्म तयार होतें तें उपकल्पक भस्म होय. दुसऱ्याकडून (मंत्रज्ञान नसणाऱ्याकडून) आयतें भस्म मागून आणावयाचें मग तें त्यानें कोणत्या तऱ्हेनें तयार केलें हें पाहावयाचें नाहीं त्या भस्मास अकल्पक भस्म म्हणतात.

हे भस्माचे चार प्रकार सांगितले त्यापैकीं कोणत्याही एका प्रकारचें भस्म लहानशा कळशींत किंवा दुसऱ्या कोणत्या एखाद्या पात्रांत ( करंड्यांत ) निरनिराळें भरून ठेविलें असेल त्यापैकीं कोणत्यातरी

एका भस्मानें तीनवेळ स्नान करावें किंवा जशी आपली शक्ति असेल त्याप्रमाणें एकवेळ तरी स्नान करावें. ( तीनवेळ किंवा एकवेळ भस्म घेऊन आपल्या सर्व आंगास लावावें. )

स्नान करावयाच्या वेळीं हात आणि पाय स्वच्छ पाण्यानें धुवावे, नंतर डाव्या हातावर भस्म घेऊन त्यावर उजवा हात झांकावा नंतर मौन धारण करून आठवेळ मूलमंत्रानें अभिमंत्रण करावें, नंतर ईशान-मंत्रानें भस्म मस्तकास लावावें, तत्पुरुषमंत्रानें मुखास लावावें तसेंच. अघोरमंत्रानें हृदयास भस्म लावावें, वामदेवमंत्र म्हणून गुह्यस्थलास भस्म लावावें. सद्योजात मंत्रानें दोन्ही पायांस भस्म लावावें व ॐकार उच्चार करून सर्व आंगास भस्म लावावें. ( सेचन करावें ).

हें भस्मस्नान झालें, हें आग्नेयस्नान ( भस्मस्नान ) उत्तम आहे, वारुणादिक ( जलादिक ) इतर स्नानांमध्यें हें स्नान उत्तम असून त्यामुळें पातकाचा नाश होतो. दररोज नियमानें विधिपूर्वक भस्मस्नान करणाऱ्या पुरुषांस शरीराचा फक्त मळ दूर करणाऱ्या इतर जल-स्नानांचें कांहींएक कारण नाहीं भस्मस्नानास आग्नेयस्नान म्हणतात तें संन्यासी लोकांनीं करावें, पाण्याच्या स्नानापेक्षां भस्मस्नान श्रेष्ठ आहे, कां तर पाण्याच्या स्नान करण्यामध्यें जसा जीवनाश होतो तसा भस्मस्नानांत होत नाहीं. जल हें गर्भवासाचा संबंध ( प्रकृति ) जुळ-विण्यास कारण आहे, तो गर्भवासाचा संबंध ( प्रकृति ) बंधन होय असें मानतात, ते ह्यास्तव त्या प्रकृतिचा नाश होण्यासाठी ( जल-स्नानानें होणारे दोष दूर होण्यासाठीं ) भस्मस्नान करणें योग्य आहे.

ब्रम्हादिक सर्व देव नारदादिक सर्व ऋषि सनकसनंदन वगैरे योगी आणि बाणासुर वगैरे दैत्य. हे सर्वजण भस्मस्नान करीत असत व ते मोठे शिवभक्त होते, त्यांचें पातक सर्व लयास गेलें असून ते नेहमीं निष्पाप झालेले होते.

" नमः शिवाय " असा मंत्र म्हणून सात वेळ भस्माचें अभिमंत्रण करावें. मग तें भस्म अंगास लावावें. व कपाळास त्या भस्माचा त्रिपुंड्र करावा. सर्वांगास भस्म लाविलें तरीं त्रिपुंड्र केल्याचीं बरोबरी होत नाहीं ह्यासाठीं सर्व आंगास भस्म सारविण्यापेक्षां एक त्रिपुंड केलेला बरा. भस्मांत पाणी घालून दररोज त्या भस्माचा त्रिपुंड्र करावा. शिवभक्तीचें

साधन करणाऱ्यानें आपल्या शरीरावर पंधरा ठिकाणीं त्रिपुंड्र करावे. मस्तकावर, कपाळावर, दोन्ही कानांवर, दोन गळ्यावर, दोन्ही हातांवर, उरावर, बेंबीवर, पाठीवर, दोन्ही दंडावर, दोन्हीं खांद्यावर, दोन्हीं तळहातांच्या वरच्या भागावर साधकांनीं मूलमंत्रानें भस्मानें त्रिपुंड्र करावें.

डाव्या तळहातावर भस्म घेऊन त्यावर उजवा हात झांकावा, नंतर " अग्निरिति भस्म " ह्या मंत्रानें त्यास स्पर्श करून त्यावर पाण्यानें अभिमंत्रण करावें. नंतर पाण्यानें भिजलेलें भस्म घेऊन वर जीं त्रिपुंड्र करण्याचीं स्थलें सांगितलेलीं आहेत त्या त्या ठिकाणीं भस्माचें त्रिपुंड्र करावें असें त्रिपुंड्र करणारा मनुष्य त्या कल्याण करणाऱ्या शांत-स्वभावाच्या शंकराच्या स्वरूपास जाऊन मिळतो,

आपल्या उजव्या हाताच्या तीन बोटानींच सहा अंगुलेंपर्यंत लांब किंवा सर्व कपाळावर त्रिपुंड्र लावावें. दोन्ही डोळ्यांची जितकी मर्यादा आहे तितक्या कपाळाच्या मध्यभागी मध्यमा (मधलें बोट) अनामिका (करंगळीजवळचें बोट) आणि आंगठा ह्यांनी उलटें सुलटें त्रिपुंड्र धारण करावें जो मनुष्य असें त्रिपुंड्र धारण करितो तो प्रत्यक्ष रुद्र आहें ह्यांत कांहीं संशय नाही. तें त्रिपुंड्र सरळ, पांढरें शुभ्र, एकमेकास न चिकटलेलें ठळक आणि कानापर्यंत लांब गेलेंलें असावें. ह्याप्रमाणें सर्व लक्षणांनी युक्त असणारें त्रिपुंड्र धारण केलें म्हणजे सर्व मनोरथ पूर्ण होतात.

सकाळीं, दुपारी आणि संध्याकाळीं असेंच विभूतीचें त्रिपुंड्र करावे. एखादेवेळी भस्माचें त्रिपुंड्र केलें तरी तो प्रत्यक्ष शंकरच होतो ह्यांत संशय नाहीं तो मनुष्य शिवधर्म पाळणारा असून ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद ह्यांचीं प्रत्यक्ष मूर्ति होय असें वेद सांगतो

ब्रम्हदेव, विष्णु. रुद्र आणि इंद्रादिक तेहतीस कोटी देव भस्मानें तयार केलेले त्रिपुंड्र लावतात वेद उत्तम तऱ्हेनें जाणणारे वसिष्ठ वगैरे मोठमोठे भाग्यवान् ऋषीश्वर देखील नेहमी भस्मानें केलेला त्रिपुंड्र धारण करितात. शिवागमांत, वेदांत आणि सर्वप्रकारच्या पुराणांत, स्मृति इतिहास वगैरे ग्रंथांत भस्माचे त्रिपुंड्र करावे म्हणून सांगितलें आहे. त्रिपुंड्र सर्व जातीच्या लोकांनीं लावावें त्यांत शैवधर्मी लोकांनीं तर अवश्य लावावें.

कोणी नास्तिक असला कोणी जातिभ्रष्ट झालेला असला किंवा कोणी वाईट रीतीनें वागणारा असला तरी त्यानें भस्म धारण केलें किंवा भस्माचें त्रिपुंड्र केलें तर तो सर्व पातकांपासून मुक्त होतो. भस्मानें स्नान करून कपाळास भस्माचा त्रिपुंड्र लाविल्यावर शिवपूजन करणाऱ्यानें नेहमीं रुद्राक्ष देखील धारण केले पाहिजेत.

ज्यांचीं मनें वाईट आहेत, ज्यांची वागणूक वाईट आहे, ज्यांची बुद्धि वाईट आहे अशा मनुष्यांनीं रुद्राक्ष धारण केले तर त्यांचें देखील सर्व पाप नाहींसें होतें.

पूर्वीं त्रिपुरें दहन करण्याच्यावेळीं तीन नेत्र असणारा, त्रैलोक्याचा ईश्वर शंकर त्यांचीं (दैत्यांची) नगरें कोणत्या रीतींनें बांधलेली आहेत हें डोळे उघडून पाहूं लागला त्यावेळीं त्याच्या डोळ्यांतून पुष्कळ पाण्याचे थेंब पडले त्यापासून रुद्राक्ष झाले म्हणून त्यांस रुद्राक्ष म्हणतात. रुद्राक्ष शंकराच्या नेत्रापासून उत्पन्न झाले म्हणून ते सर्व लोकांत पवित्र आहेत. त्यांच्या उत्पत्तीच्या निरनिराळेपणावरून अडतीस भेद झाले आहेत.

शंकरास तीन नेत्र आहेत त्यापैकीं सूर्य नांवाच्या शंकराच्या नेत्रापासून कपिल वर्णाचे बारा प्रकारचे रुद्राक्ष उत्पन्न झाले. शंकराच्या चंद्र नांवाच्या नेत्रापासून सोळा प्रकारचे पांढरे रुद्राक्ष उत्पन्न झाले. शंकराच्या अग्नि नांवाच्या नेत्रापासून काळे दहा प्रकारचे रुद्राक्ष उत्पन्न झाले. ह्याप्रमाणें उत्पत्तीच्या निरनिराळेपणावरून रुद्राक्षाच्या अनेक जाति झाल्या आहेत ज्याला किड्यानें पाडलेलें भोंक नसून त्याचा रंग सोन्यासारखा असेल व तो रुद्राक्ष त्यापूर्वीं कोणी धारण केला नसेल तो उत्तम समजावा. शिवाची मनोभावानें पूजा करणाऱ्या शहाण्या मनुष्यानें रुद्राक्ष धारण केलें पाहिजे.

तो रुद्राक्ष योग्य ठिकाणीं जिकडे त्याचें तोंड करावयास पाहिजे तिकडे तोंड करून, रुद्राक्ष धारण करण्याची जी रीति आहे त्या रीतीप्रमाणें व योग्य विधीप्रमाणें रुद्राक्ष धारण करावें. रुद्राक्ष धारण कसें करावें तें सांगतो. रुद्राक्ष धारण केल्यानें शिवाचें सायुज्य प्राप्त होतें. चतुर मनुष्यानें आपल्या शेंडीमध्यें एकमुखाचा रुद्राक्ष धारण करावा. दोन, तीन किंवा बारा मुखाचें तीन रुद्राक्ष मस्तकावर बांधावें

अकरा मुखाचे छत्तीस रुद्राक्ष आपल्या कपाळावर बांधावे व दहा, सात किंवा पांच मुखांचें सहा सहा रुद्राक्ष दोन्ही कानांत बांधावे. सहा किंवा आठ तोंडें असणारे बत्तीस रुद्राक्ष गळयांत बांधावे. तसेंच विद्वान मनुष्यानें आपल्या उरावर चार तोंडाचे पन्नास रुद्राक्ष बांधावे. तेरा तोंडें असणारे सोळा सोळा रुद्राक्ष आपल्या दोन्ही दंडांत बांधावे व नऊ नऊ तोंडें असणारे बारा बारा रुद्राक्ष आपल्या कोंपराखालील दोन्ही हातांस बांधावें. चवदा तोंडाच्या एकशें आठ रुद्राक्षांचें यज्ञोपवीत करून शिव-पूजकानें नेहमीं गळयांत घालावें.

अशा रीतीनें जो मनुष्य रुद्राक्ष नित्य धारण करीत असतो, तो मूर्ख कां असेना परंतु त्याला पाप म्हणून लागत नाहीं. ह्यांत कांहीं संशय नाहीं मनुष्य ब्रम्हहत्या करणारा असो. दारू पिणारा असो, सोनें चोरणारा असो, गुरुच्या स्त्रियेकडे पापीदृष्टीनें पहाणारा असो, मातेचा किंवा पित्याचा घात करणारा असो, गर्भाचा घात किंवा विश्वास-घात करणारा असो, रुद्राक्ष धारण केल्यामुळेंच त्याचें सर्व पाप नाहीसें होतें. रुद्राक्षाचें दर्शन घेतलें किंवा रुद्राक्षास स्पर्श केला किंवा रुद्राक्षाचें स्मरण केलें किंवा रुद्राक्षाचें पूजन केलें किंवा रुद्राक्षाचें धारण केलें तरी लोक ह्या लोकांतील सर्व पापापासून मुक्त होतात. ब्राम्हण असो, महार असो. मूर्ख असो किंवा पंडित असो रुद्राक्ष धारण केल्यानें त्याचीं सर्व पापें नाहींशीं होतात. एक कोटी गाईचें दान केलें तर ह्या लोकीं जें पुण्य लागतें तेंच पुण्य जो मनुष्य नेहमीं रुद्राक्ष धारण करितो त्यास लागतें. मरण यावयाच्या वेळीं पाण्यांत रुद्राक्ष उगाळून तें पाणी पिऊन शंकराचें चिंतन केलें तर तो मनुष्य खचित रुद्रलोकास जातो.

ज्यांनीं आपल्या सर्व अंगास भस्म लाविलें आहे व जे नेहमीं रुद्राक्षांच्या माळा गळयांत घालतात त्याचें महत्व फार असून ते प्रत्यक्ष रुद्रच आहेत ह्यांत शंका नाहीं.

नित्य कर्में केली, इच्छा धरून व्रतें केलीं, विशेष प्रकारचीं व्रतें केलीं, आपल्या धर्मांत सांगितलेलीं सर्व कर्में यथाविधीनें केलीं तरी पण जो ब्राम्हण इतकें करूनही रुद्राक्ष धारण करणार नाहीं तर त्याच्या ह्या सर्व कर्मांचा कांहीं उपयोग नाहीं.

ब्राम्हण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, हे चार वर्ण ब्रम्हचारीं, गृहस्थ,

वानप्रस्थ आणि संन्यास हे चार आश्रम धर्म व नेहमीं सदाचारानें वागणारे लोक ह्या सर्वांत विभूति आणि रुद्राक्ष धारण करणारा जो असेल तोच एक श्रेष्ठ आहे. रुद्राक्ष धारण करणें हें वेदास आणि शास्त्रास देखील मान्य आहे. रुद्राक्ष धारण करणाराची योग्यता इतरांस येणार नाहीं.

ह्याप्रमाणें वीरशैवाच्या धर्माचा निर्णय असणाऱ्या सिद्धांतशिखा-मणि ग्रंथांतील भक्तस्थलांतील विभूति आणि रुद्राक्ष धारण करण्याचें वर्णन असलेला सातवा दीप संपला.

## = दीप ८ वा =

ज्यानें विभूति लाविली, रुद्राक्ष धारण केले एकनिष्ठपणानें श्रद्धापूर्वक लिंग धारण केलें. त्यानें शिवपंचाक्षविद्येरीचा जप करावा. त्यामुळें शिवरहस्याचें ज्ञान होतें. ज्याप्रमाणें शिवतत्वापेक्षां दुसरें कोणतेंही तत्व श्रेष्ठ नाहीं तसेंच शिवपंचाक्षरीमंत्रापेक्षां दुसरा कोणताही श्रेष्ठ मंत्र नाहीं.

एक वेळ शिवपंचाक्षरी मंत्र समजला म्हणजे मग इतर मंत्र समजून घेण्याचें काय कारण आहे ? सर्व जगांचें मूल असें शिवदैवत पूर्णपणें समजल्यावर इतर देवांची माहिती घेण्याचें काय कारण आहे. ब्रम्हदेव, विष्णु वगैरे तेहतीस कोटि देव आहेत तरी त्यांत शंकरच श्रेष्ठ आहेत, त्याप्रमाणें सात कोटि मंत्र आहेत तरी त्यांत शिवपंचाक्षरी मंत्रच श्रेष्ठ आहे.

सर्व त्रैलोक्याची उत्पत्ती, रक्षण व संहार करण्यास एक शंकरच कारण आहे त्या शंकराच्या नांवाचाच हा शिवपंचाक्षरी मंत्र असल्यामुळे इतर सर्व मंत्रापेक्षां हा मंत्र श्रेष्ठ आहे (सर्व मंत्राला कारण आहे) हें उघड आहे. त्या शिवाच्या नांवाचा हा शिव पंचाक्षरी मंत्र आहे व ह्या मंत्रानें शिवाचें नांव घ्यावें लागतें शिवाचें नांव आणि शिवाचें नांव घेणें ह्या दोन गुणामुळें हा शिवपंचाक्षरी मंत्र प्रत्यक्ष शिव आहे असें सिद्ध होतें ह्यांत शंका नाहीं.

"शिवपंचाक्षरीमंत्रात" नमः हा शब्द अगोदर उच्चारून शिवाय हा शब्द मागावून उच्चरावा लागतो हा पंचाक्षरी मंत्र होय, आणि हा

मंत्र सर्व वेदांत देखील श्रेष्ठ आहे.

शंकर हा सत् चित् आनंद स्वरूप आहे आणव, माया, कर्मिक हे तीन मल शंकरास मुळींच नाहींत व तो स्वतःच परिशुद्ध आहे म्हणून त्यास शिव म्हणतात शंभु हा चित्स्वरूप परमेश्वर आहे बहुतकरून सर्व प्रकारच्या कल्याणांचें शंकर हे घर आहेत. (शंकराच्या भक्तीनें सर्व प्रकारचीं कल्याणें होतात.) म्हणून शंकरास शिव म्हणतात तो सर्व देवांचा देव असून त्यास तीन नेत्र आहेत. शिव अशा दोन अक्षरांचा उच्चार केल्याबरोबर परब्रम्हाचें ज्ञान होतें हें अगदीं ठरलेलें आहे त्या शिवाचीं इतर भव वगैरे नांवें घेणें हें त्याचे गुणवर्णन करणें आहे.

ह्यासाठीं शिव हें दोन अक्षरांचें नांव घेणें हेंच उत्तम आणि श्रेष्ठ आहे. शिव हा सच्चिदानंदस्वरूप असून त्याचें सामर्थ्य अगाध आहे. ह्या शिवाच्या नांवाच्या आश्रयामुळें हा मंत्र पंचाक्षरांचा झाला आहे. " नमः शिवाय " हीं पांच अक्षरें होत ह्यांसाठीं मोक्षप्राप्तीची इच्छा करणाऱ्यांनीं तो शिवपंचाक्षरी मंत्र मनापासून जपावा. ज्यास जन्म नाहीं (अनादि आहे असा हा महादेव जसा स्वतः सिद्ध असून संसाराचें दुःख नाश करितो तसाच हा शिवपंचाक्षरी मंत्र संसारातील दुःखांचा नाश करितो.)

पंचमहाभूतें (पृथ्वी, आप्, तेज, वायु, आकाश) पंच तन्मातृका (गंध, रस, रूप, स्पर्श, शब्द,) पंच ज्ञानेंद्रिय (डोळे, कान, नाक, जीभ त्वचा) पंच कर्मेंद्रिय (त्वचा, हात, पाय, मूत्र, शौच करण्याची इंद्रियें) आचारलिंग, प्रसादलिंग चरलिंग, शिवलिंग आणि महालिंग ही पांच ब्रम्हें, भव. मृड, हर ह्या कारणांसह सृष्टि, स्थिति, लय आविर्भाव व तिरोधान हीं पांच कृत्यें पंचाक्षर महामंत्राच्या पांच अक्षरांनीं समजून घ्यावी.

परशक्ति, आदिशक्ति, इच्छाशक्ति, क्रियाशक्ति आणि ज्ञानशक्ति ह्या पांच शक्ति, पांच अंगुलि (बोटें) बोलणें, घेणें देणें- करणें, चालणें मलमूत्रविसर्जन करणें वगैरे पांच कर्मेंद्रियाचीं कृत्यें मन, बुद्धि, अहंकार प्रकृति आणि पुरुष वगैरे जे पांच पांच प्रकारानें विशेषेंकरून प्रसिद्ध आहेत त्या सर्व वस्तु पंचाक्षरमंत्राचे कार्य आहेत (पंचाक्षर मंत्रानें, समजणाऱ्या आहेत.)

ह्या शिवपंचाक्षरी मंत्राच्या अगोदर ॐकार उच्चार करावा लागतो ह्यामुळें शिवागमांत आणि वेदांत ह्या मंत्रास षडक्षरी मंत्र म्हणून मानला आहे. ह्या शिवपंचाक्षरी महामंत्राच्या न्यासाच्या अगोदर असणाऱ्या ॐकारामुळें केवळ चित्स्वरूप महादेव चांगल्या तऱ्हेनें समजून येतो. ( ॐकाराच्या साधनानें शिवस्वरूप उत्तम तऱ्हेनें समजतें.) फक्त एका ॐकार ह्याच अक्षरावरून परब्रम्हस्वरूप स्पष्ट समजून येतें, त्या परब्रम्हाची कोणाच्यानें बरोबरी करवत नाहीं, त्या परब्रम्हाचा आनंद अपरंपार आहे त्याचें नांव शिव असून त्याला प्रपंच नाही.

हा शिवपंचाक्षरी मंत्र परमेश्वराचा मंत्र आहे तो परमेश्वर ( मंत्र ) सोऽहं ( तो मी ) अशा स्वरूपाचा असून अनादि आहे. " हंस " ह्या दोन अक्षरांचा मिळून लोप होऊन ॐ असा एकाक्षरी शब्द तयार झालेला आहे व तो श्रेष्ठ मंत्र आहे.

शुद्ध चैतन्यस्वरूप ज्ञानस्वरूप, सकलस्वरूप ( निर्विकार, देहधारी आणि सर्व प्राणिमात्रांच्या हृदयात राहाणारा ) असा सर्वस्वरूपी शंकर त्या षडक्षरमनूमध्यें ( सहा अक्षरांच्या मंत्रांत ). पूर्णपणानें राहिला आहे. ॐकार मंत्राचा उच्चार केल्यानेंच शुद्ध चैतन्यस्वरूप शिवाचें यथार्थ ज्ञान होतें. ॐकारापुढील " नमः शिवाय " ह्या पांच अक्षरांचा उच्चार केला म्हणजे पंचब्रम्हस्वरूप शिवाचें यथार्थ ज्ञान होते. मूल, विद्या, शिव, शैवसूत्र, आणि पंचाक्षर हीं शिवपंचाक्षरी महामंत्राचीं पर्याय नावें मानिलीं आहेत. ही पंचाक्षरी महाविद्या होय, त्यांत ॐकार हें अक्षर घातले म्हणजे सहा अक्षरांचीं विद्या होते. शिवपूजा एकनिष्ठपणानें करणाऱ्यानें सावधान होऊन हा मंत्र जपावा.

पूर्वेकडे किंवा उत्तरेकडे तोंड करून तीन प्राणायाम करावे, व आपल्या हृदयकमलांत जो सर्व देवांचा देव आहे ज्याला त्रियंबक म्हणतात ज्यानें आपल्या आंगावर सर्व प्रकारचे अलंकार घातले असून त्यांचेजवळ पार्वती बसली आहे व मस्तकावर अर्धचंद्र ज्यानें धारण केलेला आहे अशा शंकराचें एकनिष्ठपणानें ध्यान करून शिवमहाविद्येचा जप करावा. ( ध्यान करावें ).

जपाचे तीन प्रकार आहेत, वाचिक ( स्पष्ट लोकांस ऐकूं जाईल

असें बोलणें ) उपांशु ( हळूहळू ) आणि तिसरा मानसिक जप होय. जो जप चालला असतां भोवतालीं बसलेल्या इतर लोकांस तो स्पष्ट रीतीनें ऐकावयास जातो. तो वाचिक जप होय. ह्या जपामुळें सर्व पातकांचा नाश होतो फक्त ओंठ हालतात इतकें दिसून येऊन जो मंत्र हळुहळू जपतात. तो इतर भोंवताली बसणाऱ्या लोकांस मुळींच ऐकूं जात नाहीं त्यास उपांशुजप असें म्हणतात, ज्या जपाच्या वेळी ओंठ किंवा जीभ मुळींच हाललेली दिसत नाहींत फक्त मनांतल्या मनांत ( अक्षरें स्पष्ट उच्चारून ) तो जप करावा लागतो त्यास मानस जप म्हणतात. कर्म, यज्ञ वगैरे उपासनेचे जितके प्रकार आहेत व्रत, दान, तप वगैरें जीं तपें आहेत ती सर्व एकत्र केली तरी शिवपंचाक्षरी-महामंत्राच्या सोळाव्या हिश्शाची देखील बरोबरी करूं शकत नाहींत. शिवमंत्राच्या जपयज्ञाचें वर जें महात्म सांगितलें तें वाचिक मंत्राचें झालें, त्यापेक्षां उपांशुमंत्राच्या जपयज्ञाचें महात्म्य शंभरपट जास्त असून त्यापेक्षां मानसिक जपयज्ञाचें महात्म्य हजारपट जास्त आहे.

महामंत्राचे वाचिक आणि उपांशु ह्या दोन प्रकारच्या जपापेक्षां मानसजप हा श्रेष्ठ आहे त्या जपामुळें भयंकर अशा संसाराचें दुःख समूळ नाहींसें होतें. हे तीन प्रकार जपयज्ञाचे सांगितले आहेत त्यापैकीं योग्य विधानानें भक्तिभावानें यथाक्रमानें शिवपंचाक्षरीविद्येचा जप करावा त्यामुळें पाशांतून सुटका होते.

शिवध्यानात निमग्न झालेल्या इंद्रियनिग्रहवान् शिवभक्तानें नित्य सदाचाराचे सर्व नियम पाळून ह्या मूळमंत्रानें शिवलिंगाची पूजा करावी. भक्तिपूर्वक ह्या शिवपंचाक्षरी मंत्रानें जो मनुष्य शिवाची एकवेळ पूजा करील तो देखील ह्या मंत्राच्या सामर्थ्यानें शिवलोकास जाईल.

जे कितीएक ऋषि नुसतें पाणी पिऊन राहतात, किंवा वायुभक्षण करून राहतात व तसेच जे कोणी खडतर तपश्चर्या करितात त्या तपश्चर्येनें देखील त्यांस शिवलोकाची प्राप्ति होत नाहीं ती शिवभक्तांस शिवपंचाक्षरीं मंत्रानें सहज होते.

ह्यासाठीं तीं तपें, यज्ञ व्रत आणि नियम हे शिवपंचाक्षरी मंत्राच्या एक कोटयंशाचीं देखील बरोबरी करूं शकत नाहींत. ह्या सर्वांपेक्षां शिवपंचाक्षरीमंत्र एक कोटपट जास्त श्रेष्ठ आहे. पातकी असो, पुण्यवान्

असो किंवा पतित असो, एकवेळ जर शिवपंचाक्षरीमंत्राचा जप करून पूजा करील तर तो मुक्त होतो ह्यांत शंका नाहीं. पंचाक्षर महामंत्राचा एकवेळ उच्चार केला तरीं सर्व प्राणिमात्रांच्या सर्व पातकांचा नाश होतो.

वरचेवर वरचेवर त्यांचा सारखा अभ्यास केला तर आपले सर्व मनोरथ परिपूर्ण होतात. असे मंत्र शिवागमांत अनेक आहेत. त्या सर्वांत ईश्वराची ( शंकराची ) अद्भुत शक्ति प्रतिपादन करणारा शिवपंचाक्षरी मंत्र महासामर्थ्यवान् आहे. एक वेळ त्याचा उच्चार केला तरी सर्व सिद्धींची प्राप्ति होते अशा ह्या शिवपंचाक्षरी मंत्राचा जप करून जो कोणी मनुष्य लिंगास फूल वाहतो त्याला हजार वाजपेययज्ञ केल्याचें श्रेय येतें अग्निहोत्र, ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद वगैरे तीन वेदे पुष्कळ दक्षिणा दिलेले यज्ञ शिवपंचाक्षरी मंत्राच्या कोटि हिश्शाची, देखील बरोबरी करूं शकत नाहीत.

पूर्वी शिवज्ञानांत पारंगत असणाऱ्या सानंदगणेश्वरानें शिवपंचाक्षरीमंत्राचा उच्चार ( जप ) करून अनेक नारकी जीवांचा ( अठ्ठावीस कोट नरकांचा) उद्धार केला. पूर्वी शतानंद नांवाच्या ऋषीनें शिवपंचाक्षरी मंत्राच्या सामर्थ्यानें ( सिद्धीमुळें ) संगिर नांवाच्या पातक्याला नरक देखील स्वर्गाप्रमाणे वाटला त्याला नरकांतून काढून स्वर्गसुखांत नेऊन ठेविलें. पूर्वी उपमन्यु नांवाच्या योग्यानें ह्याच मंत्राच्या सामर्थ्यानें सिद्धी मिळविली व त्या श्रेष्ठ शिवापासून शिवशास्त्रांचा आचार्यपणा मिळविला ( आचार्य झाला. ) वसिष्ठ, वामदेव वगैरे मुनीश्वर ह्या शिवपंचाक्षरी मंत्रामुळें निष्पाप व सिद्धीमंत होऊन मोठे सामर्थ्यवान् ( निग्रहानुग्रहसमर्थ ) झाले.

ब्रह्मदेव वगैरें देवांस जग निर्माण करण्याच्या वगैरे कामांत ह्या शिवपंचाक्षरी मंत्राच्या माहात्म्यामुळेंच सामर्थ्य येते. फार सांगण्यांत काय अर्थ आहे ? हा मंत्र मोठा शक्तीमान आहे. ह्या मंत्राच्या अगोदर ॐकाराचा उच्चार करावा लागत असून त्यापुढें "नमः शिवाय" अशी पवित्र पांच अक्षरें आहेत. हा मंत्र भक्तिपूर्वक वारंवार जपून जो मनुष्य सर्व देवांचा देव (शंकर) ह्याची पूजा करील त्याचें पातकांचें बंधन तुटून तो मोक्षरूप लक्ष्मीचा उपभोग घेतो (मोक्षास जातो).

ह्याप्रमाणें वीरशैवांच्या धर्मांचें निर्णय असलेल्या सिद्धांतशिखामणींतील भक्तस्थलांतील पंचाक्षरी जपाचें वर्णन असलेला हा आठवा दीप संपला.

## = दीप ९ वा =

विभूति कपाळास लावणारा, रुद्राक्षमाळा गळयांत घालणारा लिंग धारण करणारा, नेहमीं निष्पापरीतींचे वर्तन करणारा, शिवपंचाक्षरी जप करणारा, योगी असेल त्यास शिवभक्त म्हणावे.

शंभूचें गुणानुवाद श्रवण करणें, शंभूचें गुण नेहमी वर्णन करणें, (स्तोत्र करणें) शंभूचे ध्यान करणें, शंभूच्या चरणांची सेवा करणें शभूचें पूजन करणें. शंभूस वंदन करणें, शंभूचे दास्य करणें, शंभूशीं स्नेह करणें व शंभूस आपले सर्वस्व अर्पण करणें. असे हे भक्तींचे नऊ प्रकार शंकरांनीं सांगितले आहेत. ही नऊ प्रकारची शिवभक्ति पातकी लोकांस दुर्मिळ आहे. (पातकी लोकांच्या हातून ही शिवभक्ति घडत नाही) पुण्यवान लोकांच्या हातून सहज घडते.

मनुष्य अधम असो किंवा उत्तम असो, ज्या कोणत्याही मनुष्याच्या अंगी शिवभक्ति जास्त असेल त्यास शिवभक्त म्हणावें. ज्या कोणाच्या अंगीं शिवभक्ति आहे मग तो ब्राम्हण असो किंवा नीच जातीचा मनुष्य असो तो शंकरास प्रिय होतो. जातींचा ब्राम्हण असूनही तो शिवभक्ति करणारा नसेल तर तो शंकरास प्रिय होत नाही. त्या शिवभक्तीचे दोन भेद आहेत. एक बाह्य आणि दुसरी अभ्यंतर. बाह्यभक्तीस स्थूलभक्ति म्हणतात आणि अभ्यंतर भक्तीस सूक्ष्म भक्ती म्हणतात. अशी भक्ती वीरमाहेश्वर लोक आवडीनें करितात.

पवित्र ठिकाणीं सुशोभित अशा रत्नखचित सिंहासनावर जी शिवलिंगाची पूजा करितात तिला बाह्य भक्ति म्हणतात. शिवलिंगावर प्राण ठेवून व प्राणावर शिवलिंग ठेवून स्वस्थ मन करून कांही एक मनांत दुसरा तिसरा विचार आणावयाचा नाही. ती अभ्यंतर शिवभक्ती होय असें शिवयोगी लोक मानतात, ती शिवभक्ती ज्याच्या अंगांत आहे त्याचें जीवन भाजलेल्या बियासारखें समजावें. भाजलेलें बी जसें पुन्हा उगवत नाहीं तसेंच त्याच्या हातून कर्म घडत नसल्यानें त्यास पुन्हा जन्मा-

घ्यावा लागत नाहीं. फार सांगण्यांत अर्थ नाही शिवाची भक्ती गुप्त-गोष्टीहून गुप्तगोष्ट आहे, व श्रेष्ठ आहे, ती शिवभक्ति ज्याचे अंगी असेल तो मुक्त होतो ह्यांत कांही संशय नाही.

प्रसादामुळें (शिवकृपेमुळें) ती शिवभक्ति घडते (होते) आणि तो प्रसाद (शिवकृपा) भक्तीमुळें प्राप्त होतो. जसें बियापासून अंकुर होतो व अंकुरापासून बीज होतें तशीच प्रसाद आणि भक्ति ह्यांची स्थिति आहे ही भक्ति उत्पन्न होण्याच्या अगोदर प्रसाद (शिवकृपा) व्हावा लागतो. भक्ति असली म्हणजे तिच्या साधनानें मुक्ति प्राप्त होते ती भक्ति मनुष्यांस एकाच जन्मांत प्राप्त होत नाही, अनेक जन्मांत पुण्य केलें असते त्या पुण्याच्या सामर्थ्यानें भक्ति प्राप्त होतें, अनेक जन्मांत ज्यांनी चांगले आचरण केलें असते, श्रौत आणि स्मार्त कर्मास अनुसरून जे लोक आपले वर्तन ठेवितात, जे विरक्त आणि ज्ञानसंपन्न आहेत त्यावर शंकर प्रसन्न होतो. शंकर प्रसन्न झाले असतां मनुष्य मुक्त होतो मनुष्य मुक्त झाला म्हणजे तो शिवस्वरूप ( शंकरासारखें रूप धारण करणारा होतो ). ज्या मनुष्याची भक्ती थोडी आहे त्यास शिव-सारूप्याची स्थिस्ती प्राप्त होण्यास तीन जन्म लागतात, ती भक्ति वर-चेवर ज्यास्त ज्यास्त वाढत जाऊन तो भक्त तिसऱ्या जन्मात मुक्त होतो.

शिवभक्ताला पुन्हा जन्म घेण्याचें दुःख भोगावें लागत नाहीं ह्यांत संशय नाहीं. वर सांगितलेली नऊ प्रकारची भक्ति ज्याच्या आंगांत पूर्णपणानें राहात असेल त्याची ती सेवा पूर्ण भक्ति होय, आणि ती भक्ति थोडी कमी असेल तर, तिला अल्प भक्ति असें म्हणावे. ती सेवा पुन्हा, मन, वचन आणि शरीर ह्या संबंधानें तीन प्रकारची होते, शिवस्वरूपाचें मनांत नेहमीं चिंतन करणें ती मानसी सेवा होय. शिवनामाचा सतत जप करणें ही वचनसेवा होय, व शिवपूजेंकरितां स्वतः आपलें शरीर झिजवून पत्र, पुष्प, जल, बेल, नैवेद्य वगैरे प्रकारानें शिवपूजा करणें ती कायिक शिवपूजा समजावी.

सेवेचे ही बाह्य आभ्यंतर आणि बाह्याभ्यंतर असे तीन भेद आहेत, त्या सेवेचे पुन्हा मन, वचन आणि शरीर ह्या संबंधानें तीन तीन भेद

होतात. जें मन महेश्वराचें ध्यान करण्यांतच गर्क झालें असतें दुसऱ्या देवांचें ध्यान करणें त्यास आवडत नाहीं त्यालाच मन म्हणावें. शिवनामाचा वारंवार जी आवडीनें उच्चार करिते, इतर देवांचीं नांवें घेण्याचा जिला वास्तविक त्रास होतो तिलाच वाचा म्हणावी. दुसरींस वाचा म्हणू नये. शिवधर्माचीं जी लक्षणें सांगितली आहेत त्या तऱ्हेचीं त्रिपुंड्र वगैरे चिन्हें ज्या शरीरावर स्पष्टपणानें उमटलेलीं दिसतात, शिवार्चन करण्याचें कामांत जो नेहमीं वापरत असतो त्यालाच देह (शरीर) म्हणावा इतरांस देहच म्हणूं नये

आपण जें कांहीं शिवपूजन वगैरे करितों तें जर दुसऱ्यांस समजलें तर तें बाह्य शिवपूजन असे समजावें, आणि तेंच शिवपूजन आपणाखेरीज दुसऱ्या कोणांसही समजलें नाहीं तर तें आभ्यंतर शिवपूजन होय असें समजावें मन माहेश्वराचे ध्यानांतच गर्क झालेलें असल्यास ते बाह्याभ्यंतर शिवपूजन असें समजावें.

विद्वान् लोकांनीं तें शिवपूजन पुन्हा पांच प्रकारचें मानलेलें आहे तें असें. १ तप, २ कर्म, ३ जप, ४ ध्यान आणि ५ ज्ञान असे 'पाच प्रकार होत,' शिवकार्यासाठीं शरीर झिजविणें हें तप होय. कृच्छ्र चांद्रायण वगैरे करून देह झिजविणें हें तप नव्हे. शिवपूजन करणें हेंच कर्म होय यज्ञयाग वगैरे बाह्यकर्म करणें हें कर्म नव्हे शिवपंचाक्षरीमंत्राचा अभ्यास करणें हा जप होय अथवा ॐकाराचा अभ्यास करणें किंवा रुद्राध्यास वगैरे पाठ करणें हाच जप होय वेदाध्ययन करणें हा जप नव्हे शिवस्वरूपाचें चिंतन करणें ह्यालाच ध्यान म्हणतात दुसऱ्या कोणत्याही देवांचें किंवा वेदार्थाचें चिंतन करणें हें चिंतन नव्हे. शिवागामाच्या अर्थाची माहिती होणें ह्यालाच ज्ञान म्हणतात इतर कोणत्याही ग्रंथाचा अर्थ समजणें हें ज्ञान नव्हे. अशा रीतीचा हा पांच प्रकारचा शिवयज्ञ सांगितला.

ह्या पांच प्रकारच्या यज्ञानें जो मनुष्य भक्तिपूर्वक शंकराची पूजा करितो त्यास भक्त असें म्हणावें. शिवभक्ताला शिवपूजन केल्याचें पुण्य लागून त्यास स्वर्गसुखाची प्राप्ति होते तोच भक्त जर शिवपूजनाचा अपमान करील तर त्यास भयंकर नरकवासाचें दुःख भोगावें लागेल ह्यांत शंका नाहीं. शिवाची भक्ति करणारा मनुष्य महान्

तेजस्वी समजावा; शिवाची भक्ति न करणारे लोक असतील त्यांस शिवूं नये, त्यांचें तोंड पाहूं नये व त्यांच्या सहवासास देखील राहूं नये. जेव्हां मनुष्यास लिंग धारण अगोदर करून नंतर शिवदीक्षेचा विधि होतो, त्या दिवसापासून त्यास भक्त असें म्हणतात त्या दिवसापासून शिवागमाप्रमाणें वर्तन करणाऱ्या लोकांचा आदर सत्कार करावा

आपल्या धर्माप्रमाणें आचरण करणारे आपल्या जातीचें जे ब्राम्हण लोक असतील, त्यांच्या घरीं जेवावें इतरांच्या घरीं जेवूं नये आपली जातिमर्यादा सोडणाऱ्या हलकट स्वभावाच्या भविलोकांनीं आणून दिलेलें द्रव्य आपल्या स्वाधीन झालें असलें तरी तें परत करावें घेऊं नयें. दृढनिश्चयी शिवभक्तानें शिवाखेरीज इतर देवांचें पूजन करूं नयें, इतर देवांचें स्मरण करूं नये, इतर देवांचें कीर्तन करूं नये, व इतर देवांचा नैवेद्यही भक्षण करूं नये ज्या घरांमध्यें शिवाखेरीज इतर देव असतील, त्या घरीं जाऊं नये. शिवपूजन करावयाच्या वेळीं अन्य देवतांचें पूजन करणाऱ्या लोकांचें तोंड देखील पाहूं नये.

सदा शिवावर दृढ विश्वास ठेवणाऱ्या वीरशैव धर्माप्रमाणें वर्तन करणाऱ्यांस स्थावरलिंगाचें निर्माल्य वगैरे कांहीं उपयोगी पडत नाहीं. वीरशैवांस स्थावरलिंगाचा प्रसाद उपयोगी नाहीं. ज्या ठिकाणीं स्थावर-लिंगाचा नाश होत असेल किंवा शिवचिन्ह धारण करणाऱ्या शिव-भक्तांस उपद्रव होत असेल. त्या ठिकाणीं आपला जीव गेला तरीं चिंता नाहीं, जिवापाड मेहनत करून त्या शिवलिंगाचा नाश होऊं देऊं नये व शिवभक्तांची पीडा दूर करावी. शिवाच्या कामासाठी आपला प्राण खर्च केला तर तो मनुष्य शिवसायुज्य पावतो शिवकार्यासाठीं खर्च केलेल्या प्राणाचें सार्थक्यच होतें. शिवकार्यासाठीं जीव देणारा मनुष्य शिवसायुज्य पावतो. शिवाची निंदा करणारा कोणी पाहिला तर त्यास मारावें, नाहीं पेक्षां शिव्या द्याव्या. इतकें करण्याची जर शक्ति नसेल, तर निदान इतकें तरी करावें कीं, तेथून उठून दुसरीकडे निघून जावें. जेथें शिवधर्माच्या आचाराची निंदा होते तेथें कधींही जाऊं नये. ज्या घरीं शंकराची निंदा होते, त्या घरीं जाण्याचेंच सोडून द्यावें.

शंकर हा प्राणिमात्रांचा ईश्वर आहे, त्रैलोक्याचा देखील ईश्वर आहे. त्याची जो मनुष्य निंदा करितो, त्याच्या पापाची निष्कृति करूं

म्हटलें तर ती शंभर वर्षांत देखील होणें शक्य नाहीं. मनुष्यानें शिवलिंगदीक्षा घेऊन एकाग्रमनानें शिवपूजन करावें, व पूर्वीं जसें धर्मविरूद्ध आचरण करीत होता तसें करूं नये. पूर्णकर्म सोडलें नाहीं तर ती शिवपूजा फुकट जाते, तिचाही उपयोग होत नाहीं.

उत्तम गति प्राप्त झालीं असतां ती सोडून मुद्दाम नीच वृत्तीची जो मनुष्य आवड करितो, त्यास आरूढपतित म्हणावें ! त्यास कोणतेंही कर्म करण्याचा अधिकार नाहीं, तो सर्वकर्मबहिष्कृत समजावा.

जो कोणी शिवभक्त शिवपंचाक्षरीमंत्राचा त्यास स्वतःस उपदेश झाला असूनही पुन्हा इतर मनुष्यांची स्तुति करींत असेल, तर त्यास अलिंगी म्हणावें, तो दुराचारी व त्यानें आपल्या बुद्धीचा दुरुपयोग केला हें उघड झालें. कातडयांत तेल किंवा पाणी शिवभक्तानें कधींही घेऊं नये जर भक्त कातडयांत तेल किंवा पाणी घेईल तर तो चांडाळ समजावा.

प्राणलिंगाचा शरीरास संबंध झालेल्या इष्टलिंग शरीरावर धारण करणाऱ्यांस शिवयोग्यांस वास्तविक रीतीनें पाहिलें तर जन्माचें सोयर नाहीं व मरणाचें सूतक नाहीं.

जी बायको शिवलिंगाची भक्तिपूर्वक पूजा करणारी असेल, व इष्टलिंग धारण करणारी असेल त्या बाईला विटाळशीपणाचें किंवा बाळंतपणाचें विटाळ मानण्याचें मुळींच कारण नाही. ज्या घरांत एखादी इष्टलिंग धारण करणारी बाई बाळंत झालेली असेल त्या घराला देखील कांही विटाळ नाहीं; कां तर शंकराच्या पदांचें पाणी (पादोदक) शिंपडले म्हणजे सर्व पापांचा नाश होतो.

शिवपूजन करणाऱ्या भक्तानें प्रसिद्ध प्रसिद्ध शिवस्थानें जाऊन अवश्य पहावीं, प्रसिद्ध प्रसिद्ध तीर्थें आवश्य करावीं व नेहमीं आवडीनें शिवयात्रेचा समारंभ करावा. शिवभक्तानें शिवक्षेत्र ( श्रीपर्वत वगैरे स्थळ) शिवतीर्थं. शिवाचा उत्सव व शिवाची यात्रा करण्यास जे लोक जातात, त्यांस वाटेंत अन्नपाणी मिळेल व त्यांस सुख होईल, ह्यासाठीं जागोजाग आपल्या शक्तीप्रमाणें अन्नसत्रें घालावीं, व पाणपोया घालाव्या. अन्नपाणी दान करण्यासारखें दुसरें श्रेष्ठ दान नाहीं, अहिंसेसारखें दुसरें श्रेष्ठ तप नाहीं, ह्यासाठीं शिवभक्तानें नेहमी अन्नापाणी

शिवयोगी लोकांस दान करावें.

शिवभक्तानें आपल्या (शिव) धर्माच्या आचाराप्रमाणें वागणाऱ्या व आपल्या जातीच्या लोकांस त्यांच्या त्यांच्या जातींत उत्पन्न झालेल्या चांगल्या कुलांत जन्मलेल्या मुली पाहून त्यांचीं लग्नें करून द्यावींत. ह्याप्रमाणें आपल्या आचाराप्रमाणें वागणाऱ्या वीरशैव व्रत पाळणाऱ्या शिवभक्तानें नेहमीं भक्तिपूर्वक गुरूचें व लिंगाचें पूजन करावें.

गुरूचें पूजन केलें म्हणजें प्रत्यक्ष शंकराचें पूजन केल्यासारखें होतें, कां तर वास्तविक पाहूं गेलें तर शिवाचा आणि गुरूचा मुळीच भेद नाहीं. ज्याप्रमाणें सर्वांवर कृपा करणाऱ्या सर्व त्रैलोक्याचा ईश्वर शंकर ह्याची पूजा करून उपचार आपण करितों त्याप्रमाणेंच गुरुवर्याची ही नित्य पूजा करून उपचार करावे. महादेव प्रत्यक्षरूपानें कोणास दिसत नाहीं, तो गुप्त राहतो. तरी आपल्या मायेनें गुरूचें रूप घेऊन भक्ती वाढविण्यासाठीं प्रत्यक्षरूपानें राहतो.

शिवज्ञानामुळें अतिशय भयंकर अशा संसारसमुद्रांतून तरून जातां येतें तें शिवज्ञान ज्याचें अंगीं आहे तो गुरु कोणास मान्य होणार नाहीं? तें शिवज्ञान शिष्यांस करून देऊन त्यांस सुखीं करणारा गुरु सर्व भक्तांस नमस्कार करण्यास योग्य आहे ज्या गुरूचा थोडा जरी कृपाकटाक्ष आपल्यावर झाला तरी अतिशय आनंदरूप असें शिवतत्व आपणास समजून येते तो गुरु कोणास मान्य होणार नाही? सर्वांस मान्य होईलच. आचार्य (गुरु) हा शिवज्ञानाचा महासमुद्र आहे. त्याला रागद्वेष तर मुळीच माहीत नाहींत. त्या गुरूच्या मनास संतोष होईल असें आपण नेहमी वर्तन ठेवावे शरीर झिजवून पैसे खर्च करून हरतऱ्हेनें गुरूस सुख द्यावें

ज्याला आपले सर्व मनोरथ परिपूर्ण व्हावेत असें वाटत असेल, जो बुद्धिमान् असेल त्यानें गुरूची आज्ञा कधींही मोडूं नये, त्या गुरूची आज्ञा मोडली तर प्रत्यक्ष शंकराची आज्ञा मोडल्यासारखें पाप लागेल.

समजूतदार भक्त आपल्या गुरूचीं जशी भक्ति करितो शिवलिंगाचीं (इष्टलिंगाची) जशी भक्ति करितो तशींच त्यानें नित्य जंगमाची भक्ति करावी. सर्व प्राणिमात्रांवर कृपा करणारा शंकर एकच आहे तो आपल्या भक्तांस ह्या लोकीं ऐश्वर्य वगैरे सुख आणि मरणानंतर

(शिवैक्यानंतर) मोक्षप्राप्तीचें सुख मिळवून देण्यासाठीं गुरु, आणि लिंग असें तीन प्रकारचें स्वरूप घेऊन राहतो.

लिंग दोन प्रकारचें मानलें आहे एक जंगम (चालतें बोलतें) आणि दुसरें अजंगम (न चालणारें) हे दोन प्रकार होत. अजंगम लिंगाविषयीं (स्थिरलिंगाविषयीं) जशी भक्ति करावयाची तशीच जंगमलिंगाविषयीं (चरलिंगाविषयीं) करावी.

मातीचें किंवा दगडाचें जें लिंग केलेलें असतें तें स्थावर लिंग होय. त्या स्थावरलिंगापेक्षां जंगमलिंग हें श्रेष्ठ असून त्यास शिवयोगी म्हणण्याची प्रसिद्धि आहे.

मंत्रसंस्कारामुळें स्थावरलिंगामध्ये शंकर राहतो. चरलिंगांत (जंगमलिंगांत) महादेव नेहमीं राहतच आहे.

शिवयोग्यास (जंगमास) जें दान करावें त्याचें अक्षय फल प्राप्त होतें. कधीं त्याचा नाश होत नाहीं, ह्यासाठीं हरप्रयत्नानें त्या महा-सामर्थ्यवान् जंगमास दान द्यावें. शिवयोग्याची पूजा केलीं तर प्राण्यास जें फळ मिळतें तें अक्षय आहे असें सर्व शैवागमांत प्रवीण असणाऱ्या विद्वान लोकांनीं म्हटलें आहे. आपण कोठेंही बसलेले असों, त्या ठिकाणीं शिवयोगी आला तर त्याचा कधींहीं अपमान करूं नये, त्याचा अपमान केला तर नरकवास भोगावा लागेल ह्यांत संशय नाहीं.

शिवयोगी हा प्रत्यक्ष शंकर आहे असें समजून दासभावानें त्याची सेवा करावी. जशी आपण लिंगाची पूजा करितों, जशी आपण गुरूची सेवा करितों त्याचप्रमाणें शिवयोग्याचीही पूजा करावी.

जसें आपण (भक्त) शंकराचें पादोदक घेतों तसेंच शंकराचेंच प्रत्यक्षरूप असणाऱ्या जंगमाचें आणि गुरूचेंही पादोदक घ्यावें. शंकराच्या चरणाचें तीर्थ (लिंगोदक) पृथ्वींवर जितक्या कल्याणकारक वस्तू आहेत त्यापेक्षांही कल्याणकारक आहे. पृथ्वीवर जितक्या पवित्र वस्तू आहेत त्यापेक्षांही पवित्र आहे. जितक्या सिद्धि आहेत त्या सर्व सिद्धि पुरुषांस प्राप्त करून देणारें आहे.

शंकरास वाहिलेलें पान किंवा फूल जो भक्त आपल्या मस्तकावर घेऊन फिरेल त्यास प्रतिक्षणीं पौंडरीकयज्ञ केल्याचें श्रेय मिळेल. शंकरास नैवेद्य दाखविलेलें अन्न भक्षण करावें, शंकरास अर्पण केलेलें

पाणी भक्तानें घ्यावें, शिवास जें फूल वाहिलेलें असेल तें आपण हुंगावे अशी जाबालऋषीची श्रुति आहे.

शिवभक्ति करणाऱ्या भक्तिमान मनुष्यानें ( भक्तानें ) अगोदर आपल्या इष्टलिंगाला पान, फूल, फळ पाणी अन्न वगैरे सर्व खाण्याचे पदार्थ अर्पण करावे मागाहून त्याचा स्वत: उपयोग करावा. शंकराचें सामर्थ्य अगाध असून तो सर्व जगाचा गुरु आहे ह्यासाठीं त्याची भक्ति करणाऱ्या भक्तांनीं अगोदर त्या शंकरालाच सर्व पदार्थ अर्पण करून नंतर आपण घ्यावें. पृथ्वीवर जे लिंग धारण करणारे वीरशैव लोक आहेत, जे शिवावर एकनिष्ठपणानें विश्वास ठेवतात त्या सर्वांस शिव-निर्माल्य घेणें योग्य आहे इतर लोकांस शिवनिर्माल्य घेणाचा अधिकार नाहीं. शिवभक्तानें शिवास नैवेद्य अर्पण केलेल्या भाताच्या ढिगापैकीं जितकें अन्न स्वत: भक्षण केलें त्या अन्नांतील प्रत्येक शितास एक एक अश्वमेघ यज्ञ केल्याचें पुण्य लागतें.

ज्याअर्थीं प्रत्यक्ष शंकरांनीं तें अन्न नैवेद्याकरितां स्वीकारिलें त्याअर्थीं निर्माल्य अन्न पवित्र आणि निर्मळ आहे, तें निर्मळ शिव-निर्माल्य शिवदीक्षेमुळें निर्दोष स्वभाव झालेल्या शिवभक्तांनींच घ्यावें इतर नीच लोकांस तें घेण्यास अधिकार नाहीं

जे लोक शिवभक्ति करीत नाहींत अनेकतऱ्हेचीं पापकर्में करितात त्यांस निर्दोष अशा शिवनिर्माल्याचा उपयोग घेण्याचा अधिकार आहे असें प्रमाण कोठेंही सांपडणार नाहीं.

शिवलिंगाचा प्रसाद भक्षण केला तर जें फळ मिळतें तेंच फळ गुरुचा आणि जंगमाचा प्रसाद भक्षण केला तरी लागतें. ह्यासाठीं गुरु, महादेव आणि शिवयोगी ( जंगम ) हे तिन्हीही सारखेच समजून त्यांची दररोज पूजा करावी व त्यांचें प्रसादान्न भक्षण करावें. भक्तिमान् भक्तानें शिवलिंगाची, शिवगुरुची आणि शिवयोग्याची ( जंगमाची ) भक्ति करून त्यांचा प्रसाद मिळाल्यानंतर व आपल्या शक्तीप्रमाणें नेहमीं दान करावें. सर्व प्रकारचें शैवागम ज्यांनीं चांगल्या रीतीनें वाचले आहेत अशा ज्ञानी लोकांनीं दानाचे तीन प्रकार सांगितले आहेत ते असे १ सोपाधि २ निरुपाधि ३ सहज हे होत.

कांहींतरी ह्या दानापासून आपला उपयोग व्हावा ह्या इच्छेनें

जें दान करावयाचे तें सोपाधिदान होय, तें दान मोक्षप्राप्तीची इच्छा करणाऱ्या मुमुक्षु लोकांस उपयोगीं पडत नाहीं. आपणास ह्या दानापासून अमुक एक उपयोग व्हावा अशी इच्छा मुळींच न करितां फक्त तें दान ईश्वरास ( शंकरास ) अर्पण व्हावें ह्या हेतूनें जें दान करावयाचें तें निरुपाधिक दान होय असें दानतत्वस्वरूप जाणणाऱ्या लोकांनीं मानिलें आहे.

न देणारा, देणारा, द्यावयाचें दान हें सर्व शिवस्वरूप आहे आत्म्याकडे (जीवाकडे) कांहीं नाही कर्ता करविणारा सर्व शंकर आहे अशी कल्पना होऊन जें दान करावयाचें तें सहजदान होय. तीनप्रकारच्या सांगितलेल्या दानांत सहजदान हे सर्वांपेक्षां उत्तम मानलेलें आहे तें मनुष्यांस शिवज्ञानाची प्राप्ति करून देणारें असून जन्ममरणरूप रोग चुकविणारें आहे. स्थावर लिंगरूपी शिवाला व शिवभक्ताला जर भक्तीपूर्वक कांहीं जमीन वगैरे दान दिलें तर तें देखील उत्तम सहज-दानच होय असें समजावें. सत्पात्राला एक हजार मोहरा दान केल्या तर जें पुण्य लागतें तेंच पुण्य शंकराला एखादें चांगलें सुवासिक फूल भक्तीनें वाहिलें तर लागतें.

शंकर हेंच उत्तम पात्र आहे, शंकर हे सर्व विद्यांचे अधिपति असून गुरु आहेत त्यांस जर यत्किंचित् दान केलें तर त्या दानाचें अनंतपट ज्यास्त फळ मिळतें. (विरक्त) शिवयोगी प्रत्यक्ष शंकरच आहे, व शिवज्ञानाचा महासमुद्र आहे, त्याला यत्किंचित् दान केलें तरी त्याचा अतिशय उपयोग होतो (त्याचें अक्षय्य फळ मिळतें.) परलोकीं त्याचा उपयोग होतो. शिवयोगी हें श्रेष्ठ सत्पात्र आहे, कोणतेंहीं दान करणें असो शास्त्राचा विचार पाहूं लागलें तरी जंगमापेक्षां उत्तम सत्पात्र दुसरें नाहीं असेंच दिसून येतें.

शांतस्वभावाच्या शिवयोग्यास (जंगमास) घांसभर अन्न दान केलें तर जें पुण्य लागतें (फळ मिळतें) तें कोटि यज्ञ केले तरी मिळत नाहीं इतकी जंगमास दान केल्याची योग्यता आहे. शिवयोगी पोटभर जेऊन तृप्त झाला म्हणजे शंकर तृप होतो शंकर तृप्त झाला म्हणजे त्याचेंच स्वरूप असलेलें हें सर्व स्थावर जंगम विश्व तृप्त होतें ह्यासाठीं हरएक प्रकारानें हरएक प्रकारचें काम करून नेहमी अन्नवगैरे दान

करून शिवयोग्याचीं (जंगमाची) तृप्ति करावी. ज्याला उपाधि नाहीं अशा चित्स्वरूपीं आनंदमयरूपांत ज्याचें सर्व ज्ञान अर्पण झालें तो दान करणारा भक्त धन्य होय तो प्रत्यक्ष शंकरच समजावा.

वर जे शिवभक्ताच्या वर्तनाचे प्रकार सांगितलें ते सर्व योग्यरीतीनें पाळून जो भक्त नेहमीं सहजदान सत्पात्रास अर्पण करितो ज्याला ब्रम्ह विष्णु वगैरें देवांची सुखें देखील कसपटाप्रमाणें वाटतात तो भक्त असला तरी महेश्वरच समजावा.

ह्याप्रमाणें वीरशैवांच्यां धर्मांचे निर्णय असलेल्या सिद्धान्तशिखामणि ग्रंथांतील भक्तस्थलांपैकीं भक्तमार्गक्रियावगैरे वर्णन असलेला हा नववा दीप संपला.

## = दीप १० वा =

अगस्त्य म्हणतात हे रेणुका, प्रमथेश्वरा, तूं भक्तस्थल सांगितलेंस तें समजलें, आतां कोणता निराळेपणाचा आचार केला म्हणजे भक्त हा भक्ताची पदवी सोडून माहेश्वराची पदवी पावतो ? तें सांग.

रेवणसिद्ध म्हणतात—नेहमीं शिवभजनांत तत्पर असणारा व नेहमीं सहजदान सत्पात्रास अर्पण करणारा ब्रम्हदेव विष्णु वगैरे देवांच्या सुखास देखील कसपटाप्रमाणें मानणारा भक्त हाच माहेश्वर आहे असें समजावें. वैराग्य वरचेवर ज्यास्त वाढत जाऊन शिवभक्तीचा जेव्हां उत्कर्ष (वृद्धि) वरचेवर ज्यास्त ज्यास्त होईल तेव्हा निश्चल विचार झालेला तो भक्त माहेश्वर झाला असें समजावें.

पूर्वी शंकरांनीं जसें माहेश्वरस्थल आहे म्हणून सांगितलें आहे तसेंच सांगतो ह्या माहेश्वरस्थलाचें नऊ भेद आहेत ते असे १ माहेश्वरप्रशंसास्थल, २ लिंगनिष्ठास्थल, ३ पूर्वाश्रयनिरसस्थल, ४ अद्वेतनिरसस्थल, ५ आव्हाननिरसनस्थल, ६ अष्टमूर्तिनिरसनस्थल ७ सर्वगत्वनिरसनस्थल, ८ शिवजगन्मयस्थल, ९ भक्तदेहिकलिंगस्थल. असे ह्या माहेश्वरस्थलाचे नऊ भेद आहेत असें समजावें.

अगस्त्यऋषे, मीं आतां पहिल्यापासून क्रमाक्रमानें स्थलभेदाचें लक्षण सांगतों तूं नीट लक्ष्य लाऊन ऐक.

रुद्र हा सर्व त्रैलोक्यापेक्षां श्रेष्ठ आहे, सर्व त्रैलोक्यांवर कृपा

करणार आहे, असा ज्याचा दृढनिश्चय आहे त्यास माहेश्वर म्हणावें. ब्रम्हदेव, विष्णु वगैरे देव पातकी आहेत त्या देवांबरोवर शंकराची बरोबरी कोणी करूं लागला तर ज्याला खपत नाहीं त्याला माहेश्वर म्हणावें शंकर हा प्राणिमात्रांपेक्षां ब्रम्हादिकदेवांपेक्षां देखील श्रेष्ठ आहे असें समजून आपल्या समजुतीप्रमाणें त्याच्याच सेवेमध्यें गुंतलेला असतो त्यास माहेश्वर म्हणावें.

ब्रम्हदेव वगैरे सर्व देवतांचे समुदाय मायेनें भुलून गेलेले आहेत त्यामुळें आपल्या भक्तलोकांस मोक्षप्राप्ति करून देण्यास असमर्थ आहेत व त्यांस जन्म आहे मरण आहे फक्त शंकर मात्र एक असा आहे कीं, त्याला जन्म नाहीं मरण नाहीं तो आपल्या भक्तांस मोक्षसुखाची प्राप्ति करून देतो असें ज्याला समजतें त्यास माहेश्वर म्हणावें

ब्रम्हदेव, विष्णु वगैरे देवांच्या संपत्तिही अशाच प्रकारच्या नाशवंत आहेत त्या संपत्ति ज्याला कसाटाप्रमाणें वाटतात त्याला वीरमाहेश्वर असें म्हणावें. शब्द, स्पर्श वगैरे धर्म ज्यांत आहेत अशा विषयसुखास अल्प आणि तुच्छ मानून शिवस्वरूपाच्या आनंदाची जो आवड करितो त्याला वीरमाहेश्वर म्हणावें.

जो परस्त्रीकडे पापदृष्टीनें कधींही पाहत नाहीं. दुसऱ्याच्या पैशाकडे ढुंकूनही पाहत नाहीं ( दुसऱ्याचें द्रव्य लबाडीनें मिळवींत नाहीं. ) शिवाच्या कामांत आपलें द्रव्य आणि वेळ खर्च करितो, नेहमी शिवागमांत सांगितलेल्या आचाराप्रमाणें आपलें आचरण ठेवतो. शिवस्तुतीची गोडी लागल्यामुळें ज्याचें मन सुखांत बुडून गेलें आहे, जो निष्पाप रीतीनें आपलें वर्तन ठेवितो, शिवधर्माचा उत्कर्ष ज्या रीतीनें होईल त्या रीतींनें जो शिवधर्माचा उत्कर्ष करितो. ज्याला ममता नाहीं, ज्याला अभिमान नाहीं, अज्ञानपणामुळें प्राण्यास जीं संकटें भोगावी लागतात तीं संकटें ज्याला मुळींच भोगावीं लागत नाहींत, ज्याला गर्वाचा गंध नसून ज्याचा मत्सरी स्वभाव मुळीच नसतो. ज्याला कामविकार मुळीच होत नाहीं व रागाचा आवेशही ज्याला येत नाहीं जो नेहमी आनंदी स्वभावाचा दिसतो व नेहमीं प्राणिमात्रांचें हित करितो. शिवकार्यास कोणी अडथळा आणल्यास तो दूर करण्यास नेहमीं झटत असतो शिवाच्या धर्माचा उत्कर्ष व्हावा असें मनापासून

इच्छिणाऱ्या सज्जन लोकांचा नेहमीं स्नेह करितो. शिवधर्माचा ऱ्हास होण्याचा प्रसंग आल्यास आपल्या जीवाची देखील पर्वा न करितां शक्य तितका प्रयत्न करून शिवधर्माचें संकट दूर करितो, शिवधर्मांवर एकनिष्ठपणानें विश्वास ठेवितो सर्व प्राणिमात्र शंकराचेच अंश असून सर्वत्र शंकर परिपूर्णपणानें भरलेला आहे असें मानितो त्यास वीर-माहेश्वर म्हणावें

ह्या माहेश्वरांचें लिंगनिष्ठा नांवाचें एक श्रेष्ठ स्थल आहे म्हणून सांगितलेलें आहे. प्राण जाण्याचा प्रसंग आला तरी त्यानें लिंग सोडूं नयें. अशा दृढनिश्चयाला लिंगनिष्ठास्थल म्हणतात. माहेश्वराचें सर्व द्रव्य कोणीं लुटून नेवो किंवा दुसऱ्या कोणत्या रीतीनें त्याचा नाश होवो, डोकें तुटण्याचा देखील प्रसंग येवो परंतु माहेश्वर आपल्या इष्टलिंगावरील आपली श्रद्धा कधीही कमी करीत नाहीं व लिंगपूजा करण्याचें महाव्रत सोडीत नाहीं. जे सज्जन लोक लिंगपूजा केल्यावाचून भोजन करीत नाहींत त्या महासामर्थ्यवान् लोकांस मोक्षलक्ष्मी त्यांच्या अगदीं हातांत असल्यासारखी आहे.

वाईट तऱ्हेच्या दुसऱ्या इच्छा परिपूर्ण करणाऱ्या इतर सामान्य-धर्मास काय करावयाचें आहे ? शंकराचा लिंगार्चन करण्याचा धर्म प्रत्यक्ष मोक्षप्राप्ति करून देणारा आहे. नियमानें पूजा केलेल्या लिंगास समर्पण केलेल्या अन्नानें आणि पाण्यानें जें लोक आपल्या देहाचें रक्षण करितात शिवलिंगास अर्पण केलेले अन्न भक्षण करितात व शिवचरणोदक प्राशन करितात ते श्रेष्ठ माहेश्वर होत. चित्स्वरूप अशा शंकर-लिंगांत ज्याचें मन नेहमीं स्थिर असतें इतर कोणत्याही गोष्टीकडे मुळींच जात नाहीं ते प्रत्यक्ष शंकर होत ह्यांत कांहीं संशय नाहीं,

लिंगस्वरूपाच्या ध्यानांत ज्याचें मन गढून गेलें आहे, लिंगस्वरूपाचें वर्णन करण्यांत ज्याची वाचा नेहमीं तयार असते, ज्याचे हात नेहमीं लिंगपूजन करण्यांत गुंतले असतात तो रुद्र आहे ह्यांत शंका नाहीं.

ज्याचा इष्टलिंगावर दृढनिश्चय आहे त्याला स्वर्गप्राप्ति होण्यासाठीं इतर कर्मं करण्याचें काय कारण आहे ? कां तर त्याला नेहमीं आनंद देणारी शिवप्राप्ति व्हावयाचीच हें ठरलेलें आहे.

जो नेहमीं इष्टलिंगावर दृढ निश्चय ठेवितो, ज्याचा स्वभाव शांत

आहे, ज्यानें कपाळास व अंगास विभूति लावून गळयांत रुद्राक्षांच्या माळा घातल्या आहेत त्या मनुष्याची ब्रम्हदेव वगैरे देव देखील आनंदानें प्रशंसा करितात. लिंगावर दृढनिश्चय ठेवणाऱ्या माहेश्वरानें लिंगैकनिष्ठहृदय होण्यापूर्वी आपलें जें वर्तन होतें त्या वर्तनानें आचारास बाध येत असल्यास तें वर्तन सोडून द्यावें. लिंगनिष्ठेला प्रतिकूल असणारे ब्राम्हण वगैरे जाती व कुंभार वगैरे कुलापासून आलेले सोयर सूतक वगैरे धर्म सोडणाऱ्या माहेश्वरास पूर्वाश्रयनिरासक असें म्हणतात.

शिवदीक्षेचा संस्कार झाल्यामुळें निर्दोष झालेल्या सज्जन पुरुषांस पूर्वींचे ते खोटे धर्म घेऊन काय करावयाचें आहे ? नीच लोकांसच ते आचार योग्य आहेत. शिवभक्तास ( माहेश्वरास ) योग्य नाहींत. शिवदीक्षेचा योग झाल्यामुळें शिवधर्मांचा आश्रय करणाऱ्या शिवयोग्याचें मन नीच लोकांच्या धर्माकडे कधीं जात नाहीं.

मनुष्यांचे दोन भेद मानले आहेत, एक शुद्ध आणि दुसरा प्राकृत. ज्या मनुष्यांस शिवदीक्षेचा संस्कार झालेला आहे ते शुद्ध आणि ज्यांस शिवदीक्षेचा संस्कार झाला नाहीं ते प्राकृत लोक समजावेत.

वर्णाश्रम धर्माची व्यवस्था दोन प्रकारची मानली आहे, एक शंकरांनीं सांगितलेली आणि दुसरी ब्रम्हदेवानें सांगितलेलीं अशा ह्या झाल्या.

शिवधर्माप्रमाणें आचरण करणाऱ्या लोकांस शिवानें सांगितलेल्या धर्मावर विश्वास ठेवणे योग्य असून शिवधर्माचा संस्कार झाला नाहीं अशा लोकास ब्रम्हदेवानें सांगितलेल्या धर्मावर निष्ठा ठेवणें योग्य आहे.

पूजा करणारा भक्त (जीव) आणि पूजा करावयाचें लिंग ह्या दोहोंचा निराळेपणा नाहींसा झाला तर पूजा करणें व लिंगावर निष्ठा ठेवणें ह्यास बाध येतो. ह्यास्तव सर्व अद्वैत विचाराची प्रवृत्ति नाहींशी झाली तर तो कर्मी (शिवलिंग पूजा करणारा) माहेश्वर अद्वैतनिरासक होतो. प्रेरणा करणारा शंकर आहे, ज्यास प्रेरणा करावयाची तो आत्मा ( जीव ) आहे, ह्या निराळेपणामुळें द्वैतमत पाळणाऱ्या वीरशैवानें शंकराची नित्य पूजा केली पाहिजे, क्रियेविषयीं त्यानें अद्वैतपर होऊं नये.

महादेव हा पशुपति आहे, आणि त्या महादेवाच्या आश्रयानें राहणारा जीव हा पशु आहे त्या दोघांचा धनीपणा आणि सेवकपणा

एक ( ह्या दोघाला अभेद ) कसा होईल ? ज्ञान होऊन श्रेष्ठ शिवतत्व जेव्हां प्रत्यक्ष होईल तेव्हां अद्वैताची पूर्ण योग्यता अंगी येईल. एरव्ही ज्ञानहीन मनुष्यास कधींही येणार नाहीं लिंगपूजा वगैरे कर्म करण्या-मुळें निराळेपणा शिवांत आणि जीवांत आहे हें उघड दिसून येतें. ह्यासाठीं लिंगपूजा वगैरे कर्मं करणाऱ्या वीरशैवानें अद्वैत मानूं नये-निराळेपणा आहे अशी कल्पना केली म्हणजे लिंगपूजा वगैरे कर्म वीर, शैवास करावें लागतें, ह्यास्तव लिंगपूजा करण्यांत तत्पर असणाऱ्या वीरशैवानें अद्वैत शास्त्रास महत्व देऊं नये. ( मी आणि शंकर एकच आहे असा निरर्थक गर्व करून लिंगपूजा करणें वगैरे आपलें वर्तव्य कर्म सोडून देऊं नये. )

नेहमीं लिंगपूजन करण्यांत तत्पर असणारा. निष्पाप स्वभावाचा, सर्व प्रकारचें अद्वैत सोडून देणारा वीरशैव शिवस्वरूपी आपल्या त्या इष्टलिंगाची पूजा करीत असतां त्यानें शंकरास आवाहन करूं नये, ( शिवपूजन करणारा शैव शिवपूजेच्या वेळीं जसें शिवास आवाहन करितो तसें वीरशैवानें आवाहन करूं नये. )

ह्याचें कारण असें कीं, जेव्हां त्याच्या श्रेष्ठ गुरूनें त्याला 'शिव शक्तीचें अधिष्ठान असलेलें लिंग दिलें त्या वेळेपासून शिव त्या लिंगांत रहातच आहे मग निराळे पुन्हां शिवास आवाहन करण्याचें काय कारण आहे ? त्या संस्कार केलेल्या लिंगांत शिव राहत नाहीं असें नाहीं निरंतर राहतोच ह्यासाठीं लिंगपूजेच्या वेळीं पुन्हां शिवाचें आवाहन करण्याचें कारण नाहीं, केल्यास तें चुकीचें आहे लिंगावर दृढ विश्वास ठेवणाऱ्यानें इष्टलिंगाचे पूजेच्या वेळीं शिवाचें आवाहनही करूं नयें आणि विसर्जनही करूं नये, असा शास्त्राचा तात्पर्यार्थ आहे.

ज्याप्रमाणें शिवलिंगाची पूजा करणाऱ्या वीरशैवाला लिंगाचें आणि जीवाचें निराळेपण नाही असें म्हणणें संमत नाहीं त्याप्रमाणेंच शिवाचें आणि पंचमहाभूतांचें निराळेपण नाहीं असें म्हणतां येत नाहीं,

शंकर हे अष्टमूर्ति आहेत, पृथ्वी, तेज, वायु. आकाश, सूर्य, चंद्र यजमान (आत्मा) हे सर्व शंकराचें अंश असून सर्व मिळून एक शंकराचें शरीर तयार होतें, त्या त्या अंशांत शंकर असल्यामुळें पृथिव्यादिक पंचमहाभूतें आणि शंकर एकच आहेत असें होते तरी एक म्हणतां येत

नाहीं. पृथ्वी वगैरे पंचमहाभूतें कार्य असून महादेव हा कर्ता आहे हे स्पष्ट समजण्यासारखें नसल्यास कुंभार आणि माती ह्यांचा दृष्टांत बरोबर जमतो कुंभार कर्ता असून माती कार्य आहे, त्याप्रमाणेंच शंकर कर्ता असून पृथ्वी वगैरे पंचमहाभूतें हीं कार्य होत; त्यापासून जग निर्माण होतें. पृथ्वी, आप् तेज, वायु, आकाश, चंद्र, सूर्य, अग्निहोत्री (आत्मा) हा आठ प्रकारचा प्रपंच मिळून शंकराचें शरीर आहे, हा आत्मा शंकर सर्व तत्वांस योग्य रीतीनें वागविणारा आहे. त्यामुळें हे सर्व आठ भाग प्रपंच मिळून एक शंकराचें शरीर मानलें असल्यानें शंकर त्या शरीरांत आत्म्यासारखे राहतात, त्या पृथ्वी वगैरे पंचमहाभूतांशीं शंकराचा निराळेपणा नाही असेंही म्हणतां येत नाहीं, आणि आहे असेंही म्हणतां येत नाहीं

पृथ्वी वगैरे पंचमहाभूतें अचेतन (निर्जीव) आहेत, आत्मा (जीव) अज्ञान आहे महेश्वर सर्वज्ञ आहे त्यांचें आणि जडस्वरूप पृथ्वी वगैरे पंचमहाभूतांचें आणि आत्म्याचें एक रूप कसें होईल ? कधींच होणार नाहीं ह्याप्रमाणें जो वीरशैव नेहमीं पृथ्वी वगैरे अष्टमूर्तींहून शंकर हा विलक्षण ( निराळा ) आहे असें मानतो त्याला अष्टमूर्तिनिरासक असें म्हणावें शंकर हा सर्वत्र व्यापलेला आहे ह्यास्तव कशाचेंही पूजन केलें तरी शंकरास पोहचतें. मग लिंगपूजा केली म्हणजेच शिवपूजा होतें असें म्हणण्याचें कारण नाहीं असें होईल, ह्यास्तव लिंगावर दृढ विश्वास ठेवणारा मनुष्य लिंगांतच शंकर आहे असें मानतो; सर्वत्र शंकर व्यापलेला आहे असें मानीत नाहीं.

शंकर हा सर्वत्र व्यापलेला आहे ही गोष्ट जरी खरी आहे तरी आपलें रहावयाचें मुख्य ठिकाण लिंग त्यांतच तो जास्त राहतो, ह्यासाठीं शिवलिंगाहून इतर स्थलांकडें दुर्लक्ष्य करून वीरशैवानें शिवलिंगाचीच पूजा करावी. शंकर सर्व ठिकाणीं व्यापलेला आहे तरी आपल्या मुख्य ठिकाणीं जास्त राहतो प्रत्येक झाडात अग्नि तर आहेच परंतु त्यांतलें त्यांत शमीच्या झाडांत जास्त आहे त्याचप्रमाणें शंकरही आपल्या मुख्य ठिकाणीं (लिंगांत) जास्त रहातो.

महेश्वर सर्व ठिकाणी व्यापलेला आहे ही गोष्ट तर सर्व शास्त्रांत प्रसिद्ध आहे, तरीपण त्याचें आश्रयस्थान लिंग असल्यामुळें भक्तलोकांची

पूजा घेण्याकरितां तो तेथें जास्त रहातो.

शंकरा तूं लिंगांत राहतोस, तुझें स्वरूप नेहमीं प्रकाशमान आहे तुझें शरीर कल्याणकारक आहे, शांत आहे, पातकाचा नाश करणारें आहे असें प्राचीन काळापासून असणारा वेद सांगतो. ह्यासाठीं पूजा करणारा भक्तश्रेष्ठ ( वीरशैव ) हरप्रयत्नानें सर्व स्थानांकडे ( लिंगाखेरीज इतर कोणत्याही देवाकडे ) न पाहतां आपल्या इष्टलिंगांतच शिवाची पूजा करितो.

शिव सर्वत्र व्यापलेला आहे तरी शिवाची इष्टलिंगांतच पूजा करणारा वीरशैव शिव सर्वत्र भरलेला आहे असें मनांत न आणतां त्याच्या सर्वत्र व्यापकत्वाकडे न पाहतां इष्टलिंगाचीच पूजा करितो, त्याला सर्वगत्वनिरासक असें म्हणतात.

ईश्वर सर्व नियामक असला तरी पूजा करावयाच्या वेळीं शंकर भक्ताधीन असल्यामुळें इष्टलिंगांतच शिवमूर्ति आहे असें समजून वीरशैव लिंगपूजा करितो तरी शंकर सर्व ठिकाणीं व्यापलेला आहे असें मानतो. ज्याप्रमाणें कुंभारानें तयार केलेली मातीचीं घागर मातीहून वेगळी नाहीं त्याप्रमाणेंच शंकरापासून सर्व स्थावर जंगम विश्व उत्पन्न झालें असल्यामुळें शंकरांत आणि विश्वांत कांहीं एक निराळेपणा नाहीं. ज्याप्रमाणें समुद्राच्या पाण्यांस फेंस येतो, लाटा उसळतात, बुडबुडे येतात तरी फेंस, लाटा व बुडबुडे हे समुद्राच्या पाण्याहून वेगळे नव्हेत त्याचप्रमाणें शिवतत्वापासून उत्पन्न झालेलें हें त्रैलोक्य शिवाहून वेगळें नाहीं ज्याप्रमाणें अनेक दोरे एकेजागीं ओंवून तयार केलेलें वस्त्र दोऱ्याहून वेगळें नाहीं त्याप्रमाणें शिवापासून उत्पन्न झालेले हें स्थावर जंगम विश्व शिवाहून वेगळें नाहीं.

आपल्या शक्तीच्या जास्त पणामुळें शंकर हा त्रैलोक्याच्या रूपानें राहिला आहे. जसें वस्त्राचा तंतु गुंडाळून ठेवला तर अगदीं लहान दिसतो आणि पसरला म्हणजे लांबवर पसरतो, त्याचप्रमाणें शंकर आपल्या सामर्थ्यातिशयामुळें लिंगांत संक्षिप्तरूप होऊन राहतो आणि सर्व जगांत प्रसार पावण्याचें रूप घेऊन राहतो.

ह्यावरून वास्तविक पाहूं लागलें तर हें सर्व स्थावर जंगम विश्व शिवस्वरूप आहे, तेंच एकरूपामुळें (तें एकच आहे तरी) दोरी पाहून

जसा साप असल्याचा खोटा संशय येतो तसेंच शंकर वास्तविक एक रूपच आहे तरी जग निराळें आणि ईश्वर निराळा असें भासतो.

दोरी पाहून जसा सापाचा संशय येतो, शिंप पाहून जसा रुप्याचा संशय येतो, एखादें उंचवठलेलें झाड पाहून जसा चोर उभा राहिला असें वाटतें, उन्हाच्या झळयांत जसा पाण्याचा लोट वाहतो असा संशय येतो आकाशास पाहून जसें एखादें गंधर्वनगर असावें असा संशय येतो तसाच प्रपंचांतील सर्व प्रकारचे भेद ज्याचे नाहींसे झाले आहेत अशा सच्चिदानंदस्वरूप शिवामध्यें त्रैलोक्य असल्याचा खोटा भास होतो वास्तविक पाहतां शिवच काय तो एकटा अविनाशी आहे' जग नश्वर असून सर्व खोटें आहे पानें फांद्या डाहळया ह्या रूपानें एखादें झाड जसें शोभावें त्याचप्रमाणें शंकर एकच आहे तरी पृथ्वी, आप्, वायु, आकाश वगैरे रूपानें शोभतो.

शंकर हा सर्वांचा अन्तर्यामी राहणारा परमेश्वर आहें तरी आपल्या भक्तांच्या हृदयकमलांत तो विशेषरीतीनें शोभतो.

वास्तविक पाहतां शंकराची मुख्य राहण्याचीं स्थानें म्हटली तर कैलासपर्वत, मंदरपर्वत, हिमालयपर्वत, मेरुपर्वत आणि शिवभक्तांचीं हृदयें हीं होत, त्या ठिकाणीं इतर ठिकाणापेक्षां तो ज्यास्त राहतो. शंकर हा परिपूर्ण असून सर्व जगाच्या अंतर्यामी राहतो तरी व परिछिन्न (तुकडे तुकडे) झाल्याप्रमाणें प्रत्येक प्राणिमात्रांच्या हृदयांत जसा राहतो तसाच नेहमीं आपल्या भक्तलोकांच्या मनांत राहून शोभतो.

हे शंकरा, तुझें कल्याणकारक शांत आणि पातकांचा नाश करणारें स्वरूप (शरीर) तुझ्या भक्तांच्या मनांत नेहमीं राहतें असें अनादिकालापासून असणारा वेद सांगतो

जे लोक निष्पाप (शुद्ध आचरणानें वागणारे आहेत) वैराग्य पावलेले आहेत, विचारशील आहेत, मोठ्या मनाचे आहेत, शिवलांछान (भस्म रुद्राक्ष) वगैरे धारण करणारे आहेत त्यांच्या मनांत सर्वांच्या अंतर्यामी राहणारा शिव जास्त राहतो. जे लोक नेहमीं आनंदांत निमग्न झालेले असतात, शिवज्ञानामुळें ज्यांचा कर्मांचा नाश झाला आहे अशा माहेश्वरांच्या (जंगमांच्या) चित्तामध्यें शंकर शोभतो.

जे माहेश्वर (जंगम) शिवाखेरीज इतर देवांची मुळीच भक्ति करीत

नाही, आपल्या लिंगाची पूजा मात्र एकाग्रमनाने करितो, सर्व त्रैलोक्य शिवस्वरूप असें मानतो त्या माहेश्वरास (जंगमास) प्रसादी असें म्हणावें.

ह्याप्रमाणें श्रीवीरशैवधर्माचा निर्णय असलेल्या शिद्धान्तशिखामणि ग्रंथांतील माहेश्वराच्या ( जंगमाच्या ) नऊ प्रकारच्या स्थलांचें (अधिकारांचें) वर्णन असलेला हा दहावा दीप संपला.

## = दीप ११ वा =

प्रमथेश्वरा, रेणुकाचार्यां इष्टलिंगावर दृढ विश्वास ठेवून सर्व प्रकारचे शिवधर्म पाळणाऱ्यास माहेश्वर (जंगम) म्हणतात तें समजलें. आतां हा माहेश्वर प्रसादी अधिकारास कसा पोंचतो ? आणि प्रसादी कशास म्हणतात. तें सांग.

रेवणसिद्ध म्हणतो-इष्टलिंगावर दृढनिश्चय ठेवला म्हणजे आपाप त्याच्या पूर्वार्जित सर्व पातकांचा नाश होतो व शिवज्ञानाचा बोध होऊन त्याचें मन प्रसन्न होतें त्या माहेश्वरास प्रसादीं म्हणतात प्रसादिस्थलाचा अधिकार मोठा आहे, त्यांत कांहीं अंतरस्थलें (पोट भेद) आहेत त्यांवरून प्रसादिस्थल सात प्रकारचें मानलें आहे. ते सात प्रकार पुढें लिहिल्या-प्रमाणें आहेत.

१ प्रसादिस्थल, २ गुरुमहात्म्यस्थल, ३ लिंगप्रशंसास्थल, ४ जंगम-गौरवस्थल, ५ भक्तमहात्म्यस्थल, ६ शरणकीर्तनस्थल, ७ शिवप्रसाद-माहात्म्यस्थल असे प्रसादिस्थलाचे सात भेद आहेत.

अगस्त्यऋषे मी आतां तुला क्रमाक्रमानें प्रत्येक स्थलाचें लक्षण सांगतों. मन प्रसन्न होणें (निर्मल होणें) (आनंदित असणें) हे प्रसादि-स्थलाचें मुख्य लक्षण आहे, हा निर्मलत्वरूपप्रसाद शंकराच्या कृपेने प्राप्त होतो

शिवाला जें द्रव्य समर्पण केलें त्यास शिवप्रसाद म्हणतात तें निर्माल्य वीरशैवलोकांस मन निर्दोष होण्यास कारण आहे. (शिवनिर्मा-ल्यानें मन निष्पाप होतें,) मन प्रसन्न होण्यासाठी निर्मल शिवज्ञानाची प्राप्ति करून देणाऱ्या शिवप्रसादाचा जो स्वीकार करितो त्यास (वीरमाहेश्वरास) प्रसादी म्हणावें.

शुद्ध अन्न भक्षण केलें म्हणजे चांगली तत्वशुद्धि होते ( शरीर व

इंद्रिये यांस बळकटी येते) शिवास ज्या अन्नाचा नैवेद्य दाखविला तें अन्न तर निर्दोष असल्यामुळें चांगली बुद्धि होऊन मन शुद्ध होणें साहजिकच आहे. म्हणून नेहमीं वीरमाहेश्वर शिवप्रसादच भक्षण करितो. तेंच शिवनिर्माल्य नेहमीं भक्षण करणाऱ्या व लिंगपूजा एकनिष्ठपणानें करणाऱ्या प्रसादींला ज्ञान होण्यासारखा अलौकिक मनः प्रसाद (आनंदीपणा) प्राप्त होतो. आपल्या स्वतः उपयोगाकरितां जें जें द्रव्य संपादन केलें असेल तें तें अगोदर शंकरास अर्पण करून मग आपण त्याचा उपभोग घ्यावा म्हणजे मन निष्पाप होते.

शंकर हा नित्यसिद्ध (जन्ममरण नसणारा) असा आहे, जन्म, मरणरूपी ज्यांना रोग झाला आहे त्यांचा तो रोग औषध देऊन (ज्ञान शिकवून) बरा करणारा उत्तम वैद्य आहे, त्याला ज्या ज्या अन्नाचा नैवेद्य दाखविला (त्यानें जें जें अन्न प्रसाद म्हणून दिलें) तें तें लिंग-पूजकानें भक्षण करणें म्हणजे जन्ममरणरूप रोग दूर होण्यासाठीं रसायन खाण्यासारखें आहे.

त्या प्रसादान्नाचें भक्षण केलें असतां भक्षण करणारांचें आरोग्य जास्त वाढतें. मन शुद्ध होतें आणि आध्यात्मिक आधिभौतिक व आधि-दैविक हे तीन प्रकारचे ताप औषध घेतल्यानें जसे रोग बरे होतात तसेच प्रसादान्नामुळें हे ताप नाहीसे होतात. शिवप्रसादान्नामुळें विद्येची शुद्धि होऊन वृद्धि होते, संकटांचें निरसन होतें. ज्ञानमार्ग खुला होतो. आणि अज्ञानाचा समूळ नाश होतो. शिवप्रसादान्न वैराग्यस्वरूपसंपत्ति वाढ-विण्यास मूळ कारण आहे, अतिशय ब्रम्हानंद प्राप्त करून देणारें आहे, पातकी मनुष्यांना तो शिवप्रसाद मिळणें फार दुर्मिळ असून निर्दोष वर्तन असलेल्या पुण्यवान् मनुष्यांस तो सहज मिळतो. ब्रम्हदेव, विष्णु वगैरे देवांनी शिवप्रसादाचा स्वीकार केला, तसेंच वसिष्ठ वगैरे मोठमोठ्या ऋषीश्वरांनीं देखील शिवप्रसादान्नाचा स्वीकार केला, ह्यासाठीं मोक्ष-प्राप्तीची इच्छा करणाऱ्या मनुष्यांनीं शिवनिर्माण (शिवास दाखविलेला नैवेद्य वगैरे) अवश्य भक्षण करावा.

पान, फूल, फळ, पाणी वगैरे कांहींही असो, शिवाला म्हणून जें अर्पण केलें त्याचा त्याचा स्वीकार केल्यामुळें सर्व पातकांचा नाश होतो. लिंगपूजन करणाऱ्या प्रसादीनें जसें शिवप्रसादान्नाचें भक्षण करावें तसेंच

गुरुप्रसादान्न व शिवयोग्याचें (जंगमाचें) प्रसादान्न भक्षण करावें. भोग मोक्ष वगैरे सर्व प्रकारच्या सिद्धि प्राप्त करून देण्यास ह्या लोकीं गुरु कारण आहे ( गुरुच्या कृपेनें ह्या लोकीं सर्व प्रकारच्या सिद्धि प्राप्त होतात) कां तर, गुरु हा प्रत्यक्ष शंकरच असून तो गुरुचें रूप घेऊन आलेला आहे.

महादेव हा निष्प्रपंच आहें, शाश्वत ( चिरकाल ) टिकणारा ज्ञानाचा तो महासमुद्र आहे, तो सर्वान्तर्यामी असून सर्वांवर कृपा करणारा आहे, तो गुरुच्या रुपानें अवतरला आहे असें समजावें, जो शिव आहे तोच गुरु आहे जो गुरु आहे तोच शिव आहे, जो बुद्धिमान् आणि पूर्णज्ञानी आहे तो गुरुमध्यें आणि शंकरामध्यें निराळेपणा आहे असे मुळींच मानींत नाहीं, ह्या गुरुलाही इतर लोकांप्रमाणेंच हात, पाय वगैरे आहेत, म्हणून इतर लोकांत आणि गुरुत अंतर काय आहे ? असें मुळींच म्हणूं नये. आचार्य हा निष्पाप शिवज्ञानाची प्राप्ति करून देणारा असून प्रत्यक्ष शंकराच्या रूपानें अवतरलेला आहे.

आचार्याचा अपमान केला तर आपलें कल्याण व्हावयाचें असलें तरीं होत नाहीं, ह्यास्तव भोग व मोक्ष ह्यांची प्राप्ति व्हावी अशी इच्छा असल्यास भक्तानें एक निष्ठपणानें गुरुची पूजा केली पाहिजे. ज्यानें गुरुभक्ति केली नाहीं, त्याचे हातून शिवभक्ति घडत नाहीं ह्यास्तव शिवाची जशी भक्ति करावयाची तशीच गुरुचीही भक्ति केलीं पाहिजे.

गुरुच्या महात्म्यामुळें आणि आपलें स्वतःचें शिवज्ञान जास्त वाढल्यामुळें इष्टलिंगाचें महात्म्य देखील उत्तम तऱ्हेनें कळून येतें. गुरुनें उपदेश केल्यामुळें मनास जें शिवाचें ज्ञान झालें तेंच बोधलिंग (चिन्मयलिंग) होय व तेंच शंकराचें लिंग होय आणि तें सर्व जगाच्या उत्पत्ति स्थिति लयालाही कारण आहे.

शिवलिंग हें श्रेष्ठ दैवत असून पवित्र आहे, निष्पाप असून ब्रम्हस्वरूप आहे, अनादि आणि चैतन्यस्वरूप आहे, त्याला शिव म्हणतात, ते नेहमी आनंदी असून त्यास कोठेही प्रतिबंध होत नाहीं, ते सर्व त्रैलोक्याच्या उत्पत्तीला संरक्षणाला आणि लयालाही कारण आहे. तें वेदांसही कारण आहे त्यापासून ( त्या लिंगस्वरूपापासून चार वेद उत्पन्न झाले) ते सर्व तत्वांस पूर्ण करणारें आहे, व संसार समुद्रांतून

प्राणिमात्रांस तारणारे आहे. ते लिंगस्वरूप तेजःपुंज आहे, तें अमुक तऱ्हेचे आहे म्हणून सांगतां देखील येत नाहीं, योगीश्वरांच्या नेहमीं चित्तांत राहणारें आहे (योगीश्वर नेहमीं ह्या लिंगस्वरूपाचा विचार करितात ) ह्या लोकीं आपल्यावर प्रत्यक्ष सद्गुरूची कृपा असल्यावांचून आपणास त्या शिव रूपाचें यथार्थ ज्ञान कसें होईल, ( कधींही होणार नाहीं.)

शिवलिंग हे तेजःपुंज आहे, पूर्वीं ब्रम्हदेव आणि विष्णु ह्यांस देखील त्या लिंगाचें यथार्थ ज्ञान झालें नाहीं मग त्याचें यथार्थ ज्ञान इतरांस कसें होईल ? फार सांगण्यांत हंशील नाहीं, लिंग हें ब्रम्हस्वरूप असून अनादि आहे, योगीश्वर सनक सनंदन वगैरे लोक त्यांचें सर्व प्रकारचे पाश तुटून ते ह्या लिंगस्वरूपांत लीन (तत्स्वरूप) होतात.

लिंगाचें सिंहासन हे शिवाची श्रेष्ठ शक्ति आहे आणि लिंग हें प्रत्यक्ष श्रेष्ठ शंकर आहे शिव आणि शक्ति यांचा समागम ( दोन्ही एकत्र ) होणें हेंच विश्व (त्रैलोक्य) होय, कशा तऱ्हेचें लिंगाचें वास्तविक स्वरूप आहे.

ब्रम्हदेव विष्णु वगैरे सर्व देव शौनक वगैरे सर्व ऋषीश्वर शिवलिंगाची पूजा केल्यामुळेंच आपापल्या अधिकाराचा उपभोग घेऊं लागले. लिंगस्वरूपी शंकराचें सर्व त्रैलोक्याचें स्वामित्व स्वाभाविक आहे, दुसऱ्या देवांच्यानें शंकराची बरोबरी खचित करवणार नाही, असें अनादि कालापासून चालत आलेला वेद सांगतो. गुरूनें शिष्यास शिकविलेल्या लिंगमहात्म्याच्या संपत्तीपेक्षां चैतन्य स्वरूपाचें ज्ञान असल्यामुळें सर्वांपेक्षा जंगमस्थलाचीं योग्यता मोठी आहे. जे लोक त्रैलोक्यांचा प्रकाश करणाऱ्या शिवास आपल्या अनुभवज्ञानावरून यथार्थ रीतीनें जाणतात त्यांस जंगम म्हणतात.

जे त्रैलोक्याच्या पसाऱ्यास शिवयोगसाधनानें चित्स्वरूप आहे असे मानतात, ज्यांचा पापाचा सर्व संबंध नाहींसा झालेला आहे ( जे पातकी नाहीत) त्यांस शिवयोगी असें म्हणावें.

शिवज्ञान हें भयंकर शंकरस्वरूप अंधकाराचा नाश करणारें आहे, तें शिवज्ञान ज्या लोकांस आहे त्या लोकांस शिवयोगी म्हणतात. ज्यांस मदनाची पीडा होत नाहीं, ज्यांस क्रोधाची पीडा होत नाहीं, ज्यांची

मोहाची गांठ सुटलेली आहे ( ज्यांस अज्ञानपणा नाहीं ) ज्यांस मातीचें ढेकूळ आणि सोनें सारखेंच आहे, त्या सज्जनांस शिवयोगी असें म्हणावें, शिवयोगी लोकांस शत्रु आणि मित्र हें दोन्हींही सारखेच वाटतात, त्यांस प्रत्यक्ष शिवस्वरूपांचें ज्ञान झालेलें असतें. ते निस्पृह असतात, त्यांस अभिमान मुळींच नसतो. ते सर्वांशीं प्रेमभावानें आणि अगदीं साध्या स्वभावावें वागतात.

शिवज्ञान दुर्लभ असून नेहमीं शिवचिंतन करणें हेंही काम कठिण आहे, त्या दोन्ही गोष्टी ज्यांच्या हातून नेहमीं घडतात ते शिवयोगी प्रत्यक्ष शंकरस्वरूपच होत. शिवयोगी लोकांच्या चरणाची धूलि जेथें पडते तेंच ग्रहस्थाश्रमीं लोकांचें घर पवित्र आणि दुसऱ्यास पवित्र करणारें आहे असें समजावें, शिवयोगी लोकांचें दर्शन झालें म्हणजे मनुष्यास सर्व-प्रकारच्या सिद्धि प्राप्त होतात, शिवयोगी लोकांचा स्पर्श झाला असतां पातक नाश होतें आणि शिवयोग्याचें पूजन केल्यानें मोक्ष प्राप्ति होते. शिवयोगी लोक श्रेष्ठ असतात, शिवरहस्य जाणणारे असतात, ते नेहमीं आनंदी असतात, त्या शिवयोगी लोकांची सेवा केलीं तर अमुक एक फलप्राप्ति होणार नाहीं असें काय आहे ? सर्व प्रकारची फलप्राप्ति होईल.

गुरूचें माहात्म्य, लिंगाचें माहात्म्य, जंगमाचें माहात्म्य सांगितलें त्यावरून भक्ताचें माहात्म्य उघडच दिसत आहे तरीपण तें आतां सांगतों. महादेव हा परमेश्वर आहे, त्याचा कधीही नाश होत नाही त्या महादेवाला जे लोक कायावाचामनेंकरून भजतात त्यांस भक्त म्हणावें, संसाराची भींति नाहींशी करणारी शिवाची भक्ति दुर्लभ आहे, सर्वांस ती शिवभक्ति घडत नाही. ती भक्ति ज्याच्या अंगांत (मनांत) असते त्यास भक्त म्हणावे.

वेद शिकून काय करावयाचें आहे ? शास्त्र शिकून काय करावयाचें आहें ? यज्ञ करून काय करावयाचें आहे ? तपश्चर्या व व्रतें करून तरी काय करावयाचें आहे ? जर जन्ममरणरूपी रोग लागलेल्या मनुष्यांस शिवभक्ति चांगली घडत नसेल तर, वर सांगितलेल्या गोष्टींचा कांहीं उपयोग नाहीं. जो मनुष्य शिवभक्ति करींत नसेल त्यानें सत्कर्म केलें तरी त्याचा उपयोग नाहीं, तें व्यर्थ जातें. दक्षप्रजापतीनें प्रत्यक्ष

यज्ञ केला तरी शिवभक्ति नसल्यामुळे त्याचा परिणाम वाईट झाला.

मनुष्य अतिशय पातकीं असला तरी जर तो शिवभक्ति करील तर लागलीच पातकांतून मुक्त होऊन शुद्ध होतो. ह्याला प्रत्यक्ष उदाहरण हें की, चंडानें पूर्वी आपल्या प्रत्यक्ष बापाचा जीव घेतला होता तरी शिवभक्ति केल्यामुळे शंकराचें सायुज्य पावला. शिवाची भक्ति करणाराला पुण्य नाही, पाप नाहीं. शिवभक्ति न करणाराला मात्र त्यांच्या त्यांच्या कर्माप्रमाणें सुखदु:खें भोगावीं लागतात.

जसें सूर्याचे रथास जुंपलेल्या घोड्यांस अंधाराचें भय नाहीं. तसेंच शिवभक्तास पुण्यपाप वगैरे कर्मांचा संबंध नाही एखाद्या उन्मत्त हत्तीला कमळाच्या देठांनी बांधूं म्हटलें तर तें जसें होऊं शकत नाहीं तसेंच शिवाची भक्ति करणारे शिवभक्त हे स्वतंत्र आणि सशक्त आहेत म्हणून त्यांस कर्मचाऱ्यानें पीडा करवत नाहीं. ब्राम्हण असो, क्षत्रीय असो, वैश्य असो, शुद्र असो, किंवा चांडाळ असो, जो शिवाची भक्ति करितो तो शिवासारखाच मान्य आहे. ज्याचे अंगी शिवभक्ति परिपूर्णपणानें भरलेली आहे त्याचे जातीबद्दल विचार करण्याचें कांहींएक कारण राहिलें नाहीं लांकडें विस्तवांत जळून त्यांचे कोळसे झाले म्हणजे त्यांत निराळेपणा अमुक राहिलेला म्हणून काय सांगावा ? सांगतांच येत नाही.

जे दीक्षेमुळें पवित्र झाले असतात, नेंहमीं शिवव्रतें व नियम वगैरे पाळितात. जीं जीं कांहीं कर्मे करितात, त्यांचीं फळें ते शिवास अर्पण करितात, व नेहमीं ते शिवाचें पूजन करितात त्यांस प्रमथपति ( रुद्र ) आहेत असें म्हणावें. गुरु, लिंग, वगैरेचें महात्म्य सांगितलें त्याच क्रमानें आतां शरणस्थान सांगतों. सर्व प्रकारानें शिवच रक्षक आहे म्हणून त्यास अनन्यभावानें शरण जाणें त्यास शरणस्थान असे म्हणतात.

ब्रम्हदेव, विष्णु वगैरे सर्व देवांचे ऐश्वर्य इतर सामान्य मनुष्यांप्रमाणेंच कधीं तरी नाश पावणारें आहे असें समजून त्या देवतांविषयीं उदासीन राहून ( त्यांना सोडून ) आपले मन शिवाकडेच निश्चलपणानें लावितो त्यास शरणस्थल म्हणावें. चंद्र मस्तकावर धारण करणारा शंकर हा सर्व ( प्राण्यांचें ) जगाचें रक्षण करणारा, आहे. त्या शंकरास जो अनन्यभावानें शरण जातो त्यास शरणागत म्हणावें.

ज्या मनुष्याची विषयसुखाची आवड कमी झाली आहे, शिवाखेरीज इतर देवांची ( ब्रम्हदेव विष्णु वगैरेची ) जो भक्ति करीत नाहीं, मोक्षप्राप्ति व्हावी म्हणून जो नेहमीं शिवाचीच भक्ति करितो व शिवालाच मोक्ष मागतो. त्यास शरणार्थी असें म्हणावें

जे लोक कायावाचामनाने शंकरास शरण गेले त्यांस यज्ञ याग जप तप करण्याचें तरी काय काम आहे ? आणि इतर देवतांची भक्ति करण्याचें तरी काय काम आहे ? कोणते कां यज्ञ असेनात, त्यांचें फळ म्हटलें तर स्वर्गप्राप्ति होणें हेंच आहे, त्या स्वर्गास देखील नाश आहेच शंकरास शरण येणारास असें फळ मिळतें कीं, त्या फळाचा नाश म्हणून होतच नाहीं. ( शिवभजनानें मोक्ष प्राप्त होतो.) शंकर हा परमेश्वर असून शरण आलेल्या भक्तांस कल्पवृक्षासारखा सर्व तऱ्हेचे त्यांचे मनोरथ परिपूर्ण करणारा .आहे. मनुष्य जरी अतिशय पातकी असला तरी तो शिवभक्ति करूं लागल्यावर त्यास काय एक प्राप्त होणार नाहीं ? सर्वकांहीं मिळेल.

महादेवास शरण येऊन त्याच्या भक्तीनें ज्यांचीं मनें नेहमीं सुप्रसन्न झालीं त्यांच्या जन्मासच जन्म असें म्हणावें. दुसरे लोक व्यर्थ अनेक वेळ जन्मास येंतात व अनेकवेळ मरतात त्यांच्या जन्माचा कांहीं-एक उपयोग नाहीं मनुष्य जन्म दुर्मिळ असून ज्ञानप्राप्ति होण्यास उपयोगी पडण्यासारखा आहे इतर जन्मांत ज्ञानप्राप्ति होत नाहीं असा मनुष्य जन्म मिळाला असूनही जे लोक शंकरास जाणत नाहींत त्यांचा जन्म व्यर्थ आहे ज्याचें मन विषयसुखांत न गुंततां प्रत्यक्ष शिवस्वरूपांतच लीन होऊन जातें, त्याचा वंश धन्य आहे व निष्पाप आहे त्यांच्या जन्माचें सार्थक झालें.

गुरु, लिंग, जंगम ह्यांच्या माहात्म्याच्या विशेष अनुभवाची स्थिति ज्या शिवप्रसादावरून प्राप्त होते त्या शिवप्रसादाचा महिमा सांगतों. जे लोक (भक्त ) शिवलिंगावर नेहमी विश्वास ठेवितात, नेहमीं गुरुपूजा मनोभावानें करितात. जे शरण येतात व ज्यांचें आचरण शुद्ध आहे त्यांवर शंकर कृपा करितो.

शंकराचा प्रसाद होणें फार दुर्मिळ आहे असें म्हटलें आहे आणि ना शिवप्रसाद झाला म्हणजे भयंकर अशा संसारांतील तापांचें निवारण

होते. शंकराचा प्रसाद होण्यासाठीच यज्ञ करावे लागतात, तप करावें लागतें, मंत्रांचा जप करावा लागतो, ध्यान धरावें लागून शिवज्ञान करून घ्यावें लागतें. इतक्या सर्व गोष्टी शिवप्रसादाकरितां कराव्या लागतात ह्यांत शंका नाहीं.

सर्व प्राणिमात्र शिवाची जी निश्चल भक्ति करितात ती निश्चल घडण्यास शिवप्रसाद मूळ आहे शिवप्रसाद नसणाऱ्या मनुष्याकडून निश्चल शिवभक्ति घडावयाची नाहीं व त्या भक्तीचा उपयोगही व्हायचा नाहीं. शंकराचा प्रसाद झाला तर गर्भांत राहणारा प्राणी असो, उपजत असो किंवा जन्मलेला असो, ब्राम्हण असो किंवा चांडाळ असो तात्काळ मुक्त होतो. आपापल्या अधिकारावर राहणारे ब्रम्हदेव वगैरे देव परमेश्वराच्या ( शिवाच्या ) प्रसादानेंच नित्य सिद्ध ( त्यांस सर्व सिद्धि नेहमीं अनुकूल आहेत ) असे होतात. अतिशय आनंद देणारा शिवप्रसाद झाला असतां सर्व त्रैलोक्य शिवस्वरूप आहे असें दिसूं लागतें ह्यांत कांहीं संशय नाहीं संसारचक्राचे फेऱ्यांत पाडण्यास कर्म कारण आहे तें प्राणिमात्रांचें कर्म शंकराचा प्रसाद झाल्यावांचून दुसऱ्या कोणत्याही साधनानें दूर होत नाही. ( शंकराच्या प्रसादानें मात्र कर्म दूर होतें. ) फार सांगण्यात अर्थ नाहीं. शंकराच्या प्रसादासारखें किंवा प्रसादापेक्षां जास्त असें ह्या जगांत कोणतेंही दैवत कोणतेंही व्रत वगैरे कांहीं नाहीं. सर्व जगांत शिवप्रसाद श्रेष्ठ आहे.

शिवप्रसाद झाल्यानंतर शिवयोगसमाधि लाविली असतां सर्व त्रैलोक्य शिवस्वरूप दिसूं लागतें. आपल्या कर्माचा नाश करणाऱ्या व नेहमी शिवचिंतन करणाऱ्या मनुष्यास प्राणलिंगी असें म्हणतात.

ह्याप्रमाणें श्रीवीरशैव धर्मांचा निर्णय असणाऱ्या सिद्धान्तशिखामणि ग्रंथांतील प्रसादाच्या सात प्रकाराच्या स्थलांचें वर्णन असलेला हा अकरावा दीप संपला.

## = दीप १२ वा =

अगस्त्य म्हणताल. रेवणसिद्धा, एक भक्तच माहेश्वर होतो, प्रसादी होतो म्हणून सांगितले तें समजलें, आतां तोच भक्त प्राणलिंगी कसा होतो तें सांगा.

रेवणसिद्ध म्हणतात. अगस्त्यऋषे, भक्तच आपल्या शुद्धाचरणामुळे माहेश्वर होतो, प्रसादी होतो म्हणून मी तुला सांगितले आतां कर्माच्या श्रेष्ठपणामुळे त्यास ज्ञानयोग कसा प्राप्त होतो तें सांगतो. शिवलिंग ज्ञानस्वरूप आहे, शिवलिंगाची शक्ति ही प्राणस्वरूप आहें त्याचें ( लिंगाचें ) स्वरूप आणि लिंग ह्यांचें यथार्थ ज्ञान असणारा भक्त प्राणलिंगी होय असें म्हणतात.

प्राणलिंगिस्थलाचे पांच पोटभेद आहेत ते असे १ प्राणलिंगिस्थल २ प्राणलिंगार्चन स्थल ३ शिवयोगसमाधिस्थल ४ लिंगनिजस्थल ५ अंगलिंगिस्थल हे पांच भेद झाले आतां ह्यांचा प्रत्येकाचा काय काय निराळेपणा आहे तो क्रमाने सांगतो. प्राणवायूचा आणि अपानवायूचा रोध करणाऱ्यांनीं प्राणवायु आणि अपानवायु एकमेकांवर आदळले म्हणजे तेंथें बेंबीमध्यें जें तेज उत्पन्न होतें, त्यास प्राणलिंग असें म्हटलें आहे.

सूर्यामध्यें जसें दहिंवर लीन होतें त्याप्रमाणें प्राणवायू परब्रह्ममय शिवलिंगात लय पावतो त्यामुळं त्यास प्राणलिंग म्हणतात त्या प्राणलिंगाचा परामर्श ( विचार करणारा ) तो प्राणलिंगस्वरूप होतो. तें प्राणलिंग योगसाधन करणाऱ्या ज्ञानी लोकांस मनामध्ये दीपाप्रमाणें प्रकाशमान होतें ( समजतें ) तें चित्स्वरूप असून श्रेष्ठ ब्रह्मलिंग आहे, तें प्राणलिंग गुरूपदेश नसणाऱ्या इतर अज्ञान मनुष्यांस मुळीच समजत नाही.

मनांत राहिलेलें तें लिंग ( इष्टलिंग ) श्रेष्ठ आहें तें तेजोमय असून शिवस्वरूप आहे त्यास सोडून जे लोक बाह्यलिंगावर विश्वास ठेवून त्यास ( स्थावरलिंगास ) भजतात त्यास अडाणी असें म्हटलें आहे. जो मनुष्य नेहमी अभ्यंतरवर्ती ( मनांत राहणाऱ्या ) चिद्रूप प्राणलिंगास भजतो बाह्यलिंगाचें पूजन आणि तें पूजन करण्यास अवश्य लागणारें सामान मिळविण्याची खटपट करीत नाहीं असें वर्तन करणाऱ्या शिवयोग्यास प्राणलिंगी असें म्हटलें आहे.

हें त्रैलोक्य मायेच्या ( अज्ञानाच्या ) विकल्पापासून झालेलें आहें हें टाकण्यास योग्य आहे असें नेहमीं लक्षांत आणून चैतन्यस्वरूप आणि आनंदस्वरुप अशा प्राणलिंगामध्यें ज्याचें मन नेहमीं निमग्न असतें त्यास

प्राणलिंगी असें म्हणावें. मत्ता हीं प्राणस्वरूप शक्ति आहे, प्राणलिंग हे सत्स्वरुप आहें त्या दोहोंच्या ऐक्याचें ज्ञान झाल्यामुळें त्यास प्राणलिंगी असें म्हणतात.

अन्तर्गत ( हृदयकमलांत राहणारें ) प्राणलिंग चित्स्वरूप असून श्रेष्ठ आहे आणि शिवस्वरूप आहे त्याची भक्तिरूप पुष्पांनी पूजा करणें त्या पूजेला प्राणलिंगार्चन म्हणतात. भक्ताचे चित्तरूपी मंदिर आंतील पंचप्राणरूपीवायु वाहण्यामुळें नेहमीं थंडगार असतें, त्यांतच अगदी थोडा आकाशाचा भाग ( पोकळपणा ) असतो, तो भक्त स्वतः त्या वेंळीं शंकरस्वरुप झाला असल्यामुळें मस्तकावर ( शिवमस्तकावरील ) चंद्रा-मुळें पाझरणाऱ्या अमृतामुळें थंडगार असें आहे.

त्या मंदिरास दोन डोळे, दोन कान, दोन नाकपुडया, जीभ, शौच, आणि मूत्र करण्याचीं दोन इंद्रियें हीं इंद्रियरूपी नऊ द्वारे आहेत, त्यांत शिवज्ञानरूपी दीपाचा प्रकाश पडतो त्या ऊर्ध्वहृदयरुप मंदिरांत पद्म-सिंहासनावर ( द्वादशदलकमलकर्णिकेंत ) शिवस्वरूपी प्राणलिंग बसलें आहे. असें गुरूनें सांगितल्याप्रमाणें ध्यान करून नेहमीं चांगल्या चांगल्या मानसिक वस्तूंनी त्या प्राणलिंगाची पूजा करावी.

त्या मानसिकपूजेस क्षमा ( शांति ) रुप अभिषेकाकरितां निर्मल जल घ्यावें. विवेक ( खरे काय खोटें काय हा विचार ) हें वस्त्र घ्यावें. सत्यभाषण हें अलंकार म्हणून घ्यावे, वैराग्य ही फुलांची माळा घ्यावी. शिवयोगसमाधिसंपत्ति ही गंध मानावी, अभिमान मुळींच नाहींसा करणें ह्या अक्षता म्हणून घ्याव्या, भक्तिरूप धूप करून उत्तम शिवज्ञानरूपी जगाचें यथार्थज्ञान करून देणारा दीप आहे असें मानावें. भ्रांतींत पाडण्यास मूळ कारण असा प्रपंच नैवेद्य म्हणून उपयोगास आणावा, मौनरूपी घंटा वाजवावी, विषयोपभोगाची आशा मुळापासून नाहींशी करणे हा तांबूल म्हणून समर्पण करावा. विषयसुखाची भ्रांती सोडून देणें ही प्रदक्षिणा समजावी बुद्धि शिवस्वरूपाकडे एकाग्रमतानें लावणें हा नमस्कार होय. ह्या प्रकारच्या मानसिक पुष्पांनीं आणि निर्दोष प्रकारच्या उपचारांनीं त्या लिंगस्वरूपाकडे आपलें एकाग्रपणानें लक्ष्य लावून प्राणलिंगाची पूजा करावी.

प्राणलिंगाच्या पूजेच्या पूर्वीं सांगितलेल्या प्रकारांनीं ह्याप्रमाणें

अंतरंगक्रिया करण्यांत तत्पर असणाऱ्या ह्या प्राणलिंगीची लिंगांगरूप शिवजीव समान सामरस्यानुसंधान संपत्ति असते तिलाच समाधि असें म्हणतात. सर्व तत्वांच्या ( पृथ्वीपासून शिवापर्यंत असणाऱ्या ३६ तत्वांच्या ) वर असणारें, सत् चित् आणि आनंद ह्यामुळें प्रकाशमान दिसणारें आहे, आपल्या प्रकाशानेंच आपण प्रकाशित होणारें आहे, तें अमुक प्रकारचें आहे म्हणून सांगता येण्यासारखें नाहीं, तें वाचा आणि मन ह्यास समजण्यासारखें नाहीं. उमा (पार्वती) नांवाची चित्स्वरूप महाशक्ति आहे त्या शक्तीमुळें तें प्रकाशित दिसतें तें हंसस्वरूप असून परमेश्वर आहे त्यास "तोच मी" अशा बुद्धीनें मनांत स्मरण करावें. तीच शिवजीवांची एकाग्रपणाची सिद्धि आहे व तीच परमसमाधि श्रेष्ठ आहे असें मानलेलें आहे.

महालिंग हें परब्रम्हस्वरूप आहे व प्राणास जीव म्हणतात त्या महालिंगास आणि प्राणास अनुसरून असणारा, लिंगांगरूप शिवजीवांच्या समान सामरस्याच्या ऐक्याचें चिंतन करणाऱ्यास समाधिनिष्ठ म्हणावें.

आपल्या सूक्ष्म शरीरांत सहा कर्मांवर उगवलेली सहा कमलें आहेत, असें मानावें तीं मुळापासून (आधारचक्रापासून) भ्रूमध्यापर्यंत (आज्ञाचक्रापर्यंत) सहा होतात त्यांचीं स्थानें १ गुद, २ गुह्य, ३ नाभि, ४ हृदय, ५ कंठ, ६ भ्रूमध्य हीं होत. हीं सहा चक्रें ब्रम्हादिस्थान आहेत. भ्रूमध्याच्या वरच्या जागीं (ब्रम्हरंध्रांत) सहस्र शक्तिरूपदलांनीं शोभणारें कमल आहे अशी कल्पना करावी त्या कमलांत स्वच्छ चंद्रमंडल आहे असें समजावें. त्या चंद्रमंडलांत सूक्ष्मरंध्र गुरूपदेशानें जाणावें त्यास कैलासपद म्हणून मानतात, त्या जागीं शंकर बसलेला आहे अशी कल्पना करावी, तो शंकर सर्व प्रकारच्या कारणास (ब्रम्हादिककारणेशांसही) कारण आहे.

बाहेरील वासनेनें संस्कारानें पाहूं लागलें असतां सर्व जग नाना-प्रकारच्या संकल्पविकल्पनांनी भरलेलें दिसून येतें मनांत अन्तर्दृष्टीनें विचार केल्यास विचार करणारांस आत्मस्वरूपाचें यथार्थ ज्ञान होतें. ज्ञानी मनुष्यानें (प्राणलिंगीनें) आत्मारूपअरणीवर शिवसुखविचाररूप मंथा घांसतांना त्यापासून उत्पन्न झालेल्या शिवाभेद ज्ञानरूप अग्नीनें सर्व त्रैलोक्यरूप मलमायादिपाश जाळजाळून टाकावें. (ज्ञानी मनुष्यानें

आत्मस्वरूपाचें यथार्थ ज्ञान करून घेऊन त्रैलोक्याचा पसारा (मायिक) खोटा आहे म्हणून ओळखावा.

संसार (जननमरण) हा एक विषवृक्ष आहे, त्यास अविद्या वगैरे पांच पानें आहेत; धर्माधर्मरूप कर्म हें त्या संसारवृक्षाचें मूळ आहे. तो वृक्ष मुळापासून तोडून टाकण्यास शिवध्यान ही कुऱ्हाड आहे. ( शिव-भक्ति केली म्हणजे संसाराचा नाश होतो.)

संसार हा अंधकार आहे त्यामुळे अज्ञानरूप राक्षसांचा प्रसार होतो, आणि आत्मस्वरूपज्ञानाचा लय होतो. त्या संसारांधकाराचा नाश करण्यास शिवध्यान सूर्यासारखें तेजःपुंज आहे. (शिवध्यानानें संसाराचा नाश होतो.)

आत्म्यांत तादात्म्यानें असलेल्या शिवलिंगाची प्रत्यक्षानुभव स्थिति ज्याच्यापासून आली आहे तीच स्थिति महालिंगाचें निजस्वरूप होय असें आत्मतत्वज्ञानी म्हणतात. ब्रम्हदेव विष्णु वगैरे सर्वदेव आणि चार वेद ह्या लिंगस्वरूपांतच लीन होतात व लिंगस्वरूपापासूनच उत्पन्न होतात. तें हें लिंग प्रत्यक्ष ब्रम्हस्वरूप आहे.

शिव हा सच्चिदानंदस्वरूप आहे, निरंजन (निर्दोष) आहे, त्यालाच लिंग म्हणतात दुसरें कांहीं नाही. त्या लिंगापासून जग निर्माण होतें. फार सांगण्यांत अर्थ नाहीं, ज्ञाते लोक म्हणतात कीं, लिंग हें परब्रम्हस्वरूप चित्स्वरूप आहे, त्यास शिव असें नांव असून सर्व त्रैलोक्य त्या लिंगस्वरूपांत राहतें (लिंग हें सर्व जगास आश्रयभूत आहे.)

दुसरे कितीएक लोक वेदांतवाक्यापासून उत्पन्न झालेल्या विद्येलाच (ज्ञानालाच) लिंग म्हणतात, परब्रम्हस्वरूपी लिंगाला प्रमेय वस्तूंत गणना केल्यामुळें त्याप्रमाणें वेंदान्तवाक्यजन्य ज्ञानच लिंग म्हणून म्हणतात तें खोटें आहे.

सर्व जगाला मूलकारण अशा मायातत्वालाच लिंग असें म्हणतात महेश्वर व लिंगी म्हणून मानतात हें मत मायेलाच प्रकृति म्हणून मानावें महेश्वराला मायी म्हणतात हें सांगणारें श्वेताश्वतरमत प्राणलिंगीस मान्य नाहीं कारण प्रकृतीला जडत्व असल्यामुळें तें टाकण्यास योग्य आहे. ह्या कारणानें त्यांचें मत असंगत आहे. तें श्रेष्ठ प्राणलिंग परमेश्वर आहे तें स्वतः प्रकाशित (प्रकट) झाल्यावर त्याच्या तेजापुढें सूर्याचें तेज

म्हणजे कांहींच नाहीं, मग चंद्राचे तेजाची, विजेच्या तेजाची विस्तवाच्या तेजाची किंवा नक्षत्रांच्या तेजाची काय प्रतिष्ठा आहे ?

वेद सांगतो कीं, लिंग हें श्रेष्ठ असून तेज:पुंज आहे, शिवस्वरूप आहे, त्या लिंगाच्या प्रकाशामुळेंच आपल्याला हें सर्व जग दिसत आहे ह्यांत शंका नाहीं. लिंगापेक्षां श्रेष्ठ तत्व दुसरें कांहीं नाहीं कां तर ह्या लिंगापासूनच सर्व जग उत्पन्न झालें आहे ह्या लिंगापासूनच जगाचें रक्षण होतें व शेवटीं सर्व जग ह्या लिंगांतच लय पावतें.

ह्यासाठीं लिंग हें परब्रम्ह आहें, तें सत्, चित् आणि आनंद अशा स्वरूपाचें आहे हें सर्व माझेंच रूप आहे. असें ध्यान केलें म्हणजे तशीच अवस्था प्राप्त होते (ध्यान करणारा मनुष्य लिंगस्वरूपाशीं ऐक्य पावतो.)

शिवज्ञान विशिष्ट जीवाला अंग म्हणतात जाणून घ्यावयाच्या वस्तूस सनातन लिंग म्हणतात तीं दोन्ही (ज्ञान आणि लिंग) ज्याला आहेंत त्यास अंगलिंगि असें म्हणावें. अंगांत (जीवांत) लिंग मिसळून जावें व लिंगांत अंग (जीव) मिसळून जावें अशा तऱ्हेची दोहोंचीहीं एकत्र स्थिति ज्याची झालेली आहे त्यास आलिंगि असें म्हणावें. जो मनुष्य आपल्या हृदयांत असणारें तेज:पुंज प्राणलिंग यथार्थरीतीनें जाणून त्याचें ध्यान करून त्याची दररोज पूजा करितो त्यास अंगलिंगी असें म्हणावें.

अनादिकालापासून चालत आलेलीं सर्व शास्त्रें असें म्हणतात कीं, लिंग हेंच काय तें एक परब्रम्ह आहे, सर्व त्रैलोक्याचा आधार आहे, व मोक्षाचें स्थानही आहे. हें लिंग मोक्षप्राप्ति करून देणारें आहे (मूर्तिमन्त मोक्षच आहे) अशी ज्याच्या मनाची पुरती समजूत झालेली आहे तो मनुष्य देहधारी (जिवंत) असला तरी मुक्तच आहे असें समजावें तो मनुष्य मोठा ज्ञानी असून श्रेष्ठ गुरु आहे असें समजावें.

लिंगास जन्म नाहीं व मरणही नाहीं, लिंग हें सर्व त्रैलोक्यास कारण आहे (लिंगास सर्व त्रैलोक्य उत्पन्न झालें) जे लोक ह्या लिंगास जाणत नाहींत (ज्यास लिंगाची माहिती नाहीं) ते मूर्ख आहेत ते लोक मोक्ष मार्गाचे अधिकारी नव्हेत (त्यांस मोक्ष होणार नाहीं.)

जो भक्त प्राणलिंगाचें पूजन भक्तिरूप (वासनारूप) पुष्पांनी करितो, आपलें धर्म योग्यरीतीनें पाळतो, नेहमी मनांत शिवाचेंच स्मरण

करितों, त्याचें ज्ञान परिपूर्ण स्थितिला येऊन पोंचलें असल्यामुळें त्यास ववथ्या अधिकाराचा भक्त म्हणजे शरण असें म्हणावें. ( तो भक्त शरण होय. )

ह्याप्रमाणें श्रीवीरशैव धर्माचा निर्णय असलेल्या श्री सिद्धान्तशिखामणि ग्रंथांतील प्राणलिंगी पांचस्थलांचें वर्णन असलेला बारावा दीप संपला.

## = दीप १३ वा =

अगस्त्य म्हणाले रेवणसिद्धा, माहेश्वर प्रसादी आणि प्राणलिंगी हें क्रमाक्रमानें आपण मला सांगितलें आतां प्राणलिंगीच काय केल्यानें शरण होतो हें सांगा. अगस्त्यानें असा प्रश्न केल्यावर रेवणसिद्ध म्हणाले-- अंगलिंगी ( लिंगांगसामरस्याचे स्थितीचा अनुभव घेणारा ) शिवज्ञानसंपन्न असतो तो सती समजावा व शिव हा पति समजावा. स्त्रीपुरुष दोघेही एकविचाराचे असल्यास एकमेकांपासून एकमेकांस जें सुख होतें तें सुख शरणास असतें. तशा रीतीच्या सुखाचा अनुभव घेणाऱ्यास शरण म्हणावे.

हें शरणस्थल होय, त्याचे चार पोटभेद आहेत १ शरणस्थल २ तामसवर्जनस्थल ३ निर्देशस्थल ४ शीलसंपादनस्थल हे चार पोटभेद होत, क्रमाक्रमानें ह्या प्रत्येकाचें लक्षण सांगतो तें तूं नीट लक्ष देऊन ऐक. पतिव्रता स्त्री आपल्या पतीची जशी मनोभावानें सेवा करिते त्याचप्रमाणें जो शिवाची सेवा करितो, शिव आपला पति असून आपण सती आहों असें मानतो (सतीप्रमाणें दृढ निश्चयानें शिवसेवा करितो) शिवाखेरीज इतर देवांकडे कधींही पाहत नाहीं अशा त्या ज्ञानी मनुष्यास शरण म्हणावें. शिवाचें यथार्थ ज्ञान झाल्यावर मग दुसऱ्या देवांची कोण इच्छा करील ? अनायसें द्रव्याचा ठेवा सांपडला असतां कांचेचे तुकडे मला द्या म्हणून दुसऱ्याकडे मागण्यास कोण जाईल ? कोणी जाणार नाहीं.

शिवस्वरूपाचें यथार्थ ज्ञान होऊन त्यापासून उत्पन्न होणारा आनंद झाला असतां दुसऱ्या देवांस शरण कोण जाईल ? गंगानदीचें गोड पाणी प्यावयास मिळालें असतां तें टाकून देऊन पाण्यासारख्या

दिसणाऱ्या झळचाच्या मागोमाग पाण्याच्या आशेनें कोण धांवेल ? कोणीं धांवणार नाहीं. प्राणिमात्रांचा संसाररूप आंधार नाहींसा करण्यास शंकररूप सूर्यावांचून दुसरा कोण समर्थ आहे ? शंकराखेरीज इतर देव काजव्यासारखे थोडे प्रकाश ( अल्पसामर्थ्य ) आहेत त्यांच्यानें संसाररूप अंधकाराचा पुरतेपणीं नाश कसा होईल ? होणार नाहीं. संसारदु:खानें पीडलेल्या मनुष्यानें शंकरासच शरण जावें इतर देवांस शरण जाऊन काय उपयोग आहे ? चकोरपक्षी तहान लागल्यावर चंद्रासच शरण जातो, चांदण्यांस ( नक्षत्रांस ) शरण जात नाहीं.

संसाररूप साप चावल्यामुळें " ह्या दु:खांतून आपणांस सोडवा म्हणून शरण आलेल्या सर्व प्राणिमात्रांचें दु:ख दूर करून त्याचें रक्षण करण्यास शिवच एक समर्थ आहे, तो सर्वज्ञ आहे. एकवेळ शिवज्ञान प्राप्त झालें असतां अतिशय आनंद होतो, त्या शिवानंदांत निमग्न झालेला चांगली बुद्धि असणारा योगी दुसऱ्या कोणत्याही सुखाची आवड करीत नाहीं. त्यामुळें हरएक प्रकारानें ( सर्वतोपरी ) शिवास शरण गेलेला भक्त अतिशय सुखाचा उपभोग घेत आनंदानें राहतो त्यास दुसरी कोणत्याही प्रकारची काळजी राहत नाहीं. जो नेहमीं शिवभक्तींत निमग्न असतो आणि त्याच अत्यानंदामुळें तो नेहमी आनंदित असतो त्या गुरुस शरण म्हणतात, त्या गुरुमुळें आपले अज्ञान विकार दूर होतात म्हणून त्यास तामसनिरासक शरण असें म्हणतात.

ज्याचें ज्ञान तमोगुणानें युक्त आहे, त्यास सद्‌गति होत नाहीं ज्ञानीलोक ज्ञानयोगाला निर्दोषरीतीचा सत्वगुण उपयोगी पडतो असें म्हणतात. शम, ( अन्तरिंद्रियनिग्रह ) दम, ( बहिरिंद्रियनिग्रह ) विवेक ( नित्यानित्य वस्तुविचार ) वैराग्य, ( विषयविरक्ति ) पूर्णभावना, ( अखंडज्ञान ) क्षांति, ( क्षमा ) कारुण्य, ( भूतदया ) श्रद्धा ( विश्वास ) हे गुण व खरेपणापासून उत्पन्न होणारी. शिवभक्ति व उत्कृष्ट शिवाचार हे वर सांगितलेले गुण शिवज्ञानास फार उपयोगी पडतात. हे सर्व गुण ज्या योग्याच्या अंगांत आहेत त्यास सात्विक असें म्हणतात.

काम, क्रोध, महामोह ( अज्ञान ) मद, मात्सर्य हे सर्व हत्तीसारखे आहेत ते सर्वजण शिवज्ञानरूप सिंहाच्याजवळ कसें राहतील ?

राहणार नाहींत. ( शिवज्ञानी मनुष्यांस कामक्रोधादिक षड्रिपूंचा विकार होत नाहीं. ) ज्याचें मन रजोगुणात्मक झालेलें असतें, तो मनुष्य प्रसंग पडेल त्यावेळी शिवस्वरुप असणाऱ्या प्रपंचाचा द्वेष करितो त्यास शिवद्वेषी असें म्हणावें. जो मनुष्य सर्व प्राणिमात्रांचा द्वेष करितो व नेहमीं अभिमानानें फुगलेला असतो, नेहमीं खोटया कल्पना करितो त्याला तामस असें म्हणतात. रागद्वेष वगैरे झाडें तमोगुणरुप मूळापासून उगवतात तीं झाडें शिवज्ञानरूप कुऱ्हाडीने निरंतर तोडिलीं पाहिजेत. ( शिवज्ञानाखेरीज रागद्वेष वगैरेंचा नाश होत नाही. )

शिवज्ञान हजार सूर्यांप्रमाणें तेजःपुंज आहे. तें शिवज्ञान एकवेळ श्रेष्ठ अशा शिवयोग्यांच्या मनांत उत्पन्न झाल्यावर अज्ञानपणाचे (अंधकाराचे) उपद्रव कसे होतील ? कधींही होणार नाहींत. संसारांत पाडणारा तमोगुण घालवून जें उत्तम रीतीचें ज्ञान गुरु आपल्या शिष्यांस शिकवितो त्यास निर्देश असें म्हणतात. प्राणिमात्रांस श्रेष्ठ तत्वाचा गुरूच उपदेश करितो (गुरूखेरीज इतरांस तत्वांचा उपदेश करितां येत नाहीं.) सर्व जगांतील अंधकार दूर करण्यास सूर्याखेरीज दुसरा कोण समर्थ आहे?

शिवयोग साधनांत पारंगत असणाऱ्या गुरूवांचून संसाराची निष्कृति कशी होईल ? रोगाचें मूळ कारण काय हें समजणारा वैद्य जवळ असल्यावांचून रोग्याचा रोग कसा बरा होईल ? जो अज्ञानरूप-मळानें मलीन झालेलें चित्तरूप दर्पण (आरसा) ज्ञानरूप राख लावून लख्ख करितो त्यास गुरुश्रेष्ठ म्हणावें. ज्याला शिवज्ञान प्रत्यक्ष झालेलें आहे, जो स्वतः जींवन्मुक्त स्थितींत आहे त्या गुरूचा कृपाकटाक्ष आपल्यावर झाल्यावर जगांत आपणांस कोठेंही कांहीं कमी नाहीं.

मोक्षप्राप्ति करून देण्याचे कामांत कल्पवृक्ष असणारे व शिवाच्या अद्वैतशास्त्रांत प्रवीण असणारे असे कृपाळू गुरु ह्या जगांत फार दुर्मिळ आहेत. समुद्रांत जसा क्षीरसमुद्र श्रेष्ठ आहे, पर्वतांमध्यें जसा मेरुपर्वत श्रेष्ठ आहे, नवग्रहांत जसा सूर्य श्रेष्ठ आहे, रत्नांत जसें कौस्तुभरत्न श्रेष्ठ आहे. झाडांत जसें चंदनाचें झाड श्रेष्ठ आहे. सर्व देवांमध्यें शंकर जसा श्रेष्ठ आहे त्याचप्रमाणें जगांतील इतर सामान्य स्वभावाच्या- गुरू-पेक्षां शंकर गुरु श्रेष्ठ आहे.

शिवतत्व काय आहे तें समजावून घेण्याच्या इच्छेला ज्ञाते लोक

जिज्ञासा ( समजून घेण्याची इच्छा ) शील असें म्हणतात, गुरुवर्याचा उपदेश ऐकण्याची आवड असणाऱ्या भक्तांस शीली असें म्हणतात. शंकर शरण आलेल्या भक्तांची पीडा दूर करितात ते परमेश्वर आहेत त्यांचीं एकनिष्ठेनें भक्ति करण्याचा ज्याचा स्वभाव असतो त्यास ज्ञानी लोक शील असें म्हणतात. शिव हेंच उत्तम ज्ञान आहे असें मानणें त्यास शील म्हणतात, शिवज्ञानावर एकाग्रपणानें विश्वास ठेवणें, शिवप्राप्ति आपणास कधीं होईल अशी उत्कंठा होणें असे गुण अंगांत असणाऱ्या शिवयोग्यास शीलवान् असें म्हणतात.

शिवज्ञानाखेरीज इतर ज्ञान करून घेण्याची ज्याला कधीही इच्छा होत नाहीं शिवज्ञानाकडे मात्र त्याचें सदोदित मन गुंतून राहतें त्या मनुष्यास ( शीलपात्र ) शीलास योग्य झाला असें म्हणतात. पतिव्रतेचा चांगला स्वभाव पतीवरील तिच्या भक्तीमुळें ( सेवेमुळें, प्रेमामुळें ) जसा चांगला दिसतो त्याप्रमाणेंच शिवाच्या दृढभक्तीमुळें चांगल्या स्वभावाचा ( सुशील ) शिवभक्त जास्त शोभतो. स्त्रियांनीं आपल्या पतीची सेवा करावयाची सोडून देऊन इतर पुरुषांची केली तर त्या जशा निंदेस पात्र होतात तसेंच शिवाखेरीज इतर देवांची सेवा करणारे पुरुष ( शरण ) निंदेस पात्र आहेत.

फार सांगण्यांत काय अर्थ आहे? शिवावार दृढनिश्चय ठेवणें ह्या गुणास सज्जन लोक शील म्हणतात तें शील अंगीं असणाऱ्यास शीलवान् म्हणतात. जो भक्त सर्व विश्व शिवमय आहे आणि माझा आत्मा हा शिवस्वरुपच आहे असें मानितो, ज्याचें मन निश्चल झालेलें असतें, सर्व त्रैलोक्याचा ईश्वर शंकर त्याला जो शरण जातो, शिवावर दृढनिश्चय ठेवतो ह्या गुणामुळें जो अतिशय शोभतो त्या भक्ताला ज्ञानी लोक शिवैक्य पावलेला असें म्हणतात.

ह्याप्रमाणें श्री वीरशैवांच्या धर्मांचा निर्णय असलेल्या श्री सिद्धान्तशिखामणि ग्रंथांतील शरणस्थलाच्या चार पोटभागांचें वर्णन असलेला हा तेरावा दीप संपला.

## = दीप १४ वा =

अगस्त्य म्हणतात रेवणसिद्धा, शरणाचे तामसत्याग, निर्देशशील

वगैरे अधिकार सांगितले इतक्यानेंच त्याला ऐक्याची पदवी येते म्हणता तें मला समजावून सांगा असें अगस्त्याचें बोलणें ऐकून. रेवणसिद्ध म्हणतात--- प्राणलिंगादिसाधनांमुळें ( बाह्यलिंग पूजा सोडून प्राणलिंग पूजाध्यान योगामुळें) परमावधीचा (अतिशय) शिव-ज्ञानानंदाचा अनुभव घेणारा शरण मी शिवाशीं ऐक्य पावलों अशी त्याचे मनाची दृढ समजूत झाली असल्यामुळें तोच स्वतः शिवैक्य पावतो. ऋषिश्रेष्ठा अगस्त्या, ऐक्यस्थलाचे चार पोटभेद आहेत तें असे १ ऐक्यस्थल २ आचारसंपत्ति ३ एकभाजन ४ सहभाजन ४ सहभोजन ह्या चोहोंचेंही क्रमाक्रमामानें लक्षण सांगतों.

ज्या भक्तांचें मन विषयोपभोगाचे सुखास कसपटाप्रमाणें मानतें ( जो विषसुखाची आवड करीत नाहीं ) ज्याचें मन निष्पाप असतें, जो नेहमीं शिवज्ञानरूप महासमुद्रांत बुडालेला असतो त्या भक्तास शिवैक्य असें म्हणतात. ज्याचे आणवमल, मायामल, कार्मिकमल नाहींसें झाले आहेत, ज्याचे मनांतील विचार निष्पापरीतींचे आहेत, जो मीच स्वतः शिव आहे अशा समजुतीनें आपलें वर्तन ठेवितो त्यास शिवैक्य पावलेला असें म्हणतात. शिव हा चित्स्वरूपी आहे व आनंदस्वरूप आहे त्या शिवाशीं ऐक्य पावलेल्या मनुष्यास मायेमुळें ज्याला महत्व आलें आहे अशा जगाचा पसारा खरा वाटत नाहीं त्याला सर्व जग शिवमयच आहे असें वाटतें.

शिवैक्य हा समुद्रांत राहणारा वडवाग्नि आहे, त्या वडवाग्नींत त्रैलोक्यरूपी अनेक प्रकारचे बुडबुडे असणारा, अनेंक प्रकारचीं तत्वें ह्याच लाटा असणारा माया ( अज्ञान ) रूपी समुद्र जळून जातो. (शिवैक्य झालें असतां अज्ञानपणा समूळ नाहींसा होतो.) मायाशक्ति ( अज्ञानपणा ) नाश पावली असतां ( गुप्त झाली असतां ) शिवा-विषयी आपली जी भेदवुद्धि (शिव निराळा मी निराळा अशी समजूत) असते ती नाहींशी होते व ती नाहींशी झाल्यावर अद्वैतावांचून दुसरें कांहींच उरत नाहीं. ( शिवस्वरूप आहे असें भासूं लागतें. )

पशुपणा आणि पतिपणा हा भेद मायेच्या अज्ञानपणामुळें मानला गेला आहे, तो एकवेळ समूळ नाश झाला म्हणजे पशु तरी कोठला ? आणि पति तरी कोठला ?

संसाररूप भयंकर साप आहे, तो भेदरूप वारुळांत राहतो, त्याची पीडा न व्हावी अशीं इच्छा असल्यास उत्तमरीतीची अद्वैत-कल्पना हे खात्रीचें औषध आहे.

भेंदबुद्धि ( निराळेपणाची कल्पना ) ह्यापासून उत्पन्न झालेल्या संसाररूप महासमुद्रांतून देशिक ( शिवैक्य ) अद्वैत बुद्धिरूप नांव करून त्यांत बसून तरून जातो. अद्वैतशास्त्ररूप सूर्याच्या प्रकाशामुळें अज्ञाना पणारूप अंधारानें चोहोंकडे काळीकुट्ट दिसणारी, मदनरूप राक्षसाची शक्ति वाढविणारी संसाररूप कालरात्रि नाहींशी होते. ( अद्वैतशास्त्रा-मुळें जन्ममरण चुकून मोक्षप्राप्ति होते. ) ह्यावरून असें उघड दिसतें कीं, शिवयोगी लोकांस भयंकर अशा संसारांतील अनेक प्रकारांचीं संकटें दूर होण्यास अद्वैतशास्त्रासारखा दुसरा उपाय नाहीं.

अद्वैतशास्त्राच्या अनुभवावरून क्षणमात्र जें सुख वाटतें तेंच सुख विषयसुखाचा उपभोग घेणारांनीं एक कोट वर्षेंपर्यंत विषयसुखाचा सारखा अनुभव घेतला तरी त्यांस मिळत नाही. ज्याच्या मनोवृत्तींत सर्व जगाचें यथार्थज्ञान होऊन चुकलें आहे त्या शिवयोग्याला शिवानंदाचें परिस्फुरण होणें ह्यालाच मुक्ति म्हणतात. देशिक ( शिवलिंगैक्य पावलेला ) जरी देहधारी आहे तरी तो जीवन्मुक्त असून नेहमीं शिवाचें एकाग्रपणानें चिंतन करीत असल्यानें तोच स्वतः शिव होतो त्यामुळें जन्माचें सोयर आणि मरणाचें सूतक त्यास धरण्याचें मुळींच कारण नाही.

बुद्धिमान् मनुष्याच्या मनांत एकवेळ शिवाचें अद्वैतज्ञान परिपूर्ण-पणानें राहिलें म्हणजे कर्म ( शिवपूजन वगैरे ) केलें तरी काय आणि न केलें तरी काय दोन्हीं सारखेंच आहे ?

सर्व ठिकाणीं शंकर परिपूर्णपणें व्यापलेला आहे म्हणून सर्व-तोपरी सारखेपणानें वागणाऱ्या देशिकाला त्यानें कोणतेंही लहानमोठें कर्म केलें तरी त्याचें फळ त्यास भोगावें लागत नाहीं. शिवाशीं ऐक्य पावलेल्या (शिवद्वैतज्ञानाचा यथार्थ बोध झालेल्या) शिवयोग्यास पुण्य-वान् असो, पापी असो, ब्राम्हण असो किंवा चांडाळ असो सारे सारखेच आहेत. जे शिवैक्य पावलेले ज्ञानी लोक आहेत त्यांस वर्णांतील व आश्रमांतील सदाचार पाळून काय करावयाचें आहे ? जरी ते जगामध्यें

सदाचारानें वागतात ही गोष्ट खरी, तरी त्या सदाचारापासून अमुक एक फळ मिळवावयाचें असतें असें मुळींच नाहीं.

निष्पाप ज्ञानरूप अग्नीनें ज्याचें कर्मरूप बीज जळून गेलेलें आहे तो मनुष्य जरी जीवंत आहे असा दिसला तरी त्याची चरितार्थांची रीति फक्त लोकांस दिसण्यापुरती आहे इतकेंच. वास्तविक शरीरावर त्याचें मुळींच ममत्व ( प्रेम ) नसतें. पाण्यांत असणाऱ्या कमळाचें पान जसें पाण्यानें भिजत नाहीं त्याचप्रमाणें शिवाच्या अद्वैतज्ञानामुळें उत्पन्न झालेलें वैराग्य ज्याच्या मनांत चांगल्या रीतीनें ठसलें आहे, त्याला कर्मांची बाधा होत नाहीं. शिवसामरस्य पावलेला शिवयोगी वाटेनें जात असो किंवा एके जागीं बसलेला असो तो बुद्धिमान् निजलेला असो किंवा जागा असो त्यास शिवज्ञान झालें असल्यामुळें तो नेहमीं शिवपूजाच करीत असतो असें समजावें.

देशिक ( शिवैक्य पावलेला ) ह्या जगांतील ज्या ज्या वस्तु आनंदानें पाहत असतो तेथें तेथे त्या सज्जनाला शिवज्ञानाचें ऐश्वर्य दिसून येतें ( सर्व जग शिवमय आहे असें त्याच्या अनुभवास येतें. ) ज्याचें मन शिवज्ञानामुळें निर्दोष झालेलें आहे तो शिवयोगी आपल्या मनांत जे जे विचार आणीत असतो ते ते विचार सर्व शिवमय जग त्यास वाटत असल्यामुळें तें शिवध्यानच होय असें म्हटलें आहे.

शिवयोगी स्वच्छंदपणानें जें जें बोलतो तें तें सर्व शिवस्तवनच समजावें कां तर शिव हा सर्वत्र व्यापलेला असून सर्वान्तर्यामी आहे शिवयोगी लोकांच्या हातून कळून न कळून जी जी गोष्ट होते ती ती गोष्ट प्रत्यक्ष शंकराची पूजाच होय कां तर त्या शिवयोग्यांचें मन नेहमी शिवस्वरूपांत निमग्न झालेलें असतें. सर्व त्रैलोक्य शिवमय आहे असें नेहमीं आपल्या बुद्धिप्रमाणें मानल्यामुळें शिवाशीं तादात्म्य होतें म्हणून देशिकाच्या तशा स्थितीस एकभाजन असें म्हणतात.

आपल्यामध्यें सर्व लोकांच्या मध्यें आणि शिवाच्या मध्यें कांहीं एक अंतर नाही मी, सर्व लोक आणि शंकर एकच आहों अशी समजूत दृढ झाली असल्यामुळें एक भाजन ( सारखेपणा ) झाल्यामुळें प्रसादाविषयीं ऐक्यबुद्धि होते. शिवामध्यें हें सर्व जग राहिलें आहे व ह्या सर्व जगांत शिव व्यापून राहिलेला आहे असें अनुभवास येतें शिवाच्या

आश्रयानें हें सर्व स्थावर जंगम विश्व राहिलें आहे व त्या शिवाचा आणि जगाचा आधाराधेय भाव दिसूत येतो. शिव आधार असून जग आधेय आहे.

ज्याच्या मनोवृत्ती शिवस्वरूपांत लीन झाल्या असल्यामुळें चित्स्वरूपाशीं पूर्णपणानें मिळून गेलेल्या आहेत त्याला ह्या दुसऱ्या भ्रममूलक वस्तु पाहून काय विकार होणार आहे ? त्याचें मन मुळींच चंचल होत नाहीं. चित्स्वरूप विश्वाचें ज्ञान करून देतें जिच्यांत चित्स्वरूप नाहीं अशी एकही वस्तु नाहीं, चित्स्वरूपावर ज्यांचा दृढनिश्चय आहे त्यांस मायेचे अनेक तऱ्हेचे विकल्प उत्पन्न झाले तरी त्या विकल्पांमुळें त्यांचें काय होणार आहे ? ज्याचें मनाचे अनेक प्रकारचे विचारतरंग नाहींसे झाले, ज्याचें मन फक्त शिवस्वरूपांतच लीन झालें त्याला दुसरा कोणताही व्याप राहिला नाही अशा स्थितीत जो शिवयोगी राहतो तो मुक्त होय ह्यांत कांहीं शंका नाहीं.

गुरुचें रूप, शिवाचें रूप, शिष्याचें रूप हें निरनिराळे नसून एकच आहे, असें जें ज्ञान होतें, तें ज्ञान सर्व ग्रासात्मक झाल्यामुळें (ही घागर जाणतों, हा देवदत्त जाणतों वगैरे भेदज्ञान मिळून ऐक्यज्ञान झाल्यामुळें) त्या ज्ञानालाच सहभोजन असें म्हणतात. शिव वेगळा नाहीं, गुरु वेगळा नाहीं व विश्व वेगळे नाहीं सर्व एक आहे असें ऐक्यज्ञान नेहमीं चित्स्वरूप अशा आत्म्याच्या ठिकाणीं नित्य एकनिष्ठपणानें स्मरण करितो ( आपलेंच रूप आहे, असें मानतो ) त्यास सहभोजन असें म्हणावें. हा शंकर आहे, हा गुरु आहे. हें जग आहे व त्या जगांत सजीव निर्जीव ( स्थावर जंगम ) असे दोन भेद आहेत हा मी निराळा आहे अशी ज्याला भेदबुद्धि मुळींच नाहीं त्याला विश्वभोजक असें म्हणावें.

मी सेवक आहे, शिवस्वामी ( धनी ) आहें, मी शिष्य आहे किंवा गुरु आहे अशी ज्याची कल्पना देखील नसते त्यास अद्वैतपदाची योग्यता आली असें म्हणावें ( तो अद्वैतपदाधिकारी होतो ). श्रेष्ठ ( अहंता ) अहंपणारूप असणाऱ्या व त्यामुळें त्रैलोक्य उत्तमरीतीनें दिसून येतें अशा आत्मस्वरूप अग्नीमध्यें इदंता ( भेदबुद्धि ) रूप हवन करावयाच्या द्रव्यानें जो होम करितो त्यास विश्वहोमी असें म्हणावें. मीच शंकर आहे मीच गुरु आहे, मीच स्थावर जंगम विश्व आहे असें

ज्या मीपणामुळें वाटतें त्या मीपणास पूर्णाहंता असें म्हणावें.

ज्ञानस्वरूप आधार अग्नीमध्यें निराळेपणाच्या बुद्धीमुळें उत्पन्न झालेलें जगद्रूप हवन करावयाचें द्रव्य जो ज्ञानरूप यज्ञ करणारा यजमान हवन करितो त्यास विश्व हृव्यभुक् असें म्हणावें. चित्स्वरूप ज्ञान असणाऱ्याच्या भेदबुद्धीचा नाश होतो. चित्स्वरूप हें श्रेष्ठ आकाश आहे, त्यांत अत्यानंदरूप सूर्य प्रकाशमान आहे, त्या चित्स्वरूपांत ज्यांचीं मनें गढून गेलीं आहेत त्यांस त्रैलोक्याच्या पसाऱ्याचें कांहीं एक कारण नाहीं. चित्स्वरूप आकाश आहे, त्याला जगाचा कोणत्याही रीतीचा संबंध नाहीं. तें निष्कलंक आहे, त्या ज्ञानाकाशांत शिवसामरस्यामुळें आपलें मन लीन व्हावें. ही शिवैक्याची विद्या श्रेष्ठ आहे, ही सत्ता आणि आनंद ह्यांची वृद्धि करिते जगांतील अज्ञानाचा नाश करिते तिलाच मुक्ति असें म्हणावें.

भक्त वगैरे जी सहास्थलें सांगितलेलीं आहेत व त्यांचे त्यांचे धर्म सांगितले आहेत त्या त्या स्थळांत ते ते धर्म पाळून क्रमाक्रमानें ऐक्यभाव पावलेला भक्त लोकोत्तर सामर्थ्य असणाऱ्या, चिदंबरस्वरूप असणाऱ्या शंकराच्या कृपेनें मोक्षलक्ष्मीस पात्र होतो. ( षट्स्थल आणि त्यांतील धर्म पाळण्यामुळें शिवैक्य पावलेला मनुष्य शंकराच्या कृपेने मोक्षास जातो. )

ह्याप्रमाणें वीरशै वधर्मांचा निर्णय असलेल्या श्री सिद्धान्त-शिखामणि ग्रंथांतील शिवलिंगाबरोबर ऐक्य पावलेल्या भक्ताच्या चार प्रकारच्या पोटभेदांचें वर्णन असलेला हा चवदावा दीप संपला.

## = दीप १५ वा =

षट्स्थलांत ( भक्त, माहेश्वर, प्रसादी, प्राणलिंगी, शरण, ऐक्य) जे जे सदाचार पाळावे म्हणून सांगितलें आहेत ते ते योग्यरीतीनें पाळणाऱ्यास जीवन्मुक्ति करून देणारीं लिंगस्थलें ( लिंगषट्स्थलें ) ह्या दीपांत आतां सांगतो. अगस्त्य म्हणतात– भक्तस्थलापासून ऐक्यस्थलापर्यंतचीं सहा स्थले पूर्वीच्या भागांत सांगितलेलीं आहेत. आतां लिंगस्थलें कोणतीं आणि किती आहेत तीं सांगावीं.

रेणुक म्हणतात– भक्तादिस्थलांस अनुसरून असणारें गुरूस्थल

प्रथम आणि ज्ञानशून्यस्थल शेवटचें असे सत्तावन भेद मानले आहेत. अगस्त्यऋषीश्वरा, भक्तस्थलास अनुसरून अगोदर नऊ स्थलें येथें ( लिंगषट्स्थलांत ) मानलेलीं आहेत त्यांच्या गुणाच्या महत्वावरून त्यांचीं नांवें वेगवेगळीं आहेत तीं स्थलें मी तुला सांगतों. १ दीक्षागुरुस्थल २ शिक्षागुरुस्थल ३ प्रज्ञागुरुस्थल ४ क्रियालिंगस्थल ५ भावलिंगस्थल ६ ज्ञानलिंगस्थल ७ स्वयंस्थल ८ परस्थल ९ चरस्थल हे स्थलाचे नऊ भेद आहेत आतां त्याचें लक्षण सांगतों.

ज्या दीक्षेमुळें ( दीक्षेनें ) उत्तम तऱ्हेचें शिवज्ञान होतें, मलमायादि पाशाचें बंधन तुटते म्हणून तिला दीक्षा म्हणतात ती दीक्षा देणारा तो दीक्षागुरु होय. गुरु हीं दोन अक्षरें आहेत गु ह्या अक्षरानें तो मोठा गुणातीत ( प्राकृत गुण नसलेला ) आहे असें समजायचें व रु ह्या अक्षरावरून तो रूपातीत ( निर्मायी ) आहे असें समजावें तें गुणातींत व रूपातीत स्थल ( चित्स्वरूपस्थल ) तो प्राप्त करून देतो म्हणून त्याला गुरु म्हणतात.

गुरु, शिष्यास अनेक वीरशैव शास्त्रांतील रहस्यार्थ शिकवितो व वीरशैवांचे चांगलें आचरण त्याकडून करवितो व आपणही स्वत: वीरशैवाचारानें वागतो त्यामुळें त्या गुरूस आचार्य असें म्हणतात. शिष्यास ज्ञान शिकवून मोक्षप्राप्ति करुन देतो म्हणून गुरुस देशिक असें म्हणतात जो देशिक ( गुरु ) १ वर्णाध्व २ पदाध्व ३ मंत्राध्व ४ कलाध्व वगैरे सहा मार्गाहून पार गेलेला आहे माया ( अज्ञानरूप ) समुद्र तरून जाण्यास जो सर्व जगाचाही गुरु आहे तोच शंकर होय. असें चैतन्य भरलेलें आहे असें निळचा, पिवळ्या वगैरे सर्व वस्तूंत स्वानुभवबलानें सच्चिदानंदात्मक चैतन्य ज्यामुळें प्रकाशमान होते त्या प्रकाशमान कालांतही अखंड चैतन्यास अनुसरून असतो त्यास विश्वकाशक म्हणावे.

हा दीक्षागुरु शिष्यास बोध व्हावयासाठीं शिक्षा ( वर्तनक्रम ) शिकवितो शिष्यास संशय येऊन त्यानें प्रश्न केल्यास त्याचीं समाधानकारक उत्तरें देऊन त्याचे सर्व संशय दूर करितो तेव्हां त्यास शिक्षागुरु असें म्हणतात. देशिक शिष्यास शिकवावयाचें शिवज्ञान चांगल्या रीतीनें बोध होईल असें सांगतो म्हणून त्याला बोधक असें म्हणतात, व बोधकानें करून दिलेलें शिवज्ञान शिष्याचे मनांत चांगल्या रीतीनें ठसतें

म्हणून त्यास शिक्षागुरू असें म्हणतात. संसाररूप अंध:काराचा नाश व्हावयासाठीं ज्याच्या वाचा ( धर्मोपदेश ) शरदृतूंतील स्वच्छ चांदण्याप्रमाणें शोभतात त्याला आचार्य म्हणावें

जो शिवाचें यथार्थज्ञान करून देतो, तें ज्ञान सर्व जग मिथ्या आहे माया खोटी आहे असें अनुभवास आणतें, व अद्वैतमताकडे आपलें मन वळवितें तें शिवज्ञान करून देणाऱ्यास आचार्यश्रेष्ठ म्हणतात. जगाच्या निराळेपणाचा विकल्पभास पूर्वपक्षाप्रमाणें घेऊन अद्वैतशास्त्राचा सिद्धांत करितों त्यास गुरु म्हणावें तो सर्वांपेक्षां गुणवान् होय.

ज्याची मधुर भाषणाची शैली संशयरूपी अनेक वनें साफ करावयाची कुऱ्हाडच अशी वाटते ( ज्याच्या गोड आणि मुद्देसूद बोलण्यानें शिष्याच्या मनांतील सर्व संशय दूर होतात ) तो गुरुंचाही मुख्य गुरु समजावा. ज्या गुरुच्या निर्मळ उत्तम भाषणरूप आरशांत मोक्षलक्ष्मी प्रतिबिंब पडल्याप्रमाणें दिसते. ( त्या गुरूच्या उपदेशानें शिष्यास मोक्ष प्राप्ति होते. ) तो गुरु संसारांतून तारणारा होय.

जो गुरु आपल्या ज्ञानरूप दीपाने शिष्यांच्या चित्तरूप चित्रास प्रकाशित करितो त्या गुरूची बरोबरी कोणाच्यानेंही करवत नाही. उत्तमतऱ्हेचे अद्वैत ज्ञानरूप उत्तम तऱ्हेच्या औषधदानानें संसाररूपरोग दूर करणारा देशिक (गुरु) कोणाला मिळणार ? असा देशिक मिळणें दुर्मिळ आहे उपदेश करावयाच्या ज्ञानाचा ( रहस्यार्थांचा ) उपदेश करणारा, शिष्यजनांचे संशय दूर करणारा, उत्तमरीतीच्या ज्ञानाचा उपदेश करणारा हा देशिक ज्ञानगुरुच होय. ज्याचे अनेक प्रकारचे निराळेपण नाहीसे झाले असून ज्यास कोणताही विकार राहिलेला नाही, ते चैतन्यस्वरूप (ज्ञानाकाश) आपल्या युक्तीच्या गोष्टी सांगून जो अनुभवास आणून देतो त्यास ज्ञानगुरु म्हणावे.

हा आकाशांतील चंद्र कलंकी आहे त्याची शुक्लपक्षांत वृद्धि होत जाते व कृष्णपक्षांत क्षय होत जातो, हा देशिकाने शिष्यास सांगितलेला ज्ञानचंद्र निष्कलंक असून त्यांस क्षयवृद्धि होण्याची मुळीच भिती नाही. रत्नाचा दीप असला तर तो आजुबाजूचा अंधार नाहीसा करितों देशिकापासून प्राप्त झालेला ज्ञानदीप सर्व जगांत जितकें अज्ञान (अंधकार) पसरलेले असेल तितकें सर्व दूर करितो व त्यास कोठेंही प्रतिबंध होत

नाही. आचार्य सर्व प्रकारचे अर्थ सहजरीतीने समजतील असें विशेष ज्ञान (शिवरहस्याचे ज्ञान) करून देण्यांत नेहमी तत्पर असतो, सारांश आचार्य हा सर्व जगावर उपकार करणारा प्रत्यक्ष शंकर आहे. या आचार्यांचा नेत्रकटाक्ष (कृपाकटाक्ष) रूप चंद्र शिष्याच्या ज्ञानरूपसमुद्रास भरती आणतो, संसाररूप अंधाराचा नाश करितो, तो गुरु श्रेष्ठ ज्ञानात पारंगत ( परिपूर्णज्ञानी ) होय ह्यांत शंका नाही. सूर्य हा फक्त जगांतील बाहेरील अंधार दूर करितो परंतु गुरुरूप सूर्य आपल्या शिष्यांच्या मनांतील अज्ञान ( अंधार ) आणि सूर्याप्रमाणे बाहेर दिसणारा अंधार दूर करितो त्यामुळें आकाशांत प्रकाशमान दिसणाऱ्या सूर्यापेक्षां देशिक सूर्य श्रेष्ठ आहे. जो वेदध्यानधारणादि संकल्पावांचून फक्त गुरूच्या कृपाकटाक्षानेंच शिवपणाची भावना करून देतो तो वेद शंकराचा आहे असें समजावें.

ज्या गुरुने आपल्या शिष्यास निष्पापरीतीने शिवाच्या यथार्थ रूपाचे ज्ञान करून दिल्यामुळे शिष्य जीवन्मुक्त होतो तो गुरू तर ज्ञानाचा समुद्रच समजावा. गुरूश्रेष्ठानें शिकविलेल्या शिवज्ञानामुळें ज्यामध्ये क्रिया लय पावते तें क्रियालिंगस्थल होय असें आगमांत पारंगत असणारे ज्ञानी लोक म्हणतात. क्रियालिंग हें अतिशय आनंद देणारे व चित्स्वरूप आहे ते प्रत्यक्ष परब्रम्हस्वरूपच आहे. ते देहदारी ( इष्टलिंगाच्या रूपाने स्पष्ट दिसतें ते फक्त विश्वांतील सर्व लोकांनीं पूजा वगैरे करून भक्तिमार्ग वाढवावा इतक्याकरितांच आहे. बाकी वास्तविक पाहतां लिंग हें परब्रम्हस्वरूपच आहे. इष्टलिंग हें श्रेष्ठ तेज आहे, तें परब्रम्हस्वरूप मानलें गेलें आहे, ह्यासाठीं त्याचें पूजन केले म्हणजे सर्व प्रकारानें आपले मनोरथ पूर्ण होऊन सुख लागतें.

सर्व योगसाधन करणारे योगी लोक लिंगपूजनाखेरीज इतर सर्व प्रकारच्या क्रिया करावयाच्या सोडून देऊन इष्टलिंगपूजनच एकाग्रमनानें करितात त्यावरून इष्टलिंगपूजन श्रेष्ठ होय हे उघड आहे. यज्ञ याग वगैरे जी इतर कर्में आहेत ती इष्टलिंगाच्या पूजनाचें अंशभूत असल्यासारखे आहेत सनकादि ज्याची पूजा करितात तें इष्टलिंग ( क्रियालिंग ) होय असे म्हणतात. यज्ञ करणें नकोत, अग्निहोत्र घेणें नको, करण्यास कठीण अशी अनेक खडतर तपें करावयास नकोत ज्याला

लिंगपूजन करावयाची आवड आहे. त्याला सर्व कर्मे केल्याचे फळ मिळते ब्रम्हदेव विष्णु वगैरे देव इष्टलिंगाचाच आश्रय करून इष्टलिंगाचें पूजन करितात त्यामुळें त्यांस हरएक कामांत यश येऊन ते आपआपले अधिकार योग्यरीतीने चालवीत आहेत.

ज्याप्रमाणें क्रिया लय पावली त्याचप्रमाणें जेथे भाव देखील लय पावतो त्या स्थलास देशिकांनी ( गुरूंनी, ज्ञात्यांना ) भावलिंगस्थल असें म्हटलें आहे. भगवान शंकर श्रेष्ठ देव आहे, तो भक्तीनें वश होतो. त्याला स्वतःला त्या भक्तीचा काडीमात्र उपयोग होत नाही, त्या भक्तीचा भक्ताला मात्र उपयोग होतो कां तर शंकर नित्यतृप्त आहे. त्याला कोणत्याही वस्तूची अपेक्षा राहिलेली नाही. शंकर हा श्रेष्ठ आहे. तो अखंड आनंदस्वरूप व बोधस्वरूप आहे. तो भक्तांच्या (शिवभक्ताच्या) सेवेमुळें (भक्तिपूर्वक मानसोपचारामुळें) प्रसन्न होतो.

माती किंवा दगड ह्यांनी तयार केलेल्या लिंगापेक्षां भावलिंग हें श्रेष्ठ आहे कां तर भावलिंगास कोणत्याही तऱ्हेचा दोष नसून उलट त्यापासून ज्ञानमार्ग आपणांस दिसावयास लागतो ( आपले ज्ञान ज्यास्त ज्यास्त वाढते ) बाह्यलिंगाचें (मातीचे किंवा दगडाच्या लिंगाचे) पूजन न करितां चित्स्वरूप लिंगाची मनामध्यें कल्पना करून भावरूप पुष्पांनी त्या लिंगाचे जो भक्त पूजन करितो त्यास भावलिंगी असे म्हणावे.

मूलाधार कमलाच्या ठिकाणीं किंवा मनांत किंवा दोन्ही भोंवयांच्या मध्ये निर्दोष व प्रदीपासारखे तेजोमय असें शिवलिंग कल्पना करून भावरूप द्रव्यांनी पूजा करितो त्यास शिवयोगी म्हणावे. आपल्या अनुभवास येऊन ज्याचे प्रमाण समजून चुकले आहे अशा चित्स्वरुपलिंगाचे पूजन करणारा मनुष्य दगड, माती, लाकूड ह्यांनी तयार केलेल्या लिंगाचीं पूजा कधींही करीत नाही. क्रियारुपा (कर्मकांडात सांगितलेली) जी पूजा करावयाची ती पूजा अज्ञान (अल्पज्ञानी) लोकांकरितां सांगितलेली आहे शिवाची ज्ञानकांडांत सांगितलेलीं जी पूजा करावयाची ती भावपूजा होय ती ज्ञानी लोकांकरितां सांगितली आहे.

भावलिंगाच्या पूजनामुळें उत्पन्न झालेले ज्ञान ज्या स्थळांत लय पावते ते ज्ञानलिंगस्थळ होय असे शिवरहस्य जाणणाऱ्यानी मानले आहे. ज्या ज्ञानलिंगांत ब्रम्हा विष्णु महेश अशा तीन मूर्ति मानलेल्या नसतात

तसेंच त्या ज्ञानलिंगांत सत्वगुण, रजोगुण, तमोगुण ह्यांचा संबंध नसतो केवळ परब्रम्हरूपाचाच ज्यामुळें बोध होतो ते ज्ञानलिंग होय असें म्हटले आहे. स्थूललिंगाचें (इष्टलिंगाचे) पूजन करणें झाल्यास गंधफूल वगैरे सामान, सामुग्री लागते सूक्ष्मलिंगाची पूजा करतेवेळी भाव (मनोनैर्मल्य) उत्पन्न व्हावा लागतो. व स्थुल सूक्ष्माच्याही पलोकडे असणाऱ्या तृप्तिलिंगस्वरूप परमात्म्यामध्ये ज्ञानच व्हावे लागते. (इष्टलिंगाचें पूजन क्रियेनें होते, सूक्ष्मलिंगाचे पूजन भावानें होते व परमेश्वर लिंगाच पूजन ज्ञानानें होते).

परमेश्वराची ( शिवाचीं ) स्थूल आणि सूक्ष्म हीं दोन्ही रूपें मायेनें कल्पिलेलीं आहेत. त्यांच्याशीं मुमुक्षूंस कांहींएक कर्तव्य नाहीं त्यानें फक्त ज्ञानलिंगाची ( ब्रह्मस्वरूप तृप्तिलिंगाची ) उपासना केली पाहिजे. परब्रह्मस्वरूप श्रेष्ठापेक्षांही श्रेष्ठ आहे, अतिशय आनंद हें त्याचें लक्षण आहे, त्याला शिव असें नांव आहे, तें परब्रह्मस्वरूप दयानें ओळखिलें त्यास ज्ञानलिंगी असें म्हणावें.

त्याला ममता, ( मीपणा, ) ही वस्तु माझी आहे अशी स्वार्थपणाची बुद्धि नसते, त्याला अभिमान नसतो, त्याला अविद्या वगैरे पांच प्रकारचे क्लेश मुळींच नसतात, तो भिक्षा मागून आपला उदरनिर्वाह करितो, त्याला हा माझा मित्र, हा माझा शत्रु असा भेदभाव मुळींच नसतो, बहुधा तो मुक्त झाल्याप्रमाणें असतो त्यास स्वयंमुनि असें म्हणावें.

तो सहजगतीनें ( कोणास त्रास न देतां ) सहजरीतीनें जें काय मिळेल त्यावरच संतुष्ट असतो, त्याची भस्मावर मोठी श्रद्धा असते, त्यानें आपली सर्व इंद्रियें आपल्या स्वाधीन ठेविलेली असतात. त्याला राजा सारखाच आणि रंक सारखाच अशी त्याची स्थिति असते. त्यास स्वयं योगी असें म्हणावें. सर्व ठिकाणचें प्राणिमात्र संसारसुखांत निमग्न झालेले पाहून त्याचे मनास मोठें आश्चर्य वाटतें तरी तो बुद्धिमान् स्वत: अतिशय आनंद असणाऱ्या सच्चिदानंदस्वरूपांत निमग्न झालेला असतो. ( निमग्न असतो ).

नेहमीं शिवचिंतन करणें, शिवरहस्याचें ज्ञान असणें, भिक्षा आणि एकांताची जागा ह्या चार गोष्टी संन्याशास अगदीं जरुर आहेत, ह्या-

खेरीज आणखी जास्त कांहीं नको. ज्याला परब्रह्मस्वरूपाचें यथार्थज्ञान झालें आहे, ज्याचा मीपणा आणि आपपरभाव नाहींसा झालेला आहे असा स्वयंपदास ( अधिकारास ) पावल्यानंतर स्वतः तशा स्थितींत देशपर्यंटन करितो त्यास चर असें म्हणतात.

ज्याला काम, क्रोध, लोभ, मद, मत्सर वगैरे सहा शत्रु नसतात. शांति, दांति, दया, क्षमा वगैरे सर्व गुण परिपूर्णपणानें ज्याच्या अंगांत भरलेले असतात, सर्व जग शिवमय आहे अशा समजुतीनें तो चर योगीश्वर सर्वांशीं समता ठेवून जगांत वागत असतो. हें मुख्य आहे, हें कनिष्ठ आहे. अशी कल्पना चरयोग्याच्या मनांत मुळींच नसते. सर्वत्र परब्रह्मस्वरूपच व्यापलें आहे अशी मनाची समज होऊन चरयोगी सर्व ठिकाणीं संचार करीत असतो.

चरलिंगयोग्याचा कोणी सन्मान केला तर त्यास संतोष होत नाहीं व कोणी अपमान केला तर त्याबद्दल त्यास दुःखही होत नाहीं तो कूटस्थ परमेश्वराकडे आपले लक्ष लावून नेहमी सर्वत्र समभाव ठेवून विहार करीत असतो. तो चरलिंगयोगी आपल्या स्वत.च्या अलौकिक गुणांनीं सर्व लोकांस आश्चर्यचकित करितो व आपण अद्वैतसुखाच्या आनंदांत निमग्न होऊन संतुष्ट होऊन देहधारी मनुष्याप्रमाणें वर्तन करीत असतो. त्या चरलिंगसंन्यासास स्वतः शरीर असूनही त्यास प्रपंचाची काळजी नसते, आपल्या शरीराची काळजी नसते, धर्माची काळजी नसते, पातकाची काळजी नसते, त्याच्या मनास चिंता कशी असते तें मुळींच माहीत नसतें. तरी तो चरयोगीश्वर सामान्य लोकांच्या ऐश्वर्याच्या संपत्तीविषयीं निरिच्छ असून चिदानंदस्वरूप आत्मस्वरूपांत सुखानें राहतो.

आपल्या स्वरूपाचें यथार्थज्ञान झाल्यामुळें स्वयंसिद्ध झालेला योगी संचार करीत असतो, त्याला त्याच्यापुढें जाणावयाचें कांहींएक राहिलें नसतें, त्या स्थितींत त्यास परस्थल असें म्हणतात. तो परलिंग शिवयोगी स्वतंत्र असतो, सर्व कृत्यांमध्यें आपणच परमेश्वर आहों असें समजून जगांतील अनेक प्रकारच्या विषयसुखास कसपटाप्रमाणें तुच्छ मानून जगांत वागत असतो. चार वर्ण, चार आश्रम ह्यांत सांगितलेल्या सदाचारांवर त्याचा कधींही विश्वास बसत नाहीं. तो परयोगी सर्वो-

त्कृष्ट परमेश्वराचें चैतन्यस्वरूप पाहून सुख मानितो.

शिव नांवाचें परब्रह्म चैतन्यस्वरूप सर्व जगापेक्षां श्रेष्ठ आहे, ते चैतन्यस्वरूप मीच आहे असें समजून तो सर्वांपेक्षां श्रेष्ठ असा परयोगी जगांत वागत असतो. आत्मस्वरूप ( परमात्म्याचें चैतन्यस्वरूप ) निश्चल आहे. अविनाशी आहे असा आपल्या मनांत नेहमीं विचार करून जगाची यथार्थ स्थिति ( सर्व जग मायामय आहे असें ) त्यास समजली असल्यामुळें त्याला कोणत्याही तऱ्हेची भ्रांति पडत नाहीं, तो चरलिंगयोगी जीवन्मुक्त होऊन वागत असतो.

तो परलिंगयोगी कर्माच्या पार गेलेला असल्यामुळें त्याच्या हातून यज्ञयागादिकर्में मुळींच घडत नाहींत, तरी तो स्वतः परब्रह्मस्वरूप झालेला असल्यामुळें कर्ममार्गानें प्रसन्न होणाऱ्या ब्रह्मदेव विष्णु वगैरे देवता त्या परयोग्यावर रागावल्या तरी त्यांच्या हातून त्याचें कांहीं नुकसान होत नाहीं. परलिंगयोगी देहाविषयीं कांहीं एक अभिमान ठेवीत नाहीं, तो जगामध्यें स्वच्छंदपणानें वागत असतो व अज्ञान-लोकांस आपलें दर्शन देऊन त्यांच्यावर कृपादृष्टि करून त्यांच्या मस्तकांवर आपला वरदहस्त ठेवून त्यांस संसारदुःखांतून सोडवितो.

श्रेष्ठशिवाचें चैतन्यस्वरूप सत्ता आणि आनंदरूप आहे, तसेंच अक्षय ( नेहमीं राहणारें ) असून त्याचें ध्यान पातकाचा नाश करणारें आहे, तें निरुपम असून जगासंबंधीचा अज्ञानाचा भ्रम दूर करितें, त्या सच्चिदानंदस्वरूपांत परयोगी साम्य पावतो. ( तद्रूप बनतो ) त्या परयोग्यास आश्रमधर्म आणि वर्णधर्म पाळण्याची जरूर नसते, तो इतर प्राणिमात्रासारखाच दिसतो तरी स्वतंत्र असतो, त्याचें सामर्थ्य लोको-त्तर असतें, अशा त्या बुद्धिमान् जीवन्मुक्त परयोग्याचा विजय असो.

ह्याप्रमाणें वीरशैवधर्माचा निर्णय असलेल्या श्रीसिद्धान्तशिखामणि-ग्रंथांतील लिंगस्थलापैकीं भक्तस्थलांत समावेश होणाऱ्या नऊ प्रकारच्या लिंगाचे स्थलाचें वर्णन असलेला हा पंधरावा दीप संपला.

## = दीप १६ वा =

अगस्त्य म्हणतात– भक्तस्थलास अनुसरून असणारीं नऊ स्थलें रेवणसिद्ध तुम्ही मला सांगितलींत, आतां माहेश्वरस्थलांत जे निर-

निराळे स्थलभेद आहेत ते मला सांगा असा अगस्त्याचा प्रश्न ऐकून रेवणसिद्ध म्हणतात– अगस्त्यऋषे, माहेश्वरस्थलांत नऊ पोटभेद आहेत ते असे १ क्रियागमस्थल २ भावागमस्थल ३ ज्ञानागमस्थल ४ सकायस्थल ५ अकायस्थल ६ परकायस्थल ७ धर्माचारस्थल ८ भावाचारस्थल ९ ज्ञानाचारस्थल हीं नऊ स्थलें झालीं; आतां क्रमाक्रमानें त्या प्रत्येक-स्थलाचे भेद सांगतों.

शंकर हा सर्वांहून श्रेष्ठ आहे, त्याच्या पूजेस क्रिया म्हणतात ती क्रिया ज्या आगमांत सविस्तररीतीनें सांगितलेली आहे त्यांस क्रियागम म्हणतात. अरणींत अग्नि असतो खरा, परंतु तो मंथन केल्यावांचून जसा बाहेर पडत नाहीं तसाच शिव प्रत्येक प्राणिमात्राच्या हृदयांत आहे तरी-पण तो क्रियेवांचून ( पूजेवाचून ) प्रत्यक्ष ( प्रसन्न ) होत नाहीं.

शिवाची पूजा अशारीतीनें करावी कीं, पूजेचे जे प्रकार आहे ते परिपूर्णपणें पाळले जावे, शंकर प्रसन्न व्हावा व पूजा आगमास अनुसरून असावी. जें कर्तव्यकर्म मनुष्यास अवश्य करावयाचे असतें, त्यांत शिव-पूजा करावी असा एक नियम आहे; व तशी शंकराची आज्ञाही आहे; ह्यासाठीं शहाणा मनुष्य शिवपूजन करण्याचीच बुद्धि मनांत ठेवितो. गुरूची आज्ञा घेऊन शंकराची पूजा करावी, शंकराची पूजा केली म्हणजे सर्व देवांची पूजा केली असें होतें.

जो भक्त नेहमी शिवपूजनास लागणारे सामानसुमान मिळ-विण्यांत गुंतलेला असतो व नेहमीं शिवयोगसमाधीत आपला कालक्षेप करितो तो मोक्षास जातो ह्यांत शंका नाही. आंधळा आणि पांगळा असे दोघे जर एखाद्या संकटांत सांपडले तर ते दोघे एक विचाराचे असल्यास कदाचित् दोघेही बचावतील. नाहीं पेक्षां दोघेही खास मरतील. त्याप्रमाणें वैराग्य पावलेल्या भक्तास ज्ञान आणि क्रिया ही दोन्हीं पाहिजेत. नुसत्या ज्ञानानें किंवा नुसत्या क्रियेनें कांहींएक फळ मिळत नाहीं, ह्यासाठीं विरक्तास ज्ञान आणि क्रिया ही दोन्हीं पाहिजेत.

विद्वानास ज्ञान असलें तरी त्यानें कर्म केलेंच पाहिजे. नाहीं-पेक्षां फलप्राप्ति होणार नाही, त्यानें करावयाचें कर्म फळ मिळण्याच्या इच्छेनें करूं नये, निष्कामपणानें करावें. आचार हा सर्व लोकांस भूषण

आहे, जो मनुष्य आचारभ्रष्ट ( दुराचारी ) आहे तो मनुष्य लोकांत उपहासास पात्र होतो. ज्ञान असून आचरण ही चांगलें असेल तर शंकर प्रसन्न होतो. ह्यासाठींच सदाचारसंपन्न आणि ज्ञाससंपन्न मनुष्य मुक्त होतो. हें उघड आहे. वैराग्यवान् विद्वानाला जीं भावाचीं लक्षणें असतात तींच लक्षणें भावागमाला अनसरून सर्व प्राणिमात्रांस असतात.

मी शिव आहे असा भाव ( निश्चय ) असणें हेंच शिवपणा मिळण्याला कारण आहे, ज्ञान हें एकटे शिवपणा येण्यास कारण नाहीं, किंवा फक्त आचारच शिवपणा येंण्यास कारण नाहीं. मीच शिव आहें असा ज्याचा निश्चय असेल तोच शिव होईल. ज्ञानापासून वस्तु कशी आहे इतकेंच समजतें, आणि ध्यानापासून आपणास त्याच्यासारखें होतां येतें, ह्यासाठीं महादेवाचें यथार्थज्ञान झाल्यावर बुद्धिमान् मनुष्य त्या महादेवाचें ध्यान करितो.

विद्वान् मनुष्य असें मानतो कीं, शंकर हा आंत आहे, बाहेर आहे, सर्व ठिकाणीं परिपूर्णपणानें भरलेला आहे. शंकराविषयीं अशा रीतीची त्याची समजूत शिवानंदाची प्राप्ति करून देते. ज्यांत अर्थ नाहीं असें बोलणें जसें शोभत नाहीं, नवरा नसणारी बायको जशी शोभत नाहीं, वेदाला अनुसरून नसणारी बुद्धि जशी शोभत नाहीं, तशीच भावावांचून ( भावाखेरीज ) पूजा ( क्रिया ) शोभत नाहीं. ज्या मनुष्यास दृष्टि नाही त्यास रूप जसें पाहतां येत नाहीं, तसाच भाव नसणारा योगी शंकरास यथार्थरीतीनें जाणूं शकत नाहीं.

भावामुळें निष्पाप झालेल्या शुद्धमनानें शंकराची पूजा करावी, भाव नसतांना मोठ्या समारंभानें पूजा केली तरी ती शंकरास प्रिय होत नाहीं. शिवाचें ध्यान करण्याविषयीं दृढभाव झाला म्हणजे ( नेहमीं शिवचिंतन करण्याचाच व्यासंग असला ) म्हणजे कुंभारीण नांवाच्या ( भुंग्याच्या आकाराच्या ) किड्याने आपल्या घरांत खाण्याकरितां म्हणून आणून ठेविलेल्या आळीप्रमाणें तो ध्यान करणारा भक्तही कांहीं दिवसांनीं शिवस्वरूपच होतो. ( आळी नेहमी त्या किड्याचाच ध्यास लागल्यामुळें कांहीं दिवसांनीं ती स्वतः किडा होऊन उडून जातें त्या-प्रमाणें शिवभक्तही शिवध्यानानें शिवस्वरूप होतो परब्रह्मस्वरूप कलंक-रहित आहे, आकाररहित आहे, त्याला शंकर असें नांव आहे, त्याचें

यथार्थरीतीनें ध्यान करण्यास ध्यान करणारा भक्त असमर्थ झाल्यास त्यानें त्या परब्रह्माच्या ऐश्वर्याचें ( विभूतीचें ) ध्यान करावे.

भावज्ञान असणाऱ्या श्रेष्ठ शिवयोग्याचीं जीं जी चिन्हें असतात, तीं तीं चिन्हें प्राणिमात्रांच्या ज्ञानागमपणामुळें मोक्षप्राप्तिकरितां प्रवृत्त होतात. नुसता भाव असला तर मनुष्यास त्याचा उपयोग नाहीं, किंवा फक्त यज्ञयागादिकर्म करीत राहिले तरी त्याचा कांहीं उपयोग होत नाहीं, ह्यासाठीं मोक्षप्राप्ति व्हावयाला भाव कर्म आणि ज्ञान ही तीन पाहिजेत. तरच मोक्षप्राप्ति होते. फक्त कर्मच ( यज्ञयागादि ) करीत राहिलें तर कोटयावधि जन्म घेतले तरी प्राण्यांस मोक्षप्राप्ति होत नाहीं, मोक्षप्राप्ति होण्याला ज्ञान मूळ आहे. ( ज्ञान असेल तर मनुष्याला मोक्षप्राप्ति होते. )

प्राणी नेहमीं ज्ञान असल्यावांचून जीं जीं कर्में करितात तीं तीं त्यांस संसारदुःख वाढविण्यास कारण होतात तींच कर्में ज्ञान असून केलीं तर संसारदुःखांतून सोडविण्यास कारण होतात यज्ञ यागादि कर्म करणाऱ्यांस स्वर्गसुख मिळतें खरें परंतु तें नाशिवंत आहे, ह्यासाठीं चिरकाल टिकणारें मोक्षसुख मिळवावयचें असेल तर ज्ञानाचाच अभ्यास केला पाहिजे. शास्त्राभ्यासाची खटपट करून व श्रीगुरुची कृपा संपादन करून ज्ञानाचाच अभ्यास करावा दुसऱ्या गोष्टीचें आपणास मुळींच कारण नाहीं.

श्रेष्ठ अशा शंकराच्या अद्वैतशास्त्राचा यथार्थरीतीनें बोध घेणें हेंच ज्ञान होय तें ज्ञान झालें असतां सज्जन मनुष्यांची संसारदुःखांतून सुटका होते. हें सर्व जग शिवस्वरूप आहे, शिवस्वरूपाखेरीज ह्या जगामध्यें दुसरें कांहीं नाहीं मी देखील शिव आहे अशी जी बुद्धि होणें त्यालाच ज्ञान असें म्हणतात. जसें एखाद्या आंधळयापुढें पुष्कळ प्रकारचें पदार्थ आणून ठेविले तरी त्याला त्यांतलें कांहींएक दिसत नाहीं, तसेंच आत्मज्ञान नसणाऱ्या मनुष्याला त्याच्याच हृदयांत असणारा शंकर त्याला दिसत नाहीं. शिवाचें दर्शन झालें असतां मनुष्यांचा जन्ममरणरूपरोग चुकतो तें शिवदर्शन ज्ञानदृष्टि मनुष्यास सहजरीतीनें होतें.

दिवा लावल्याखेरीज जसा घरांतील अंधार नाहींसा होत नाहीं तसाच बोध ( शिवज्ञान ) झाल्यावांचून मनुष्याच्या मनांतील अज्ञान

नाहींसें होत नाहीं. मी करितो, माझा देह असा अभिमान नसणाऱ्या श्रेष्ठ शिवयोग्याचें त्या शरीरालाच आत्मस्वरूप मानलें आहे म्हणून हे शिवयोगी लोक काय आहेत.

कोणताही प्राणी असो, शरीरावांचून त्याच्याकडून शिवपूजा होत नाहीं, भावना होत नाहीं व ज्ञानही होत नाहीं. ह्यासाठीं तो शिवयोगी शरीराच्या साह्यानेंच पृथ्वीवर संचार करीत असतो. जरी शिवयोगी मोठ्या मनाचा महासामर्थ्यवान् असला व त्यास शिवज्ञान परिपूर्ण झालेले असलें तरी त्याला विषयसुख आणि मोक्षसुख शरीराच्या साधनानेंच प्राप्त होतें. ( शरीर नसलें तर त्याला सुखप्राप्ति मुळींच व्हावयाची नाहीं. )

विस्तव असला तरी त्याच्यावर लांकडें आणून घातलीं तर तो पेटून लखलखीत दिसतो त्याखेरीज दिसत नाही तसेंच शिवयोग्यास त्याचें शरीर असेल तरच आत्मतत्वाचा प्रकाश होईल त्याखेरीज होणार नाहीं. परमेश्वराची मूर्ति पाहिली म्हणजे जशी पूजा करावी अशी बुद्धि उत्पन्न होते त्याप्रमाणें शरीरामुळें शिवयोग्यास आत्म्याचें पूज्यपण समजून येतें शरीरच नसेल तर आत्म्याचें महत्व मुळींच समजलें नसतें.

महादेव हा कलाहीन ( निष्कल ) निर्मायिक आहे नेहमीं आत्मानंदामुळें परिपूर्ण आहे, त्याला सदाशिव असें म्हणतात. तो पृथ्वी उत्पन्न करणें पृथ्वीचें रक्षण करणें, पृथ्वीचा संहार करणें वगैरे कामाकरितां शरीर धारण करितो असें दिसून येतें. ब्रह्मदेव, विष्णु वगैरे देवांस देखील शरीर आहे, मोक्षप्राप्तीची इच्छा करणारे मुमुक्षुलोक शरीर आहे म्हणूनच शरीराच्या साधनाने सर्व प्रकारचे अर्थ प्राप्त करून देणारी तपश्चर्या करितात शरीर नसतें तर त्यांच्या हातून तपश्चर्या झाली नसती. तपश्चर्या केली म्हणजे ह्या जगांतील अनेक प्रकारच्या सिद्धि प्राप्त होतात, ती तपश्चर्या शरीर सुदृढ असेल तरच शिवयोग्याकडून होईल त्याखेरीज होणार नाही ह्यासाठीं शरीराकडे दुर्लक्ष करूं नये.

श्रेष्ठ शिवयोगी देहधारी असल्यासारखा (इतर लोकांसारखाच) दिसून येतो खरा तरी त्याचें शरीरावर ममत्व मुळीं उपचारासाठीं असतें इतकेंच, ह्या त्याच्या गुणांमुळें, सर्व जग परमेश्वराचेंच स्वरूप आहे अशी त्याची समजूत असल्यामुळें व त्याला मायेचा संबंध मुळींच

नसल्यामुळें त्यालाच अकाय ( विदेही ) असें म्हणतात.

श्रेष्ठ शिवयोग्याला शरीर आहे ही गोष्ट खरी परंतु त्या शरीरामुळे इतर प्राणिमात्रांस जसे मनोविकार होतात. तसे शिवयोग्यास नाहींत कां तर इतर लोकांप्रमाणें त्याची शरीरावर ममता नसते वास्तविक तो शंकरच होय. म्हणून त्याला अकाय ( विदेही ) असें म्हणतात. परलिंग हें श्रेष्ठ असून परमानंदरुप आणि चैतन्यस्वरुप आहे त्या स्वरूपांत निमग्न असणाऱ्या शिवयोग्यास शरीराचा काय संबंध आहे ? ते इतर प्राणिमात्रांसारखे शरीरावर प्रेम करितात असें दिसतें परंतु तो निव्वळ भ्रम आहे.

ज्या शिवयोग्याला शरीरावर अभिमान मुळींच नसतो नेहमीं शिवस्वरुपांत त्याचें मन गढून गेलें असतें त्याचें शरींर पाहिलें तर सर्व जग त्याचें शरीर असल्यामुळें त्याच्या लौकिकदृष्टीनें मात्र दिसणाऱ्या एका शरींरास दुःख झालें म्हणून त्यास काय दुःख होणार आहे दिसतच आहे. ज्याचा शिवज्ञानावर पूर्ण विश्वास आहे व त्याला आपल्या शरीराविषयीं अभिमान पण राहिला नाहीं व इंद्रियांसंबंधाचें दुःखही त्यास भोगावें लागत नाही.

शिवयोगी आपल्या मनांत नेहमीं असें समजत असतो कीं, मी मनुष्य नव्हे, देव नव्हे. राक्षस नव्हे किंवा यक्षही नव्हे मी प्रत्यक्ष शंकर आहें, अशी त्याची स्वतःची समजूत असल्यामुळें त्याला शरीराची तरी पीडा काय होणार ? आणि कर्माची तरी पीडा काय होणार ? त्यास कर्माची व देहाची मुळींच पीडा होत नाहीं ज्यानें प्रकृतीस ( मायेस ) जिंकून आपल्यावश केलें, मायेच्या ( अज्ञानपणाच्या ) मार्गाच्या जो पारंगत झालेला आहे जो सत्यस्वरुप, ज्ञानस्वरुप आणि सुखस्वरुप आहे त्याला परकाय म्हणतात. त्या परकायाचें शरीर परब्रम्हस्वरूप आहे व त्यामुळें शिवज्ञान आणि शिवानंद ह्यानें परिपूर्ण झालें असल्यामुळें नेहमीं शोभत आहे त्या परकाय शिवयोग्याचें शरीर जरी इतर प्राणिमात्रांच्या शरींराप्रमाणें दिसलें तरी त्या शरीरापासून त्याला बाधा काय होणार आहें ? त्याला त्यापासून कांहीं एक पीडा होत नाहीं. सम्यग्ज्ञान ( वास्तविक रीतीचें शिवज्ञान ) रूप अग्निमध्यें ज्याच्या शरीराचें जन्ममरणरूप बीज जळून गेल्यामुळें पुन्हा त्यास जन्ममरणाची

भीति राहिलेली नसते व त्याचें शरीरावर प्रेमही नसतें, तो फक्त शिवतत्वाच्या चिंतनांत निमग्न असतो, त्याला परकाय असें म्हणतात. पांच कर्मेंदियांचे व्यापार आणि पांच ज्ञानेंद्रियांचे व्यापार मनाच्या प्रवृत्तीची वासना कर्मांपासून उत्पन्न होणाऱ्या अनेक प्रकारच्या वासना ज्यांत लय पावतात त्या परब्रम्हाच्या संबंधानें परकाययोगी सकाय योग्याप्रमाणें दिसतो.

तो परमेश्वर मी स्वत: आहें अशा दृढ समजुतीनें सकल जग चित्स्वरूप आहे असें मानणारा सदेह ( देहधारी ) पाहावें दिसतो तो फक्त भ्रम आहे, शिवस्वरूप हें पात्र खरें आहे. आत्मस्वरूप चैतन्याकार आहे, तें प्रत्यक्ष तेजोमय आहे असें, ध्यान करणारा ( शिवयोगी ) देह-धारी असला तरी विदेही आहे व साधक ( मुमुक्षु ) असला तरी जीवन्मुक्त आहे असें समजावें. ज्या शिवयोग्याला आत्मस्वरूपाचें ज्ञान झालेलें आहे त्याचें शरीर असो किंवा नसो, त्याला चित्स्वरूपाचें यथार्थ-ज्ञान करून देणारी जीवन्मुक्ति होतेच होते. आत्मज्ञान होईपर्यंत संसाराची पीडा भोगावी लागते, आत्मज्ञान होतांच ती पीडा नाहींशी होते, सूर्योदय होईपर्यंत लोकांस अंधाराचा उपद्रव होतो मग होत नाहीं.

ज्याचा शरीराविषयीचा अभिमान सर्व नाहीसा झाला आहे, व परब्रह्मस्वरूपाचा ज्यानें आश्रय केला आहे, त्या ज्ञानवान् परकाय योग्यास हें शरीर माझें हे शरीर दुसऱ्याचें असा भेदभाव ( समजूत ) कोठून असणार ? मुळींच असावयाचा नाही. त्या परकाय योग्याचें जसें सद्वर्तन असतें तोच धर्म होय त्या धर्माप्रमाणें लोकांनीं आपा लें वर्तन ठेविलें म्हणजे त्यांचें कल्याण होतें, त्याचें वर्तन लोकावर उपकार करण्यासारखेंच होय. जीवांचा नाश न करणें, खरें बोलणें, चोरीं न करणें, ब्रह्मचर्य पाळणें, दया करणें, मनांत क्षमा असणें, दान देणें, पूजा करणें, जप करणें, ध्यान करणें, ह्या सर्व गोष्टी आपल्या शक्तीप्रमाणें करणें हाच धर्मसंग्रह करणें होय.

धर्म अमुक प्रकारचा असा आहे असें शिवांनीं सांगितलें असून आगमांनींही तसेंच सांगितलें आहे, ह्यासाठीं विद्वान मनुष्यानें त्या धर्मा-प्रमाणें वागावें म्हणजे त्यावर शंकराची कृपा होतें. ज्ञानी मनुष्य अधर्मा-प्रमाणें मुळींच वागत नाहीं. सदाचारानें वागून धर्माचा संग्रह करितो,

तो धर्मसंग्रह निष्कामपणानें आणि ज्ञानपूर्वक करितो. गैरसमजुतीनें वागत नाहीं. आत्मज्ञानी मनुष्य आपल्याप्रमाणेंच इतर लोकांस समजतो सर्व त्रैलोक्य शिवरूप असल्यामुळें तो कोणावर कृपा करीत नाहीं व कोणाला शिक्षा करीत नाहीं, कां तर त्याला सर्व जग अगदी सारखें आहे कोणी त्याला प्रिय नाहीं, कोणी अप्रिय नाहीं.

हें सर्व जग मिळून एक शिवस्वरूप आहे, उघड हें आहे, असा प्रत्यक्ष अनुभव घेणाऱ्या शिवयोग्यास सर्व जग माझेंच अशी बुद्धि कां होणार नाही ? ज्या अर्थी धर्म हा सर्व प्राणिमात्रांचे मनोरथ परिपूर्ण करितो व त्यास सर्व प्रकारच्या सिद्धि प्राप्त करून देतो ह्यासाठींच योगीश्वर मोठा निस्पृह असला तरी धर्ममार्ग सोडीत नाहीं. शिवयोगी ज्ञानामृतानें ( शिवज्ञानानें ) संतुष्ट असला तरी सदाचार सोडीत नाहीं, कांतर श्रेष्ठ लोकांचे आचरण पाहून सामान्य मनुष्य तसेच वागतात. तोच जर दुराचारानें वागेल तर इतर लोकांस वाईट मार्गास लाविलें असें होईल म्हणून त्यास सदाचारानेंच वागावें लागतें.

शंकराला सद्वर्तन फार आवडतें म्हणून सद्वर्तनानें वागून शंकराची पूजा करावी. सद्वर्तन असल्याखेरीज शंकराची कृपा होत नाहीं, शिवयोग्याचा भाव (दृढ निश्चय) हाच सर्व प्राणिमात्रांचा भावाचार होय असें मानलें आहे, मनांतील चेष्टा हेंच भावाचें स्वरूप, आहे. ( मनांतील विचारांपासूनच भाव होतो. ) तो पूर्ण असून शिवाचा आश्रय करितो (शिवावर त्याचा आधार असतो.)

भावना (भक्ति) पुरःसर केलेलें शिवपूजा वगैरे कृत्य पवित्राहून पवित्र आहे. ह्यास्तव कोणतेंही धर्मकृत्य करणें झालें तर भावनापूर्वक करावें. भाव असला तर मन शुद्ध होतें, आणि कर्मामुळें ( पूजा यज्ञ याग वगैरेमुळें) भावशुद्धि होते हें मनांत आणून योगीश्वर भाव (श्रद्धा) कधींही सोडीत नाहीं.

शिवयोग्याने शिवावर दृढ निश्चय ठेवून नित्य करावयाची कर्में आणि कांहीं विशेष कारणांमुळें करावयाची कर्में ती सर्व केली तरी त्यांपासून त्याला चांगुलपणा किंवा वाईटपणा येत नाहीं. मनामध्यें प्रत्यक्ष रीतीनें प्रकट झालेल्या ज्ञानरूप सूर्याचें नेहमीं भक्तिभावानें आराधन करणें त्यास संध्यावंदन म्हणतात.

अंतर्मुख वृत्ति होऊन ( आत्मस्वरूपाकडे लक्ष्य लावून ) आत्मस्वरूपामध्यें (चिदग्नींत) सर्व प्रकारचे विषय समर्पण करणें ह्यास होमकर्म म्हणतात. वैराग्य दृढ होण्यासाठीं सर्वप्रकारचीं नित्य कर्में आणि नैमित्तिक कर्में शिवाला संतुष्ट करण्याकरितांच मी केलीं आहेत अशी कल्पना करावी. सत्कृत्य असो किंवा दुष्कृत्य असो तें सर्व शिवाला अर्पण करून जो दैवशाली शिवयोगी वागत असतो त्यास वैराग्य प्राप्त होतें.

आपण स्वतःच सर्व जगांतील वस्तु समुदायांत आहोंत व शंकर हा आनंदी व सच्चिदानंदस्वरूप आहे असें दृढ निश्चयानें जो पुरुष नेहमीं पाहतो तोच मात्र यथार्थ रीतीनें पाहतो असें म्हणावें. शिवयोग्याला जें ज्ञान असतें व त्याज्ञानाला अनुसरून तो आपलें स्वतःचें असें वर्तन ठेवितो तोच इतर लोकांचा ज्ञानाचार होय. ज्या ज्ञानांत शिवाचें अद्वैतशास्त्र मुख्यत्वें करून वर्णिलें असतें त्यालाच ज्ञाते लोक असें म्हणतात. दुसरी शास्त्रसिद्ध व अशास्त्रसिद्ध ज्ञानें घेऊन काय करायाचें आहे.

शिवज्ञान हें निर्दोष आहे, श्रेष्ठ आहे, आणि मोक्षप्राप्ति करून देणारें आहे. शिवज्ञाना खेरीज दुसरें ज्ञान राग आणि द्वेष हे मिसळले गेल्यामुळें सदोष आहे आणि त्यापासून संसारदुःख मात्र जास्त वाढतें. शिवज्ञान परिपूर्ण आहे त्यांत कांहीं न्यून ( कमीपणा, दोष ) नाहीं, तें परब्रम्हस्वरूप दाखवून देतें, त्याचा आश्रय करून ( त्याच्या अनुरोधानें जो वागतो तो ज्ञानाचार होय.) शिवज्ञानास विकल्प ( कुतर्क ) नाहींत तें श्रेष्ठ असून तेजःपुंज आहे, त्यास शिव असें नांव असून तें निष्कल ( अवयवरहित ) आहे, त्या शिवस्वरूपांत ज्ञान करून देऊन सर्व जगाला जो शिवयोगी नेऊन मिळवतो त्यास ज्ञानाचारी असें म्हणावें. सद्‌गुरूच्या कृपादृष्टीच्या प्रसादामुळें मोक्षप्राप्ति करून देणारें शिवज्ञान मिळाल्यावर संसार वाढविणाऱ्या यज्ञयागादि कर्मांची खटपट करण्याची इच्छा कोण शहाणा करील ? कोणीं करणार नाहीं. कर्म हें संसाराचें मूळ आहे व तें जलप्रवाह न्यायानें अनादिकालापासून चालत आलें आहे, तें संसाराचें मूळ कारण ( कर्म ) शिवज्ञानरूप अग्नीनें जळून गेल्यावर पुन्हा उगवत नाहीं असें ज्ञानी लोक म्हणतात.

ज्या मनुष्यास शिवज्ञान नाहीं तो कर्माच्या फेऱ्यांत सांपडून बांधला जातो, ज्ञानी लोक कर्म करण्याचे विचार करून कर्मेंही करि-

तात परंतु ते तीं कर्मे फलाच्या आशेनें करीत नसल्यामुळें त्यांस इतर अज्ञान मनुष्यांच्या कर्मांप्रमाणें बंध होत नाही.

ज्ञानाचारी शिवयोग्याचें निष्पाप अशा ज्ञानाचारावर निष्कपट प्रेम ठेवणारा, निर्मल भावाचा, ज्ञानी, शिवयोगी हा उपमारहित असें शिवाचें तेज सर्व ठिकाणीं पाहून त्या ज्ञानानें आपल्या प्राकृत प्रपंचाचा उध्वंस करून शिवाद्वैतज्ञानानें प्रकृतीपासून उत्पन्न होणाऱ्या देहरूपी प्रपंचाचा नाश करून उत्तम योगी असा म्हणून घेऊन स्वयंप्रकाशस्वरूपी होऊन जीवन्मुक्त होऊन लौकिकाचाराप्रमाणें जगांत व्यवहार करतो.

ह्याप्रमाणें वीरशैव धर्माचा निर्णय असलेल्या श्रीसिद्धान्तशिखामणि ग्रंथांतील माहेश्वरस्थलास अनुसरून असणाऱ्या नऊ लिंगस्थलांचें वर्णन असलेला हा सोळावा दीप संपला.

## = दीप १७ वा =

अगस्त्य म्हणतात—रेवणसिद्धा, माहेश्वरस्थलाचीं पोटभेद अशीं जीं स्थलें होतीं तीं मला सांगितलीत आतां प्रसादिस्थलाचीं जीं पोटभेदस्थलें आहेत तीं मला सांगा असा अगस्त्याचा प्रश्न ऐकून, रेवणसिद्ध म्हणतात—प्रसादिस्थलाच्या अंगभूत असणाऱ्या स्थलांचे नऊ भेद आहेत ते असे—१ कायानुग्रहस्थल २ इंद्रियानुग्रहस्थल ३ प्राणानुग्रहस्थल ४ कायार्पितस्थल ५ करणार्पितस्थल ६ भावार्पितस्थल ७ शिष्यस्थल ८ शुश्रूषास्थल आणि ९ सेव्यस्थल हीं नऊ स्थलें झालीं, आतां प्रत्येकाचें क्रमाक्रमाने लक्षण सांगतों तें ऐक.

ज्याअर्थी शिवयोगी आपलें शरीर लोकांस दाखवून लोकांवर उपकार करितो म्हणून त्यास कायानुग्रह म्हणतात. जसा शंकर स्वतः शरीर घेऊन प्राणिमात्रांवर उपकार करितो त्याप्रमाणें शिवयोगी शिवदीक्षेनें पवित्र झालेल्या दिव्य शरीरांत राहून सर्वांवर उपकार करितो.

जसा शंकर शरीर धारण केलें तरी निःसंग असतो त्याप्रमाणेंच शिवयोगी शरीर असणारा ( देहधारी ) दिसला तरी नेहमीं निःसंग असतो. जिला कोणत्याही तऱ्हेचा विकल्प नाहीं, अशी दृढ शिवभावना करणारा शिवयोगी, मायेचा पसारा समूळ नाहींसा करणारा शंकरच होतो शंकर हा चित्सुखाचा समुद्र आहे, त्या शिवस्वरूपांत योगी-

श्वराच्या चित्तवृत्ति लीन झाल्या असतां त्याचें अविद्येपासून उत्पन्न झालेल्या इतर गोष्टीकडे लक्ष्यच जात नाहीं. ( मायेपासून उत्पन्न झालेलें जग त्यास दिसत नाहीं. सर्व शिवमयच दिसतें )

हें रुपें नव्हे असें सांगितल्याबरोबर ती जशी शिंप आहे म्हणून समजते तसेंच हें जग नव्हे असें यथार्थ ज्ञान झाल्याबरोबर शिवतत्व आपोआप समजून येतें. ( मायेचा निरास झाल्याबरोबर आपोआप शिवज्ञान होतें. ) जशी एखाद्यानें स्वप्नांत एखादी वस्तु पहावी ती वस्तु तोच मनुष्य जागा झाल्याबरोबर जशी त्यास खोटी वाटूं लागते, तसेंच शिवतत्वाचें यथार्थ ज्ञान झाल्याबरोबर सर्व संसार नाहींसारखाच वाटूं लागतो. सर्व प्राणिमात्रांस संसाराची भ्रान्ति उत्पन्न करण्यास अज्ञानच कारण आहे, त्या अज्ञानाचा समूळ नाश झाल्यावर संसाराच्या भ्रांती पुन्हा कधींही दृष्टीस पडत नाहींत. पुन्हा संसाराचा भ्रम होत नाहीं.

ज्या शिवयोग्याची अभिमानरूपी ग्रंथि नाहींशी झाली आहे, मौजे- खातर ज्यानें देह धारण केल्याप्रमाणें दिसतें, तो शिवयोगी देहधारी अस- ल्याप्रमाणें दिसतो तरीं, त्यास कोणतीही उपाधि नसते, तो जीवन्मुक्त असल्याप्रमाणें वागतो. परकायाच्या दर्शनामुळें व इंद्रियांच्या विचारामुळें सर्व प्राणिमात्रांस इंद्रियानुग्रह होतो असें तत्ववेत्ते म्हणतात. सर्व इंद्रियांचा आपापल्या विषयोपभोगाच्या वस्तूंमध्यें लय झाला असतां (ती वस्तु त्या इंद्रियास मिळाली असतां ) एखादेवेळीं सुख वाटतें; एखादे वेळीं त्रास होतो त्या दोन्हीही गोष्टी शिवयोगी मुळींच सोडून देतो. (त्यास सुख दुःख मुळींच वाटत नाहीं.)

इंद्रियांची बाहेरील विषयसुखोपभोगाकडे असणारी प्रवृत्ति ही प्रपं- चाचा मार्ग दाखवून देते, व तींच इंद्रियें मनामध्यें शिवाकडे वळविलीं म्हणजे मोक्षप्राप्तीचें कारण आहे. शिवयोगी क्षणभर एकाग्रमनानें हृदयांत शिवरूप पाहतो व क्षणभर आपल्या डोळ्यांनीं जगांतील अनेक प्रकारच्या वस्तु पाहतो. शिवयोग्यास सर्व इंद्रियें आहेत तरी सर्व इंद्रियें नाहींत अशी त्याची स्थिति आहे; शिवाकडे नेहमीं आपलें लक्ष्य लावणारा शिवयोगी शिवालाच पाहत असतो, त्यास दुसरें कांहीं दिसत नाहीं.

शिवयोग्यास जन्म नाहीं. मरण नाहीं, तहान नाहीं किंवा भूकही लागत नाहीं, त्याचीं सर्व इंद्रियें शिवस्वरूपांत तल्लीन झालीं असल्यानें तो शिवयोगी मनाचा फार मोठा असतो. जिकडे मन लागतें तिकडेच सर्व इंद्रियें लागतात तें मनच शिवस्वरूपात लय पावल्यावर इंद्रियांची काय प्रतिष्ठा आहे ? इंद्रियें आपणच शिवस्वरूपांत लीन होतीलच. शिवयोगी आपल्या दृष्टीनें जें जें कांहीं पाहतो किंवा मनामध्यें जे जे कांहीं विचार करितो तें तें सर्व ज्ञानस्वरूप शिवरूपच असतें.

शिवयोगी आपलीं सर्व इंद्रियें आणि प्राण मनामध्यें धरून ज्या स्वरूपाकडे लावितो तोच प्रत्यक्ष शंकर होय; त्या शंकरांत जगाची ( मायेची ) भ्रांति नसते. शिवयोगी पांच ज्ञानेंद्रियें आणि पांच कर्मेंद्रियें ह्यांची सर्व प्रकारची अंतर्बाह्य प्रवृत्ति शिवस्वरूपाकडे लावून शिवाचें ध्यान करितो आणि सुखानें स्वच्छंदपणानें चोहोंकडे संचार करितो. परकाय असणाऱ्या शिवाचें जें तात्पर्य (सार) पाहणें तेंच सर्व प्राणिमात्रांन्नें प्राणानुग्रहस्थल होय असें तत्ववेत्ते लोक म्हणतात.

शिव हा श्रेष्ठ कारण आहे त्या स्वरूपांत ज्याचा प्राण लय पावतो त्या शिवयोग्याचीं इंद्रियें चलबिचल तरी कशाला करतील ? व त्याला पुनः जन्ममरण तरी कशाला घ्यावें लागेल ? तो मुक्तच आहे आपापल्या उपभोगाच्या वस्तूंपासून इंद्रियें तृप्त झाली व त्यांस त्या विषयसुखाची मुळींच प्रीति राहिली नाहीं अशी स्थिति झाल्यावर शिव-योगी इंद्रियांसहित प्राणावर चढून शांत मनानें राहतो रेचक पूरक हे प्राणवृत्ति शांत झाल्यावर मन आपल्या वृत्तीसह शांत होतें ते मन शांत झाल्यावर शिवयोग्यांस शिवाखेरीज दुसरे कांहींच दिसत नाहीं.

मनुष्यमात्रास शरीर धारण करण्यास प्राणच कारण आहे. त्या प्राणधारणास सर्व कारणांचा कारण शंकर हा कारण आहे. असें म्हणतात. शिव हा निराधार आहे, प्रत्यक्ष हा प्राण त्या शिवाच्याच आधारानें राहतो त्याच्या आधारानें शरीर राहतें. त्या प्राणाच्या आधारानें जीव चलनवलनादि क्रिया करितो. शिवयोगीलोक योगसाधनानें आपला प्राण शिवस्वरूपांत लीन झाल्यावर आपल्या शक्तीनें व आपल्या वासनांच्या शक्तीनें शरीर धारण करितात. शिव हा सर्व तत्वांपेक्षां श्रेष्ठ असून तीं सर्व तत्त्वें त्यांत राहतात. तो निष्कलंक आणि निराकार

आहे, त्याचीं भक्ति केली असतां सर्व प्रकारचे श्रम दूर होतात.

चैतन्याच्या विलासाच्या परिपूर्णतेमुळें अद्वैतसुखाचा शंकर हा निधि आहे, त्या शंकराच्या स्वरूपांत शिवयोग्याचें मन समाधीच्या अभ्यासानें लीन झाल्यामुळें पुन्हा इकडे तिकडे त्याचें जात नाहीं. ( समाधियोगापासून तो कधींही भ्रष्ट होत नाहीं. ) शिवयोग्यानें शिवयोगसमाधि लाविली असतां त्याच्या सर्व वासना नाहींशा होतात, प्राणवृत्तींचा ही नाश होतो, शिवस्वरूपांत त्याचा अंतरात्मा सर्वतोपरी गढून गेल्यामुळें तो शिवयोगी एखाद्या खांबासारखा शोभूं लागतो. शिव हा परस्वरूप असून सर्व प्राणिमात्रांवर कृपा करणारा आहे. त्याच्या पूजनाच्या वेळीं आपला देहावरील अभिमान सोडून देणें ह्यालाच कायार्पित असें म्हणतात.

जेव्हां शिवयोगी आपलें शरीर शिवाला अर्पण करितो, त्यावेळीं त्याचें स्वरूप तें शंकराचेंच स्वरूप होतें. ह्यांत कांहीं संशय नाहीं. शिवयोगी इंद्रियांस सुख देणारीं विषयोंपभोगापासून उत्पन्न होणारीं सर्व सुखें सुखस्वरूप आणि चैतन्यस्वरूप अशा शंकरालाच अर्पण करितो. पाहण्यापासून, आंगास आंग लावल्यापासून, भोजनापासून, ऐकण्यापासून, वास घेण्यापासून वगैरें विषयांपासून जें सुख उत्पन्न होतें तें सर्व सुख शिवयोगी शिवास अर्पण करितो.

शिवयोग्यास देहाच्या संबंधानें वेळोवेळीजें सुख होतें तें सर्व सुख तो शंकरास अर्पण करितो व त्यामुळें निष्पाप होतो. श्रेष्ठांपेक्षांही शंकर श्रेष्ठ आहे, त्या शंकरांत सर्व इंद्रियें लीन होणें (संयोजन करणें, त्याला शिवागमांत करणार्पित असें म्हणतात. जें जें इंद्रिय ज्या ज्या विषयसुखाची आवड करितें तें तें शंकरास अर्पण करणाऱ्यास करणार्पक ( इंद्रिय अर्पण करणारा ) असें म्हणतात. जो शिवयोगी अभिमानरूप मद वाहण्यामुळें उन्मत्त झालेल्या अन्तःकरणरूप हत्तीला शंकररूप लोखंडाच्या खुंट्यास ( हत्ती बांधण्याच्या मेखेंस ) जखडून बांधतो तो धैर्यवान् म्हणावा, व त्यास सर्व प्रकारच्या सिद्धि प्राप्त होतात.

सर्व इंद्रियांत मन हेंच मुख्य आहे असें म्हटलें आहे तें वश करून शिवाच्या स्वरूपांत लीन केल्यावर इतर इंद्रियांस जिंकण्याचें काय कारण आहे ? इंद्रियांस जिंकून तीं आपल्या ताब्यांत ठेवणें हीच मुक्ति होय

असें म्हणतात. तीं सर्व इंद्रियें शंकराच्या स्वरूपाकडे लावणाऱ्या शिवयोग्यास पुन्हां संसारसमुद्रांत बुडावें लागत नाही. ( त्यांचें जन्ममरण चुकून ते मुक्त होतात. )

इंद्रियें वश केलीं म्हणजे मनुष्यांस उपशांति ( शांतता ) येते. शांति ही संसाररूप विषारीं झाडें तोडून टाकण्याची प्रत्यक्ष कुऱ्हाडच होते. ( शांति अंगी असली म्हणजे जन्ममरण चुकतें ) इंद्रियांकडूनच पापें आणि पुण्यें घडतात. तीं इंद्रियें शंकरांत समर्पण केल्यावर कर्मांचा संग्रह कसा होईल ? कर्मसंग्रह मुळींच होणार नाहीं. आंत व बाहेर त्रैलोक्यरूप असणारा ज्ञानरूप अग्नि पेटून प्रफुल्लित झाल्यावर त्यांत सर्व विषय अर्पण केल्यावर मनुष्य मुक्तीस गेल्यासारखाच दिसूं लागतो. अंतःकरणरूप यज्ञसामुग्री घेऊन त्रैलोक्याचा पसारारूप पुष्कळसें तूप घेऊन ज्ञानरूप अग्नींत मनांत हवन करणाऱ्या शिवयोग्यांस पुन्हा संसारांत कसें बुडावें लागेल ? कधींहीं संसारदुःख भोगावें लागणार नाहीं. प्राणवायूनें फुंकून फुंकून पेटविलेल्या चित्स्वरूपी आत्मतेजांत ( अग्नींत ) सर्व विषयसुखांचें हवन करणारा शिवयोगी खरोखर चिन्मय शिवस्वरूपच होतो. ही सर्व इंद्रियें आणि उपभोग घेण्याचें मुख्यसाधन शरीर हीं सर्व शिवपूजेच्या उपयोगीं पडणारीं साधनें आहेत असें समजून त्यांचा शिवपूजेकडेच उपयोग करितो तो मोक्षास जातो.

शिवस्वरूपांत निश्चलपणानें शिवयोग्याने आपले सर्व भाव अर्पण करणें त्यास शिवरहस्य जाणणारे ज्ञाते लोक भावार्पित असें म्हणतात. मनास आवडणाऱ्या वस्तूंचें मनांत जें चिंतन चाललेले असतें तें शंकरास प्रत्यक्ष अर्पण करणें ह्यास मानसिकभाव ( मनोभाव ) असें म्हणतात. मनुष्याचा भाव ( आग्रह, दृढनिश्चय, भक्ति ) हाच त्याला संसारांत पाडण्यास किंवा मोक्षप्राप्ति करून देण्यास कारण आहे ( भावामुळें मनुष्यास बंध किंवा मोक्ष प्राप्त होतो ) भाव शुद्ध ( निर्दोष ) असला तर मोक्ष मिळतो भाव अशुद्ध ( सदोष ) असला तर संसाराचें दुःख भोगावें लागतें.

मी शिव आहे अशी कल्पना करणें ही शुद्धभावना होय तीच विपरीत भावना झाल्यावर ( शिव निराळा मी निराळा अशी समजूत

झाल्यावर ) संसारदुःखांतून सुटका कशानें होणार ? संसारदुःख कधींही चुकावयाचे नाहीं. उपभोग घेणारा शंकरच आहे, उपभोग घ्यावयाची वस्तूही शंकरच आहे, उपभोग घ्यावयास लावणारा शंकरच आहे, आणि हें सर्व स्थावर जंगम विश्व देखील शंकरच आहे अशी सर्वत्र शिवस्वरूपाचीच भावना करणारा शिवयोगी वास्तविकपणें तोच स्वतः शिव होतो.

हें सर्व त्रैलोक्य मायिक ( खोटें ) आहे, शिव हा त्रैलोक्याहून अतीत ( त्रैलोक्याहून विचित्रस्थितीचा ) सत्यस्वरूप आहे, तो शिवसत्तास्वरूप आहे, आनंदरूप आहे. ज्ञानस्वरूप आहे. असें नेहमीं शिवध्यान करणारा शिवयोगी संसारदुःख भोगण्यास पात्र होईल ? कधीही होत नाहीं. आपण जें जें कर्म करितों तें सर्व शिवाचें पूजन आहे आपण तोंडानें जें जें बोलतों ते तें शिवाचें स्तवन ( स्तुति ) आहे ह्याप्रमाणें नेहमीं भावना करणाऱ्यास कर्माचें बंधन कसें होईल ? कधींही व्हावयाचें नाही.

सर्व इंद्रियांस त्या त्या इंद्रियाच्या उपभोगाच्या वस्तूंपासून जें सुख मिळतें त्याप्रमाणें सर्व इद्रियांचें सुख आणि अनेक प्रकारच्या कर्मांपासून होणारें दुःख हें सर्व शिवालाच अर्पण असो अशी जो शिवयोगी भावना करितो तो जीवन्मुक्त होईल. नेहमीं परकाय गुरूपासून ज्याला धर्मशिक्षण मिळतें, व त्या गुरूच्या कृपेनेंच ज्याला मोक्षप्राप्तीचा अधिकार प्राप्त होतो त्यास शिष्य म्हणावें.

ज्याच्या आपल्या गुरुविषयीं, आपल्या चांगल्या चांगल्या गुणांविषयीं मन, वचन, शरीर आणि कर्म ह्यांनीं ( ह्यामुळें ) नेंहमीं दृढ निश्चय असतो त्याला शिष्य म्हणतात. जो शिष्य स्वभावानें शांत आहे जो इंद्रियनिग्रही आहे, तपश्चर्येची ज्याला अतिशय आवड आहे, जो नेहमीं खरें बोलतो, सर्वांशीं सारखेपणानें ( निष्कपटपणानें ) वागतो शिवाला व गुरूला सारखें समजतो, तो सर्व शिष्यांत मुख्य शिष्य होय असें समजावें.

जो शिष्य गुरूलाच शिव आहे असें मानतो व शिवालाच गुरु आहे असें मानितो दोघांमध्यें काडीमात्र देखील अंतर नाहीं असें मानितो त्याला तो शहाणा आहे असें म्हणावें. शिष्य आपल्या गुरुच्या आज्ञेप्रमाणें

शिवधर्मावर, शिवध्यानावर आणि निर्दोषरीतीच्या शिवज्ञानावर दृढ विश्वास ठेवितो.

अज्ञानरूप (मायारूप) समुद्र फारच मोठा असून ही ब्रम्हाण्डें त्या समुद्रावरील बुडबुडयासारखीं आहेत त्या मायासमुद्राला गुरूचा कृपाकटाक्षरूपी वाडवाग्नि जाळून टाकितो. (सद्गुरूच्या कृपाकटाक्षानें शिष्याचा मायासमुद्र नाहींसा होतो) परिसमण्याचा संपर्क झाला असतां ह्या जगांत लोखंडाचें जसें सोनें होतें त्याचप्रमाणें सद्गुरूची कृपादृष्टि शिष्यावर झाली असतां तो शिष्य प्रत्यक्ष शंकर होतो. शिष्यानें आपल्या गुरूची आज्ञा कधींही मोडूं नये, ती आज्ञा शिष्यानें मनापासून पाळली असतां शिवज्ञान वृद्धिगत होतें व त्यामुळें शिवाविषयीं दृढभक्ति उत्पन्न होऊन शिष्याचे सर्व मनोरथ पूर्ण होतात.

शिवाखेरीज दुसरें जग दिसतें असें वाटतें तें सर्व खोटें आहे, शंकर हा स्वत: ज्ञानस्वरूप आहे फार काय परंतु तूंच स्वत: शिवस्वरूप आहेस असा शिष्यास गुरूने उपदेश केल्यावर त्या शिष्यास यथार्थ ज्ञान होऊन तो मुक्त होतो. जो शिष्य संसाररूप रोग बरा होण्यासाठीं घ्यावयाचें उत्तम औषधच असें शिवज्ञान गुरूपासून शिकून आनंद पावतो व शांतपणानें सुखानें राहतो तो जीवन्मुक्तच होतो. परकाय गुरूपासून ज्याला शिवज्ञानाचा उत्तम रीतीचा उपदेश झाला आहे व त्यामुळें त्या गुरूवर त्याची श्रद्धा बसून त्याचीं नेहमी सेवा करण्यांत तत्पर असतो त्या शिष्यास शुश्रूषु असें म्हणावें. खरें काय? खोटें का? य आत्मा कोणता? श्रेष्ठ शिव कोणता? हें सर्व गुरूपासून समजून घेण्यास जो शिष्य नेहमीं तयार असतो, तो उत्तम शिष्य समजावा.

शिव प्रत्यक्ष रीतीने प्राप्त होण्यासारखा गुरूचा उपदेश ऐकून ऐकून ज्याचे मनांत समाधान वाटलें आहे तो शिष्य मोक्षास जातो. गुरूचा उपदेश ऐकल्यावांचून शिष्याच्या मनाला कधींही बोध होत नाहीं. जसें सूर्याच्या प्रकाशाखेरीज कमळ प्रफुल्लित होत नाहीं, तसेंच गरूच्या उपदेशावांचून शिष्यास ज्ञान होत नाहीं. सूर्योदय झाल्याबरोबर जसा सूर्यकांतमणि शोभूं लागतो, त्याचप्रमाणें सद्गुरूच्या कृपादृष्टीमुळें शिष्यास ज्ञान होऊन तो शिष्य कृतार्थ होतो. शिष्याने आपले दोन्ही हात जोडून आपल्या सद्गुरूजवळ जावें; व अद्वैतशास्त्रांतील अपरिमित

आनंद व ज्ञान करून देणारा उपाय विचारावा.

गुरुश्रेष्ठा, कोणतें उत्तम तत्व समजून घ्यावयाचें? कोणत्या तत्वाच्या आधाराने हें सर्व जग राहिले आहे? कोण प्रत्यक्ष रीतीनें आपल्या दृष्टीस पडला म्हणजे मोक्षप्राप्ति होते? हें सर्व संक्षिप्तरीतीनें (थोडक्यांत) मला समजावून सांगा; अशी विनंति करावी.

अगोदर इंद्रियनिग्रहवान् शिष्यानें वर सांगितलेल्या रीतीचा प्रश्न केल्यावर, सद्‌गुरू त्या शिष्याला शिवरहस्याचा उपदेश करील; त्या उपदेशामुळें शिष्याचें जन्ममरण चुकेल. शिव हेंच श्रेष्ठ तत्व आहे, तो शिव ज्ञानस्वरूपाची एक उत्तम मुर्ति आहे, त्या शिवस्वरूपाखेरीज इतर जग दिसत आहे त्यांत खरेपणा नाही; व तें जग नित्य नाहीं. तें नाशिवंत आहे. हा प्रपंचाचा पसारा सर्व मायिक खोटा आहे, शंकर हा शुद्धस्वरूप आहे. जशीं शिंपी पाहिली म्हणजे रूपें असल्याचा संशय येतो, त्याचप्रमाणें जग सत्य आणि शाश्वत आहे असें वाटतें; परंतु तें अशाश्वत असून शंकराचे स्वरूपांत राहतें.

मीच शिव आहें अशी भावना केली म्हणजे शिवसाक्षात्कार होऊन त्याचें मन स्थिर होतें, आणि अज्ञानरूप गांठ सुटून तो शिष्य जन्ममरणापासून मुक्त होतो. तूं आपणास शिव असेंच समज, शिवाखेरीज दुसरें कांहीं मनांतच आणूं नकोस, ह्याप्रमाणें शिवाद्वैत स्थिर झाल्यावर जीवन्मुक्त होशील. ह्याप्रमाणें त्या गुणवान् गुरूनें शिष्यास उपदेश केल्यावर तो शिष्य सर्व जग आणि आपण स्वत: शिवस्वरूपच आहों असें मानूं लागतो आणि त्यामुळें जीवन्मुक्त होतो.

गुरूच्या उपदेशरूप अमृताच्या गोडीमुळें ज्याला बोधरूप महा फलाचा लाभ झाला आहे असा तो सद्‌गुरूचा शिष्य, सर्व लोकांनीं त्याची सेवा करावी अशा योग्यतेस पोंचतो, तेव्हां त्यास सेवा म्हणतात. गुरूनें सांगितलेलें शिवज्ञान मनामध्यें पुरतेपणीं ठसल्यावर प्रत्यक्ष शिवदर्शन झालेला शिष्य गुरुसारखाचपूज्य होतो; व सर्व लोक गुरूसारखाच त्याचा सन्मान ठेवितात शिष्याला ज्या गुरूपासून उत्तमप्रकारची ज्ञानप्राप्ति झाली त्याच गुरूप्रमाणें तो शिष्य देखील शिवज्ञान प्राप्त झाल्यामुळें लोकांत मानमान्यता पावतो. मी शिव आहें अशी वरचेवर निरंतर भावना झाल्यामुळें, शिवपणाच त्या शिष्याला प्राप्त होतो; म्हणून

तो शिवाप्रमाणेच मानमान्यतेस पात्र होतो.

त्याचें मन विषयसुखांत गुंतलेलें असलें तरी त्याला विषयसुखाची मनापासून इच्छा नसते, शिवपणा पावलेला तो शिवयोगी दुसरा शंकरच आहे असें समजून त्याची सेवा करावी.

तो शिवयोगी संसाररूप पाशांतून मुक्त झालेला असतो, मोक्षप्राप्ति करून देणाऱ्या शिवज्ञानांत त्याचें मन स्थिर झालेलें असतें, भयंकर संसाराचें मूळच असा प्राणिमात्रांचा मोह ( अज्ञान ) तो आपल्या कृपादृष्टीनें क्षणांत दूर करितो. शिवपद श्रेष्ठ असून सत्तास्वरूप, आनंदस्वरूप आणि ज्ञानस्वरूप आहे त्याची बरोबरी करणारें दुसरें स्थान नाहीं; त्या शिवपदांत त्याचें मन गढून गेलेलें असतें, त्याचा सर्व प्रपंचाचा पसारा ( दुःख ) नाहींसें झालेलें असतें, आणि तो सर्वयोगीश्वर लोकांसही पूजा करण्यास योग्य असा होतो. (त्या शिवयोग्याची सर्व योगी सेवा करितात. )

ह्याप्रमाणें वीरशैवधर्माचा निर्णय असणाऱ्या श्री सिद्धान्तशिखामणिग्रंथांतील प्रसादिस्थलांत पोटभेदाप्रमाणें असणाऱ्या नऊ लिंगांचें वर्णन नांवाचा सतरावा दीप संपला.

## = दीप १८ वा =

अगस्त्य म्हणतात, रेवणसिद्धा, प्रसादि स्थलांत पोटभेदासारखे असलेले स्थलांचे नऊ प्रकार आम्हांस सांगितले. आतां मला प्राणलिंगिस्थलांतील पोटभेद किती आहेत ते सांगा. अगस्त्याचा असा प्रश्न ऐकून, रेवणसिद्ध म्हणतात; प्राणलिंगिस्थलाचे नऊ पोटभेद आहेत ते असे; १ आत्मस्थल २ अंतरात्मस्थल ३ परमात्मस्थल ४ निर्देहागमस्थल ५ निर्भावागमस्थल ६ नष्टागमस्थल ७ आदिप्रसादस्थल ८ अत्यप्रसादस्थल ९ सेव्यप्रसादस्थल हीं नऊ स्थले झालीं. आतां क्रमाक्रमानें प्रत्येक स्थलाचें लक्षण सांगतो.

गुरूच्या उपदेशामुळें जेव्हां शिष्य जीवपणाची बुद्धि सोडून शिवतत्वाचा अनुभव घेऊं लागतो तेव्हां त्याच्या जीवास आत्मा असें म्हणावे. आत्मा हा प्रत्येक प्राणिमात्रांच्या हृदयांत राहतो; व केसाच्या अग्राच्या शंभराव्या भागाइतका तो लहान आहे, तरी सर्व कर्मांच्या फळांचा

स्वतः अनुभव घेतो, व दीपाप्रमाणें शोभतो. आत्मा हा प्रत्येक प्राणिमात्राच्या मनांत राहतो तो फार सूक्ष्म आहे. तो आणवमल, मायामल आणि कार्मिकमल ह्या तीन प्रकारच्या मलांमुळें अनेक प्रकारची कर्मं करून संकटांत पडतो.

जास्वंदीच्या फुलाशेजारी स्फटिक मणि ठेविला, तर तो जसा लाल दिसावयास लागतो; त्याचप्रमाणें अहंकाराच्या संबंधाने आत्म्यास देहाभिमान येतो. आत्म्यास शरीर नाहीं, तरी तो सर्वं ठिकाणीं व्यापलेला आहे व निरंजन आहे. आत्मा मायामय ( खोटचा ) शरिरांत राहतो व संसारांत फिरतो. देहाविषयीं ज्ञान, इंद्रियांविषयी ज्ञान व आत्म स्वरूपाविषयी ज्ञान होऊन हे सर्व ब्रम्हस्वरुप आहे असें पुरतेपणी समजून आल्यावर, मग आत्माप्राप्ति होतें.

आत्म्यास शरीर नाहीं; त्याचा व शरीराचा कांहींएक संबंध नाहीं. तो अज्ञानपणाच्या कर्मामुळें शरीर ( देहधारी ) होतो आणि कर्माचें फळ भोगतो. आत्मा हा देव नव्हे, कोणी गंधर्व नव्हे, कोणीं यक्ष नव्हे किंवा राक्षस नव्हे. मनुष्य नव्हे किंवा पशुपक्षी नव्हे किंवा तो धोंडा किंवा लांकूड असा निर्जीव पदार्थंही नव्हे. हे संसारी जीव अनेक प्रकारच्या कर्माचीं फलें भोगतात, ते अनेकप्रकारच्या योनीमध्यें जन्मतात. अनेकप्रकारच्या कृति ( योग ) करितात व अनेकप्रकारच्या समजूतीप्रमाणें निरनिराळचा चेष्टा करितात. नाना प्रकारचे पंथ चालू करितात, अनेकप्रकारचे विचार करितात, ते परतंत्र असतात, त्यांस कांहीं थोडें बहुत ज्ञान असतें व ते कांहींएक विशेष हेतु मनामध्यें धरितात. हें सर्व जीव परमेश्वर शंकराच्या लीलेस ( क्रीडेस ) योग्य अशीं रूपें घेतात; व शंकराच्याच इच्छेप्रमाणें आपापल्या कर्मांप्रमाणें अनेकप्रकारचीं कर्मं करून कोणी स्वर्गास जातात, कोणी नरकास जातात.

पुनः कांहीं कर्मं शिल्लक राहिलें असेल, तें भोगण्यासाठीं पुनः जन्मास येतात, पुनः मरतात, पुनः जन्मतात. असें अनेकवेळ जन्ममरणाचें दुःख भोगतात. जीवदशा ही दुःखाचें भांडार आहे, जीवदशेंत अनेकप्रकारचीं दुःखें भोगावीं लागतात. हीं सर्व दुःखें मलापासून ( दोषांपासून ) उत्पन्न होतात. ते तीन मल गुरूच्या उपदेशानें दूर होऊन ज्ञानशक्ति प्रकट होते. जेव्हां गुरूनें उपदेश केल्यामुळें शिष्याचा जीव-

पणा नाहींसा होईल ( मी जीव वेगळा व परमात्मा शिव वेगळा अशी बुद्धि नाहींशी होईल ); तेव्हां जीवपणाची बुद्धि नाहींशी झाल्यावर अंतरात्मभाव उत्पन्न होतो.

हा जीव शरीरांत राहतो, तरी शरीराचा व त्याचा वास्तविक कांहीं संबंध नाहीं. असा बोध झाल्यावर व परमेश्वराचें यथार्थज्ञान झाल्यावर त्यास अंतरात्मा असें म्हणतात, शिष्याला उपदेश देतेवेळीं अन्तरात्मा हा जीव आणि परमेश्वर ह्या दोहोंच्यामध्यें राहतो व थोडे-थोडें गुणधर्म ( बुद्धिशिक्षकत्व शिवधर्म आणि आहारव्यवहारादि जीव-धर्म ) ह्यांत असतात म्हणून ह्यास अंतरात्मा असें म्हणतात. गर्वाचा ताठा अंगांत भरला म्हणजे मी मनुष्य, मीं श्रेष्ठ, मी नीच अशा कल्पना येऊं लागतात; ह्या कल्पना वास्तविक खऱ्या नव्हेत, असें ज्ञान झालें म्हणजें त्या ज्ञानास अंतरात्मा म्हणतात.

जसें पाण्यांत उगवून पाण्यांतच नेहमीं राहणारें कमळाचें पान पाण्यानें भिजत नाहीं; तसाच अन्तरात्मा हा शरीरांत राहतो, तरी शरीराचा व अन्तरात्म्याचा कांहीएक संबंध नाहीं जसा पक्षी आपल्या घरट्यांत राहतो, तरी तो घरट्याहून अगदीं वेगळा आहे; त्याचेप्रमाणें आत्मा शरीरांत राहतो खरा, परंतु तो शरीराहून अगदीं वेगळा आहे.

मेघांचा ( ढगांचा ) व चंद्राचा अर्थाअर्थी काहींएक संबंध नसतो खरा; तरीपण ते चंद्रमंडलास झांकून टाकून त्याचें तेज कमी करितात. त्याचप्रमाणें शरीराचा आणि आत्म्याचा कांहींएक संबंध नाहीं खरा; तरीपण शरीरामुळें आत्म्यास देहधारीपणा आला आहे. आत्मा हा निष्कपट आहे, व त्यास गर्व नाहीं, त्याला कोणतीही उपाधि किंवा पीडा नाहीं. आत्मा नेहमीं शरीरांत राहतो, तरी योगसाधनानें शिव-स्वरूप यथार्थरीतीनें पाहूं शकतो.

हा आत्मा सद्‌गुरूच्या ( प्रेरकाच्या शंकराच्या ) कृपादृष्टीमुळें भोक्तृ ( जीव ) आणि भोज्य ( विषय ) सोडून देऊन जीवभाववियुक्त होऊन स्वाभाविकपणानें शोभत असतो. सर्व प्राणिमात्रांस शंकर हा प्रेरक असून तो प्राणिमात्रांच्या हृदयांत राहतो; त्या शंकराचें यथार्थ-ज्ञान झाल्यामुळें योगसाधन करणारा योगी मुक्त झाल्याप्रमाणें आनंदांत निमग्न होतो. संसाराच्या फेऱ्यात पाडणारा मल ( दोष ) आत्मस्व-

रूपाच्या ज्ञानाने धुवून गेल्यावर, शिवसामरस्य प्राप्त होतें. त्या स्थितींत जीवाचें आणि परमेश्वराचें ऐक्य होतें; त्यास परमात्मस्थल म्हणतात.

आपल्या सामर्थ्यानें सर्व व्यापक असूनही शोभणारा शिव सर्व आत्म्यांपेक्षां श्रेष्ठ आहे; म्हणून त्यास परमात्मा असें म्हणतात. हे ब्रम्हांडरूपी बुडबुडयांचे समुदाय ज्याच्या मायारूप महासमुद्रांत वर येतात, व पुन्हां नाहींसे होतात, त्यास परमात्मा म्हणतात. जशा विस्तवापासून ठिणग्या वर उडतात, त्याप्रमाणें हे तेजाचे समुदाय ( जीवांचे समुदाय ) त्या परमेश्वरापासूनच उत्पन्न होतात; व त्या परमेश्वरांतच लय पावतात. तेंच परमेश्वराचें श्रेष्ठ स्वरूप होय. समुद्रांत जशा हजारों लाटा उसळतात, व पुन्हां पूर्वीप्रमाणेंच पाण्यांत जाऊन मिसळतात; त्याप्रमाणेंच ज्या परमेश्वरापासून सर्व वस्तु उत्पन्न होतात, व पुन: त्या परमेश्वरांतच लय पावतात; तेंच परमेश्वराचें स्वरूप होय, जें रूप फार निर्मळ आहे, त्रिमलांचा ज्या रूपाला स्पर्श देखील नाहीं सर्व त्रैलोक्याचा समावेश ज्या रूपांत होतो, व सर्व तत्वांपेक्षां जे स्वरूप श्रेष्ठ आहे, तेंच परमेश्वराचें स्वरूप होय. जसा सूर्य आपल्या उजेडानें सर्व जगावर उजेड पाडतो; त्याचप्रमाणें परमेश्वर आपल्या शक्तींनी सर्व जग आपल्या ताब्यांत ठेऊन शोभतो.

परमेश्वर सर्व जगाहून तेजस्वी आहे, जगांत अनेक प्रकारची माया ( अज्ञानदशा ) आहे त्या मायेहुन परमेश्वर विलक्षण आहे ( ज्ञानी आहे ). परमेश्वर हा स्वत: सर्व जीवात्म्यांस तेजोरूप आहे. जगांतील सर्व प्राणिमात्र परमेश्वराच्या शक्तीनें चालतात. जो नेहमीं परमेश्वर मीच आहे असें मानितो, ज्याला अभिमान मुळींच नाहीं, ज्याचें शरीरावर मुळींच प्रेम राहिले नाहीं, त्या प्राण्यास ( शिवयोग्यास ) निर्देहागम असें म्हणतात

ज्या शिवयोग्याचें संसार आणि भ्रांति उत्पन्न करणारें मी आणि माझे हे दोन गुण नाहींसे झाले आहेत, व जो स्वत: परमेश्वरपणाच पावला आहे त्याला शरीर तरी कोठलें ? आणि शरीरावर प्रेम तरी कोठले ? परमेश्वर हा निष्प्रपंच ( निष्कल ) आहे, गंभीर असून ज्ञानांचा महासमुद्र आहे. त्या परमेश्वरस्वरूपांत निमग्न झालेल्या शिवयोग्यास देहाचें स्मरण तरी कसें होईल ? त्या शिवयोग्यास देहाचें स्मरण

देखील होत नाहीं. जो शिवयोगी आत्मा छिन्नभिन्न होत नाहीं असें मानितो, आत्मा चिदंबर ज्ञानाकाश आहे असें मानितो, तो जरी देहधारी असला तरी त्याला देहाचें विकार होत नाहींत. परमात्मा परिपूर्ण आहे, ज्ञानस्वरूप आहे, एक आहे व सुखस्वरूप आहे. तो श्रेष्ठ आकाशाप्रमाणें सर्वत्र व्यापलेला आहे. असें मानणारा शिवयोगी कोठेंही फसणार नाहीं.

एका वस्तूंचेच उपाधिमुळे अनेक भेद झालेले दिसतात अशी ज्या शिवयोग्याची समजूत आहे, तो शिवयोगी आपण स्वत: एक अगदी क्षुल्लक शरीर धारण करणारा प्राणी आहों, असें कधींही मानणार नाहीं; तो आपण परमेश्वर आहों असें समजेल. सर्व प्राणिमात्रांची भेदबुद्धि ( निरनिराळेपणाची बुद्धि ) परिच्छेदास ( सर्व वस्तु परस्परांहून भिन्न आहेत अशी समजूत करण्यास ) कारण आहे. ती भेदबुद्धि नाहींशी होऊन ईश्वर सर्वत्र परिपूर्ण आहे अशी अभेद बुद्धि झाल्यावर परिच्छेदाचें नांव देखील घेण्याचें कारण नाहीं.

मी स्वत: शंकर आहें, अशी भावना असणाऱ्या, व मी शंकर असल्यामुळें मला पाहिजे तेथें जाता येतां येतें, मी शंकर असल्यामुळें सर्व त्रैलोक्यांचें स्वरूप तेंच माझें स्वरूप आहे, असें समजणाऱ्या शिवयोग्याचा त्याच्या शरीराशीं काय संबंध आहे ? शरीरावर त्याचें काडीमात्र ममत्व नसतें. जो शिवयोगी आपण स्वत: परमेश्वराचें स्वरूप आहों असें मानितो, परमेश्वर वेगळा, जग वेगळें अशी भेदबुद्धि ज्याच्या मनांत मुळींच राहिलीं नाहीं, त्या शिवयोग्याच्या विकाररहित भावाला निर्भावागम असें म्हणतात. मी ब्रम्हस्वरूप आहें, अशा भावाला वस्तुद्वयाक्षेप येतो तो चित्स्वरूपाकाशांत समरस झाल्यावर त्याला वस्तुद्वयाक्षेप रहात नाहीं असें निश्चित आहे. निष्कलंक अशा चित्स्वरूप तेजांत ऐकपणा पावलेल्या ( मिसळून गेलेल्या, तादात्म्य पावलेल्या, ) शिवयोग्याला जाति तरी कशाची ? इच्छा तरी कशाची ? मी शरीरी आहें अशी कल्पना तरी कशाची ? आणि भ्रांति तरी कशाची ?

ज्या शून्य चिदंबर स्थानाची वाचेला आणि मनाला कल्पना देखील होत नाहीं. त्या चिदंबरस्थानांत तल्लीन झालेला श्रेष्ठ शिवयोगी कोणत्या वस्तूची कमतरता पडली म्हणून अमूक वस्तु मला पाहिजे

म्हणून इच्छा करील ? ( त्यास कोणत्याहीं गोष्टीची कमतरता नाहीं. ) एखादी जागा निर्मळ असो किंवा मलिन झालेली असो, दोहीं ठिकाणीं सूर्याचा प्रकाश सारखा पडतो; त्याचप्रमाणें शिवाद्वैती मनुष्य सर्व ठिकाणीं सारखेंपणानें वागतो; अमुक मनुष्य नीच आहे, अमुक मनुष्य श्रेष्ठ आहे अशी कल्पना त्याचें मनांत मुळींच येत नाहीं.

तो शिवयोगी म्हातारपणाला व मृत्यूला मुळींच जुमानीत नाहीं; त्याला कधी भुकेची बाधा होत नाही; तो सर्व काळ सुखी असून परिपूर्णपणानें आत्मानंदाचा अनुभव घेतो. भेदभावना नाहींशी झालेल्या श्रेष्ठ अशा शिवतत्वबोधांत ज्याची ज्ञातृ, ज्ञेय आणि ज्ञान ही त्रिपुटी ( जाणणारा, जाणावयाचें आणि जाणलेलें हें तीन गुण ) लय पावले आहेत; त्या शिवयोग्याला भेदज्ञानाचा नष्टपणा झाला असल्यामुळें ( त्याला जाणावयाचें असें कांहींच उरलें नसल्यामुळें ) नष्टागम असें म्हणतात. शिवाद्वैतवासनांत ज्यांचीं मनें गढून गेलीं आहेत अशा व आपल्याच हृदयांत परमेश्वर आहे असें मानणाऱ्या परकाययोग्यांस दुसऱ्यांपासून समजावून घ्यावयाचें असें काय आहे ? त्यांस सर्व समजतेंच आहे.

मी कर्ता नव्हें, मी जाणता नव्हें, मला शरीर नाहीं, मी निरंजन आहें. ह्याप्रमाणें नेहमीं शिवाद्वैताचा विचार करण्यास प्रत्यक्ष ज्ञानच आपोआप प्राप्त होतें. ज्याची भेदबुद्धीची बडबड नाहींशी झाली आहे ज्याला कोणतीही इच्छा राहिलेली नाहीं, ज्याचें मन शांत झालें आहे, आत्मस्वरूपाच्या महिम्यांत जो लीन झालेला आहे त्याला आणखी दुसरें जाणावयाचें असें काय राहिलें आहे ? त्याला सर्व समजलेंच आहे. प्रपंचरहित ( निष्फल ) अशा आत्मज्ञानामुळें एकस्वरूपाप्रमाणें दिसणाऱ्या आत्मस्वरूपांत जाणणाऱ्यानें जाणावें तरी काय ? व जाणणारा तरी कोणास म्हणावें ? सर्व शिवस्वरूपच आहे.

सत्ता मोठी आहे, ज्ञान मोठें आहे, सर्व जगाचा त्या ज्ञानांत आणि सत्तेत समावेश होतो. ( सत्ता आणि संवित् विश्वाच्या रूपांत दिसून येते. ) त्या सत्तेखेरींज आणि संविदेखेरीज एक देखील वस्तु नाहीं, असें मनांत आणिलें म्हणजे भेदबुद्धी नाहींशी होते. सर्व प्राणिमात्रांत शंकर राहिलेला आहे, तो सर्वांच्या अगोदरपासून आहे, त्याच्या कृपेमुळें कृतार्थ

झालेल्या शिवयोग्यास आदिप्रसादी असें म्हणतात. तो आदिप्रसादी ज्याला कोणत्याही प्रकारची उपाधि नाहीं अशा शिवानंदांत पूर्णपणें गढून गेलेला असतो.

अनेक जन्मांत ज्यानें पुण्य संपादन केलें आहे, ज्याला अभिमान मुळींच राहिलेला नाहीं, ज्याला प्रपंचही राहिलेला नाहीं, अशा त्या आदिप्रसाद्यास मोक्षप्राप्ति व्हावयास आदिदेव ( शंकर ) प्रसन्न होतो. ( शंकराच्या कृपेनें त्यास मोक्षप्राप्ति होते. ) शंकराच्या कृपारूप संपत्तीनें शिवस्वरूप झालेल्या शिवयोग्यास शिवाखेरीज दुसरा जगाचा पसारा जरी दिसतो, तरी तें दिसणें नव्हेच; तें एक शिवस्वरूपच होय. शंकराची कृपा झाली म्हणजे संसारदुःखाचा नाश होतो. ज्ञानीलोक शिवकृपेनें अज्ञानरूप ग्रंथीचा ( गांठीचा ) नाश करून मोक्षास जातात.

शंकराच्या कृपेखेरीज संसार दूर होत नाहीं; सूर्योदय झाल्याशिवाय जगांतील अंधार नाहींसा कसा होईल? कधींही नाहींसा होणार नाहीं. शंकर हा सर्व प्राणिमात्रांवर दया करणारा आहे. तो शंकर फक्त कृपेमुळें सर्व प्राणिमात्रांस पाशमुक्त करितो. ह्याखेरीज दुसरें कांहीं कारण नाहीं सर्व पदार्थांचा लय होणें ह्यास विद्वान् लोक अंत्य असें म्हणतात. त्याचप्रमाणें शिवयोग्याला शिवप्रसादाचा अनुभव येणें हें शेवटचें काम आहे. म्हणून तसा अनुभव ज्याला आला आहे, त्यास अंत्यप्रसादी असें म्हणतात.

देव, पशु, पक्षी मनुष्य वगैरे अनेक प्रकारच्या जातींची कल्पना ही सर्व मायेमुळें उत्पन्न होते, (ती मायिक आहे), श्रेष्ठ प्रकारचें शिवतत्व प्रकट झालें असतां व मायेचा लय झाल्यावर, वर सांगितलेली भेदबुद्धीची कल्पना एका क्षणांत नाहींशी होते. शिवतत्व श्रेष्ठ असून सत् चित् आणि आनंदस्वरूप आहे. तें प्रकट झाल्यावर पदार्थांचें ज्ञान तरी कोठले? आणि जाणणारा तरी कोठला? जसा एखादा मनुष्य गाढ झोंपी गेल्यावर त्याला कांहींएक वस्तु दिसत नाहीं. त्याचा भेदभाव समूळ नाहींसा होऊन त्याला सर्वत्र शिवस्वरूपच दिसूं लागतें.

जसें आकाश सर्वत्र सारखें पसरलेलें आहे कोठेंही छिन्नभिन्न झालेलें नाहीं, त्याच्या रूपास कोणताही विकार नाहीं; तसेंच मुक्त झालेल्या जीवाचें आत्मस्वरूपच काय तें एक कायम असतें. त्याखेरीज

भेदबुद्धि त्याच्या मनांत नसते; सर्व जग शिवमय आहे असें त्यास वाटतें. मुक्त झालेल्यास कांहींएक पहावयाचें राहिलें नाहीं, किंवा करावयाचें राहिलें नाहीं, तो नेहमी आत्मानंदांत सुखानें राहतो व त्याचें आत्मज्ञान वरचेवर जास्त वाढतें, त्याचें मन स्थिर असतें. या त्याच्या स्थितीला निश्चल स्थिति म्हणतात.

शिवाच्या अद्वैतज्ञानामुळें ज्याला इतर सर्व वस्तु तुच्छ वाटतात, फक्त ज्ञानाचा मात्र विकास ज्याला मनापासून आवडतो, त्या शिवयोग्याला कोणाबरोबर काय करावयाचें आहे? त्याला कोणाचीही जरुरी नाहीं; त्याला सर्व गोष्टींची अनुकूलता आहे. सर्व प्राणिमात्रांचा शंकर हा गुरु असून तो सेवा करण्यास योग्य आहे ह्यांत शंका नाहीं. त्याचा प्रसाद ( कृपा ) झाला म्हणजे त्यास परानंदाचा प्रका असें म्हणतात ( त्याचा प्रसाद झाल्यावर शिवयोगी शिवानंदांत निमग्न होतो. ) गुरूस सेव्य ( सेवा करण्यास योग्य ) असें म्हणतात, व त्याच्या प्रसादास अनुभव असें म्हणतात, ते दोन्ही शब्दार्थ एकत्र केले म्हणजे ते गुण एकाच्याच अंगी असणाऱ्या शिवयोग्यास सेव्यप्रसादी असें म्हणावें.

गुरुवर्य हाच श्रेष्ठ शिवतत्व आहे, व शिवतत्व हें श्रेष्ठ गुरु आहे; हीं दोन्ही एके ठिकाणीं मिळविल्यावर मग कांहींच बाकी राहत नाहीं ( गुरुपासून शिवतत्वांची माहिती होते त्यामुळें गुरु अनुकूल असला म्हणजे शिवतत्व आपाप समजल्यासारखेंच आहे. )

शिवाज्ञानानंद हा अखंड आहे, त्याचे भाग होत नाहीत, तो आनंद आपल्या मनांत राहतो, तो वाचा आणि मन ह्यास समजण्यासारखा नाहीं. तो शिवज्ञानानंद अनुभवणाऱ्या मनुष्यांस (शिवयोग्यांस) दुसऱ्या कोणत्या वस्तूची आवड असणार आहे? त्यांस दुसऱ्या कोणत्याही वस्तूची आवड असत नाहीं. शिवज्ञानानंदानें तृप्त झालेल्या मनुष्यास दुसऱ्या उपभोगाच्या वस्तु घेऊन काय करावयाचें आहे? कांहीं एक प्रयोजन नाहीं, कां तर ज्ञानामुळेंच त्याला श्रेष्ठरीतीचा आनंद असलेल्या शिवाचा बोध होतो.

मुक्ति हीच उत्तम प्रकारची तृप्ति आहे, तीच खरी आहे, ज्ञानस्वरूप असून आनंदस्वरूप आहे नित्य तृप्त असणाऱ्या मुक्त शिव-

योग्याला दुसरे उपभोगाचे पदार्थ कशाला पाहिजेत? मुळींच नकोत. त्या मुक्त झालेल्या शिवयोग्याला बाह्यकर्म ( पूजा वगैरे ) करावें लागत नाहीं. व अन्तर्कर्म (जप, तप, ध्यान वगैरे) कांहीं एक करावें लागत नाहीं; कां तर शिवतादात्म्य झाल्याचें ज्ञान त्याच्या मनांत पूर्णपणानें ठसलें असल्यामुळें, हें शरीर माझें अशी मोहाची कल्पना देखील त्याच्या मनांत राहिलेली नसते.

परयोगसाधन करणारांच्या मनाची धांव आत्मस्वरूपाकडे जशी असते, तशी यज्ञयागादि कर्मे करण्याकडे नसते, खडतर तपश्चर्या करण्याकडे नसते, मंत्रजप करण्याकडे किंवा योगाभ्यास करण्याकडे नसते, ध्यानाकडे नसते. किंवा बोधाकडेही नसते.

ह्याप्रमाणें वीरशैवांच्या धर्माचा निर्णय असलेल्या श्री सिद्धान्त-शिखामणि ग्रंथांतील प्राणलिंगस्थलाच्या पोटभेदाप्रमाणें असलेल्या नऊ प्रकारच्या लिंगाचे वर्णन असलेला हा आठरावा दीप संपला.

## = दीप १९ वा =

अगस्त्य म्हणतात– रेवणसिद्धा, प्राणलिंगिस्थलाचे नऊ पोटभेद मला सविस्तररीतीनें सांगितले आतां मला शरणस्थलाचे पोटभेद किती आहेत ते समजावून सांगा असा अगस्त्याचा प्रश्न ऐकून, रेणुक म्हणतात– तपस्विश्रेष्ठा, अगस्त्या, शरणस्थलाचे बारा पोटभेद आहेत त्यांचीं नांवें मी तुला सांगतो. नीट लक्ष लावून ऐक.

१ दीक्षापादोदक, २ शिक्षापादोदक, ३ ज्ञानपादोदक, ४ क्रिया-निष्पत्तिक, ५ भावनिष्पत्तिक. ६ ज्ञाननिष्पत्तिक, ७ पिंडाकाशस्थल ८ बिंद्वाकाशस्थल, ९ महाकाशस्थल, १० क्रियाप्रकाशनस्थल, ११ भाव-प्रकाशनस्थल व १२ ज्ञानप्रकाशस्थल, हीं बारा स्थलें शरणस्थलाचे पोटभेद होत त्यांचे भेद मी आतां क्रमाक्रमाने सांगतों.

गुरूचें आणि शिष्याचे आनंदाचें ऐक्य होणें व ज्ञानदानदीक्षा मलक्षयरूप जी ज्ञानक्रिया दीक्षा त्या दीक्षेनें द्वैतभाव निवारण होतो त्या ज्ञानालाच दीक्षापादोदक असें म्हणतात. किंवा पाद ह्या शब्दाचा अर्थ गुरु असा करावा, व उदक शब्दाचा अर्थ शिष्य असा करावा त्या दोघां गुरुशिष्यांचें दीक्षेमुळें ऐक्य होतें, म्हणून त्यास दीक्षापादोदक असें

म्हणतात. पाद ह्या शब्दावरून उत्तम प्रकारचा शिवानंद म्हणून ओळखावा, तो शिवानंद निर्दोष आहे. उदक शब्दावरून ज्ञान म्हणून ओळखावे. तीं दोन्हीं दीक्षेमुळें एकत्र होतात म्हणून त्यास दीक्षापादोदकस्थल असें म्हणावें.

ज्याचा मनाला परमेश्वराच्या स्वरूपाचें यथार्थज्ञान झालें आहे, तो श्रेष्ठ शिवयोगी सर्वत्र शिवज्ञानानंदाचीच भावना करीत असल्यामुळें त्याला भेदभाव "हें माझें, हें परक्याचें" अशी बुद्धि कधींच होत नाही. शिवयोग्याला देशकाल वगैरेमुळें छिन्नभिन्न ( खंडित ) न होणारा, नेहमी निर्दोष असणारा शिवानंद सद्‍गुरूच्या उपदेशानें प्राप्त झाल्यावर त्याचें दुसऱ्या कोणत्याही वस्तूवर मन जात नाहीं गुरूच्या कृपेमुळे प्राप्त झालेलें निर्दोष असें शिवज्ञानरूप अमृतच चाखून शिवयोगी सुखानें कालक्रमणा करितो व त्या अमृतपान करण्यामुळें त्याचा संसाररूप रोग दूर होतो.

जी शिक्षा गुरुशिष्यमय ज्ञानाला व दीक्षापादोदकसंपन्न शिवयोग्याला प्रेरणा करिते, त्या शिक्षेला व ज्ञानाला जे ऐक्य (सामरस्य) होतें त्याला शिक्षापादोकस्थल असें म्हणावें. वेदागमात्मक वीरशैवशास्त्ररूप समुद्र आहे; त्यास युक्तिरूप मंथा ( रवी ) करून घुसळलें ( शास्त्राचा युक्तीनें विचार केला ), म्हणजे गुरुच्या द्वारानें (पासून) शिवयोग्यांस शिवाद्वैतज्ञानामृत प्राप्त होतें बुद्धिमान् शिवयोगी लोक मुक्तिरूपरात्रीं परमाकाशांत ( हृदयाकाशांत ) शिवज्ञानरूप चंद्राचें परमानंदरूप स्वच्छ चांदणें पडलेलें पाहतात. ( शिवज्ञानी लोक परमात्म्याचें शिवाद्वैतशास्त्रानें ज्ञान करून घेऊन संतोष पावतात व मोक्षास जातात. )

ज्याला देश, काल वगैरे कांहीं नाहीं तें आनंदस्वरूप दृष्टीस पडल्यावर दुसरें पहावयासारखें कांहीं राहिलें नाहीं, ऐकण्यासारखें कांहीं राहिलें नाहीं, किंवा जाणण्यासारखेंही कांहीं राहिलें नाहीं. आत्मज्ञानरूप आनंदानें तृप्त झालेल्या शिवयोग्यास विषयसुखाची काय आवड आहे ? गंगानदीचें गोड पाणीं पोटभर पिऊन तृप्त झाल्यावर आडांतील पाणी काढून प्यावें असें कोणास वाटेल ? कोणासही वाटणार नाहीं. ज्या शिवानंदरूपी समुद्रावर लाटा देखील उठत नाहींत, त्या

सौख्यसमुद्रांत शिवसामरस्यामुळे बुडून गेलेल्या शिवयोग्याच्या सुखाची मर्यादा तरी कशी करावी ? कां तर तें सुख अमर्याद आहे.

गुरूचा प्रसाद ( कृपा ) रूप चंद्र निष्कलंक असून सुंदर आहे, त्या प्रसादामुळें ज्या शिष्याचें अन्तःकरणरूप चंद्रविकासी कमल प्रफुल्लित झालें, त्याला पुन्हा अज्ञानाची ( मायेची ) भ्रांति कशी पडेल ? कधींही पडणार नाहीं त्या शिवैक्य संपत्तीचें ज्ञान आणि आनंद ह्यांलाच ज्ञान-गुरु असें म्हणतात ( ज्ञानगुरूच्या उपदेशानें शिष्याला त्रैलोक्याचें सुख आणि आनंद मिळतो ). त्या गुरूबरोबर शिष्याचें सामरस्य होणें ( गुरूसारखीच शिष्याची स्थिति होणें ) यास ज्ञानपादोदक असें म्हणतात.

अज्ञानरूप राहूपासून सुटलेला ज्ञानरूप चंद्र फारच निर्मळ असा असा दिसतो, आणि चिदंबरांत ( सर्वोत्कृष्ट हृदयाकाशांत ) त्याचा प्रकाश पडून त्याचें तेज फारच स्वच्छ होऊन त्यामुळें इतरांस पराका-ष्ठेचें सुख होतें. ( संसारांतून मन विरक्त झाल्यावर शिवज्ञान वरचेवर जास्त होऊन तो शिवयोगी मुक्त होतो ). अज्ञानरूप ढगांतून बाहेर निघालेला शिवज्ञानरूप पोर्णिमेचा पूर्ण चंद्र आनंदरूप समुद्रास भरती आणून शोभूं लागतो. ( संसारासंबंधी मायिक बुद्धीचा नाश होऊन आत्मज्ञान उत्पन्न झालें म्हणजे शिवानंदाचा अनुभव घ्यावयास मिळतो. )

शिवज्ञानरूपचंद्राचा उदय होऊन अज्ञानरूप अंधःकाराचा पसारा नाहींसा झाला, म्हणजे योगीश्वर सुखस्वरूपी श्रेष्ठ दिशा पाहतात. ( योग्याचें अज्ञान नाहींसें होऊन त्यांस ज्ञान झालें म्हणजे ते चैतन्य-स्वरूपास जाऊन पोहोंचतात ) अज्ञानरूप अंधार नाहींसा झाल्यानंतर व ज्ञानरूप सूर्याचा उदय झाल्यावर, सर्व कामधंदे वगैरे सोडून देऊन, योगीश्वर सुखानें झोंप घेतो हें आश्चर्य आहे. इतर प्राकृत लोक रात्रीं स्वस्थ निजतात आणि दिवसास कामधंदे करितात योगीश्वराचें त्यांच्या उलट आहे. तो ज्ञानसूर्य उगवून अज्ञानांधकार नाहींसा झाल्यावर निजतो.

अनादिकालपासून चालत आलेल्या अज्ञानदशेचा नाश होण्याची वेळ आली असतां परयोग्यास प्रपंचावांचूनच परब्रम्हस्वरूपाचा निरुपा-धिकानंद प्राप्त होतो परब्रम्हाचें स्वरूप नित्य आणि आनंदी आहे; तें

आत्मस्वरूपासारखें आहे, व निर्दोष आहे. त्या परब्रम्हस्वरूपांत निमग्न झालेल्या योगीश्वरांस विश्व वेगळें आणि परमेश्वर वेगळा अशी कल्पना देखील येत नाहीं.

कुठला ब्रम्हदेव, कुठला विष्णु, कुठला शंकर आणि कुठला सूर्य, प्रत्यक्ष झालेल्या आत्मस्वरूपानंदाच्या तेजाची बरोबरी कोणाच्यानेही करवत नाहीं. ज्याला प्रत्यक्षरीतीनें आत्मस्वरूपाचा आनंद पूर्णपणें मिळालेला आहे; त्या श्रेष्ठशिवयोग्याला ब्रम्हदेव विष्णु वगैरे मोठे मोठे देव क्षुल्लक वाटत असून त्यांच्यापासून मिळणारीं सुखें तृणतुल्य वाटतात. जगांत विषयसुख म्हणून जें कांही सुख मानलें गेलें आहे तें सुख आत्मानुभवसुखाच्या एकलक्षांश हिश्याबरोबर देखील टिकत नाहीं; त्या विषयसुखाची देखील लोक इतकी आवड करितात, मग त्या आत्मानुभव सुखाची इच्छा कोण करणार नाहीं ? सर्व ज्ञाते लोक करतील. कांतव त्या सुखाची बरोबरी कोणत्याही सुखास येत नाही, इतकें तें सुख श्रेष्ठ आहे.

दोरी पाहिली म्हणजे ज्याप्रमाणें एकदम साप आहे असा संशय येतो; त्याप्रमाणें परकायाविषयीं ( मध्यें ) क्रियानिष्पत्ति कल्पिलेलीच आहे; जो शिवयोगी परकाय असून क्रिया करितो, त्यास क्रियानिष्पत्ति-स्थल असें म्हणावें. ज्ञानी मनुष्य जीं जीं कर्में करितो, ती तीं कर्में त्याला जन्म घेण्यास कारण होत नाहींत; विस्तवांत जळालेल्या बियांस जसा पुन्हा अंकुर फुटत नाही, तसेंच ज्ञानी मनुष्याच्या कर्मांपासून त्यास पुण्यपाप लागत नाहीं. ज्या शिवज्ञानीं मनुष्याचा अभिमान निखालस नाहींसारखा झाला आहे, त्यानें कर्मं केलीं तरी त्यापासून त्याला काय पापपुण्य लागणार आहे मुळीच पापपुण्य लागणार नाही. चंद्राच्या प्रतिबिंबाला जर एखादा विकार झाला तर त्यामुळें चंद्राला थोडाच विकार होतो; चंद्रास मुळीच विकार होत नाही. तसेंच ज्ञानीमनुष्याचे हातून बरी वाईट कर्में घडली, तरी त्यास पुण्य किंवा पाप लागत नाहीं.

चंद्राखालून ढग जाऊ लागलें म्हणजे ढगांतून चंद्राकडे पाहणाऱ्या पृथ्वीवरील लोकांस चंद्र चालतोसा दिसतो; त्याचप्रमाणें शरीराचा संबंध झाल्यामुळे आत्मा कर्में करितो असा संशय येतो वास्तविक आत्मा कोणतेंही कर्म करीत नाहीं. ज्ञानी मनुष्य कर्म करितो खरा परंतु

त्याचीं फळें त्यास भोगावीं लागत नाहींत. जीभ तूप वगैरे पदार्थांची चव घेते खरी, परंतु तिला ते चिटकून रहात नाहींत. ज्या जीवाचा उपाधिसंबंध नाहींसा झालेला आहे, त्या जीवांत जीं जी क्रिया राहते, ती ती क्रिया राहिल्यासारखीं दिसते मात्र; परंतु वास्तविक त्या क्रियेचा कांहींएक उपयोग नसून ती त्या जीवांतच लय पावते.

कोणताही प्राणी जात असो, एकेजागीं बसलेला असो, किंवा निदान झोंप घेत असो; तो कांहीं तरी कर्म करीतच असतो, रिकामा म्हणून क्षणभर राहत नाही, सतत कांहीं तरी कर्म करीत असणें हा प्राणिमात्रांचा धर्म आहे. त्याप्रमाणें ज्ञानी मनुष्यही कर्म करीतच असतो, परंतु भेद इतकाच कीं, अज्ञानमनुष्याचें कर्म त्यास बाधक होतें; ज्ञानी मनुष्याचें कर्म त्यास बाधक होत नाहीं. जो ज्ञानी सच्चिदानंदस्वरूपाच्या आनंदाचा पूर्णपणानें उपभोग घेतो, व ज्याचें मन निष्पाप आहे, त्याचे हातून घडणारें बरें वाईट कर्म त्या ज्ञान्यास नानाप्रकारचें सुख दुःख भोगण्या करितां संसारांत जन्म मरण घेण्यास लावीत नाहीं.

परकाय जींवामध्यें भाव आहे असा भास होतो; खरा, परंतु तो काल्पनिक आहे. खरा नव्हे; शिंप पाहिली म्हणजे तें रुपें आहे असें जसें प्रथमदर्शनीं वाटतें, तसेंच परकायांत भाव असल्याची शंका येते; त्यास भावनिष्पत्तिस्थल असें म्हणावें ज्यास यथार्थरीतीचें शिवज्ञान झाले आहे, त्या ज्ञान्याचा भावाशीं कांहींएक संबंध नाहीं; तरीपण तो शिवज्ञानी मनुष्य संसारदुःखांतून सोडविणाऱ्या शंकरावर भाव ठेवितो (भक्ति करितो).

शिवयोग्याला यथार्थरीतीचें शिवज्ञान झाले तरी तो शंकराची भक्ति करणें मुळींच सोडीत नाही; कांतर शंकराची भक्ति केली तर त्या भक्तांस शंकर संसारसमुद्रांतून पैलतीरास नेतो. शिवावर ठेवलेला भाव (शिवाची केलेली भक्ति) जन्ममरणाचे दुःख दूर केल्यावांचून राहत नाही. लांकडास विस्तव लागला तर तें लांकूड जाळून टाकून मग आपोआप तो विझतो; तशीच शंकाराची भक्ति देखील भक्ताच्या जन्ममरणाचें दुःख दूर करून मग लय पावते शिवानंद प्राप्त झाल्यावर तो आनंद प्राप्त करून घेण्याची खटपट करण्याचें काय कारण आहे? जें काम करावयाचें तें सिद्धीस गेल्यावर त्या कामाचीं खटपट कशासाठीं

करावयास पाहिजे ?

जितेंद्रिय शिवयोगी वृत्तिज्ञानानें भाव आणि शिव ह्यांचें ऐक्य केल्यावर आश्चर्यानें संकलित झालेल्या स्वस्वरूपसमावेशामुळें "शिऽवोहं" ह्या भावानें इंद्रियनिग्रहकरणारा तो शिवयोगी शोभूं लागतो. भावावांचून वृत्तिज्ञान होत नाहीं व वृत्तिज्ञानावांचून भाव होत नाहीं. मोक्षप्राप्ति व्हावी अशी इच्छा असल्यास भाव आणि वृत्तिज्ञान हीं दोन्ही ही पाहिजेत; ह्यासाठीं तीं दोन्हीही मिळविलीं पाहिजेत.

ज्ञानाचा उपयोग आहे खरा, तरीपण वास्तविक जाणावयाचें असें कांहीं एक नसल्यामुळें तें ज्ञान होणें स्वप्नांत होणाऱ्या ज्ञानासारखें निरुपयोगी आहे; म्हणून त्यास ज्ञाननिष्पन्नस्थल असें म्हणतात. स्वप्नांत झालेलें ज्ञान जसें त्याच्या अर्थासह जागें झाल्याबरोबर आपाप नाही सारखें होतें; तसेंच शिवसामरस्य पावलेल्यास जाणावयाचें असें कांहीं-एक राहिलें नसल्यामुळें वस्तूंविषयीं झालेलें ज्ञान निरुपयोगी असतें.

शिव स्वतः परिपूर्ण आहे त्यास कोणत्याही वस्तूची अपेक्षा नाहीं, तो मोठा आनंदी आहे, परमाकाश हें त्याचें लक्षण आहे. त्या शिवाचे स्वरूपांत ज्याचें मन पूर्णपणानें गढून गेलें आहे, त्याला अमुक एक जाणावयाचें राहिलें आहे ही गोष्ट तरी कशाला पाहिजे ? त्याला सर्व काहीं समजून चुकलें आहे. फक्त परब्रम्हच काय तें एक परिपूर्ण आहे, आनंदस्वरूप आहे, आणि ज्ञानस्वरूप आहे. त्या परब्रम्हाखेरीज दुसरें जें कांहीं आहे, तें सर्व खोटें आहे. असा खरा प्रकार समजून येणें ह्यालाच ज्ञान म्हणतात. सत्यस्वरूप अशा परब्रम्हस्वरूपाखेरीज इतर घागरींवगैरेंवर नाम, वृत्त वगैरे जें कांहीं दुसरे गुणधर्म आहेत; ते खोटे आहेत असें जे समजणें तेंच ज्ञान होय.

ज्याला कशाचेही कारण नाहीं, ज्याला कांहींएक करावयाचें नाहीं, ज्याला कोणत्याही रीतीचो उपाधि नाहीं, तें परब्रम्हस्वरूप होय; आणि तें परब्रम्हस्वरूपही मीच आहें असा जो दृढ निश्चय त्यास ज्ञान म्हणतात. जाणणारा मी, व जाणावयाचें हें, हा व्यवहार तरी कुठला ? कांतर परब्रम्हस्वरूपांत भेदभाव ( निरनिराळेपणा ) मुळींच नाहीं, तें अखंड आहे, त्यांत कोणतीही वस्तु निराळी आहे असें मानतां येत नाहीं.

जसें पिंडांत ब्रम्हाण्ड (आकाश) आहे तसाच आत्मा हा सर्वत्र परिपूर्ण आहे. ह्या संबंधाचा जो सारासार विचार करणें त्याला पिंडाकाशस्थल म्हणतात. आकाशाला घट ही उपाधि आहे, वास्तविक पाहिलें तर आकाश हें सर्वत्र व्यापलेलें आहे, ह्याचप्रमाणें पिंडांत राहणारा आत्माही परिपूर्णच आहे. ह्या शरीरांतील जीव वेगळा, त्या शरीरांतील जीव वेगळा, असें म्हणतां येत नाहीं.

शिव हा अन्तर्यामीं राहतो, तो चिदंबर आहे, अद्वैत ( भेदभाव नसणें ) हे त्याचें लक्षण आहे. असा जो मनांत विचार करील, त्यास पिंडाकाश असें म्हणावें. आपलें शरीर हें शिवमंदिर आहे, त्यांत प्रोबध ( ज्ञान ) रूपी नंदादीप जळत आहे; त्या मंदिरांत छत्तीस तत्वांनीं तयार केलेलें मनोरूपी कमलासन आहे. चिदंबर स्वरूपानें प्रत्यक्ष परमेश्वर प्राणिमात्रांच्या हृदयरूप आकाशाच्या गुहेंत त्या कमलासनावर बसलेला दिसतो. ( शंकर हा सर्वान्तर्यामी आहे. ) शरीर हें शिवनगर आहे असें मानिलें आहे, तें सातधातूंनीं ( मेद, मज्जा, स्नायु, रक्त, अस्थि वगैरे सात धातूंनी ) तयार केलेलें आहे, त्या नगरांत हृदयकमलरूपी घर असून तें सूक्ष्माकाशामुळें फार सुशोभित दिसतें ( त्यांत बारीक वस्त्रांचें छत असल्यामुळें शोभतें त्या मंदिरांत सत् चित् आणि आनंद हीं लक्षणें असलेला नित्यसिद्ध व तेजोमय शंकर पाण्यांत पडलेल्या आकाशाच्या प्रतिबिंबांप्रमाणें राहतो.

शिव हा हृदयाकाशामध्यें राहतो, त्याला कोणत्याही प्रकारची उपाधि नाही. घटाकाशाप्रमाणें तो परिच्छिन्न आहे. असें मनांत आणावें, ज्याप्रमाणें आकाश हें श्रेष्ठ असून सर्व प्राणिमात्रांच्या मस्तकावर राहतें. त्याप्रमाणें आत्मा हा प्रत्येक प्राणिमात्राच्या हृदयांत राहतो. हें समजणारास विद्वाकाशस्थल असें म्हणतात. जसा वायु हा एक असून तो शक्तिमान् आहे, व सर्व प्राणिमात्रांच्या अन्तर्बाह्य भरलेला आहे, तसाच आत्मा हा व्यापक असून सर्व प्राणिमात्रांच्या हृदयांत पूर्णपणें भरलेला आहे.

विस्तवाचें तेज अलौकिक आहे, तें एकच आहे तरी सर्व ठिकाणीं असल्याचें अनुभवास येतें त्याप्रमाणेंच शंकर सर्वप्राणिमात्रांच्या हृदयांत

पूर्णपणानें भरलेला आहे. त्याचे भाग मुळींच होत नाहीत, तो अखंड आहे. सर्व प्राणिमात्रांच्या हृदयांत चित्तरूप जल रहात आहे. जसें आरशांत रूप पाहणाऱ्याचें प्रतिबिंब दिसतें, त्याचप्रमाणें चित्तरूप जलामध्यें आत्म्याचें प्रतिबिंब दिसतें. शिव एक आहे, जितेंद्रिय आहे, ज्ञानस्वरूप आहे, श्रेष्ठाहून श्रेष्ठ आहे, सर्व प्राणिमात्रांच्या हृदयकमलांत राहतो असा दिसतो तरी व्यापक आहे.

सूर्य हा एकच आहे, तरी तो आपल्या तेजामुळें सर्व ठिकाणीं आहेच असें वाटतें; तसाच शंकर आपल्या अलौकिक सामर्थ्यामुळें स्वकीय इच्छा ज्ञानादि शक्तींनीं विश्वव्यापक होऊन राहतो. ब्रम्हाण्डात आणि पिंडांडांत व्यापलेलें आकाश जसें भिन्न नाहीं, तसाच बिद्राकाशसंपन्न शिवयोग्याच्या चैतन्याहून परमात्मा भिन्न नाहीं; ह्या अभेदालाच महाकाशस्थल म्हणतात. आकाश हें घागरींत थोडें आणि घरांत थोडें असें वाटलें गेलें आहे, तरी तें छिन्नभिन्न होत नाहीं, तें एकच आहे. त्याचप्रमाणें जगांतील सर्वप्राण्यांमध्यें आणि एका प्राण्यामध्यें आत्मा भरलेला आहे, तरी तो छिन्नभिन्न होत नाहीं; तो एकच आहे.

चित्स्वरूप अमुक प्रकारचें आहे म्हणून सांगतां येत नाहीं, त्याची बरोबरी करील असा त्रैलोक्यांत एक देखील पदार्थ नाहीं. वाचेस आणि मनास त्यानें वर्णन करितां येत नाही, त्याला सर्व बाजूंस मुखें आहेत, व तें सत्तास्वरूप आनंदस्वरूप आणि ज्ञानस्वरूप आहे. ज्ञानस्वरूप कालाहून अतीत आहे ( अनादिकालापासून आहे ), कलांहून अतीत आहे ( निष्कल आहे ). त्याला क्रम आणि योग वगैरे नाहींत. तें स्वानुभवावरून प्रमाण करितां येणारें आहे. तें तेजस्वी पदार्थांस तेजस्वी करणारें आहे. त्याला शिव असें नांव आहे, तें परब्रम्हस्वरूप आहे. चिदंबर हें त्याचें लक्षण आहे. त्याला विद्वान् लोक महालिंग असें म्हणतात. त्याच्या आश्रयानें सर्वत्रैलोक्य राहतें. त्याचे आश्रयाखेरीज त्रैलोक्यास राहतां येत नाहीं.

तें महाकाश आहे ( मोठें आकाश आहे ), तें स्पष्ट दिसत नाहीं, ज्ञान आणि आनंद हें त्या ज्ञानस्वरूपाचें लक्षण आहे (तें ज्ञानमय आणि आनंदमय आहे ). तें लिंगस्वरूप असून तेजःपुंज आहे. त्या ज्ञानस्वरूपांत योगीश्वर निमग्न होतात. ( योगीश्वर त्या ज्ञानस्वरूपाचें नेहमीं ध्यान

करितात. )

ज्ञान हीच मोठी मर्यादा आहे, ज्ञान अतिशय आनंद देणारें आहे, निःसंशय झालेलें सर्व मुनीश्वर त्या ज्ञानशक्तीलाच परम आकाश असें म्हणतात. समुद्राच्या पाण्याहून लाटा वगैरे जशा वेगळ्या नव्हेत, एकच आहेत; त्याप्रमाणें ज्ञानस्वरूप शिवाहून त्रैलोक्य हें वेगळें नाहीं त्रैलोक्य हें शंकराचेंच स्वरूप आहे. जसें फूल पान वगैरे झाडाहून कांहीं वेगळें नाहीं, ते सर्व झाडाचेच अवयव आहेत. त्याप्रमाणेंच शिव हा परस्वरूप असल्यामुळें त्याच्यांत आणि जगांत कांहींएक निराळेपणा नाहीं. जशीं आकाशांत ( परमेश्वराच्या स्वरुपांत ) अनेक ब्रम्हांडें शोभतात. त्या पराकाशास (शिवस्वरूपास) उपाधींचा मुळींच कांहींएक संबंध नसतो, ते निर्मळ आणि ज्ञानस्वरूप आहे, ते अलौकिक आहे. जगज्जालरूप चित्रास परमेश्वर हा भिंतीसारखा आधार आहे. शंकर हा परिपूर्ण आहे आणि ज्ञानाकाशस्वरूप आहे, तो आणि मी एकच आहोंत असें नेहमी मनांत जो ध्यान करतो, त्या शिवयोग्यास क्रियाप्रकाशस्थल असें म्हणावें.

शिव निष्कलंक व ज्ञानस्वरूप आहे, आनंदस्वरूप असून आकाशा-प्रमाणें सर्वत्र व्यापलेला आहे व परिपूर्ण आहे. त्याची कृति ( क्रिया ) ही चैतन्यस्वरूप आहे. शंकर हा निष्कलंक आहे, निराकार आहे (त्यास आकार नाही ). तो शाश्वत आहे, व मोठा तेजस्वी आहे, त्या शिवस्व-रूपांत निमग्न झालेल्या शिवयोग्याची जी शक्ति असते तिला क्रिया असें म्हणतात. शंकर हा सर्व कांहीं जाणणारा आहे, सर्व कांहीं कर-णारा आहे, सर्व ठिकाणीं त्याचें गमन आहे, तो परमेश्वर आहे त्या-बरोबर माझें ऐक्य व्हावें अशी निरंतर शिवयोग्यानें भावना केली म्हणजे तो स्वतःच शिवस्वरूप होऊन शोभूं लागतो.

सर्व इंद्रियांचे व्यापार चालले असले तरी संयमी (शिवयोगी . शिव-स्वरूपाकडे आपलें लक्ष लावून नेहमीं आनंदांत राहतो. शंकर हा कूटस्थ आहे, अचल ( निश्चल ) आहे, तो मोठा ज्ञाता असून गुणांहून अतीत आहे, ( गुणांच्याही पूर्वीपासून आहे ), व मोठा गुणवान् आहे. त्या शंकराचें तत्व ( रहस्य ) यथार्थरीतीनें पाहणारा शिवयोगी आनं-दांत निमग्न असतो. परस्वरूप शिवयोग्यामध्यें सर्वक्रिया आकाशांत गंधर्वनगर जसें शोभतें तशा शोभतात; म्हणून त्यास क्रियाप्रकाशनस्थल

असें म्हणतात.

समुद्रांत वारंवार अनेक लाटा उसळतात, तरी त्या लाटा आणि समुद्राचें पाणी एकच आहेत, त्यांत कांहीं निराळेपणा नाहीं, त्याप्रमाणें क्रियासंपन्न शिवयोग्याच्या चैतन्यामध्यें भावबुद्धि वगैरे उत्पन्न होतात, परंतु आत्मा आणि भावबुद्धि वगैरे कांहीं वेगळें नाहीं सर्व एकच आहे. त्यालाच भावप्रकाशनस्तल म्हणतात. सर्व जग हे शंकरच आहे व मी देखील शंकरच आहे, अशीं नेहमीं मनांत भावना करणाऱ्या शिवयोग्याला संसाराची कांहींच पीडा होत नाहीं. शिव हा श्रेष्ठ असून निर्विकार आहे. त्या शिवाविषयीं भाव ( भक्ति ) स्थिर झाला असतां जे जे भाव उत्पन्न होतात, ते ते सर्व शिवस्वरूपच असतात.

शिवाखेरीज दुसरें कांहींएक नाहीं, अशी शिवाकार भावना झाल्यामुळें ज्याच्या सर्व कर्मांचा नाश झाला आहे, तो महात्मा शिवयोगी शिवाखेरीज दुसरें कांहींएक मनांत आणित नाहीं. ज्याचा अज्ञानपणाचा पाश नाहींसा झाला आहे, फक्त आत्मानुभव सुखाचाच जो उपभोग घेतो, त्या शिवयोग्याचे जें जें इंद्रिय ज्या ज्या वस्तूकडे जाईल तेथें तेथें त्यास शिवस्वरूपच आहे असें वाटतें. राग ( प्रीति ) वैर वगैरे विकार संसारदुःख देण्यास कारण आहेत ( त्या विकारांमुळें संसारदुःख भोगावें लागतें ) ह्यास्तव शिवयोग्याचे ते विकार नाहींसे झाले असल्यामुळें शिवयोग्याचे भाव शिवस्वरूपच आहेत.

सूर्याचा पराजय करण्याची जशी अंधकाराची शक्ति होत नाहीं, तसें शिवज्ञान झालेल्या शिवयोग्यास वश करण्याची अविद्येस ( अज्ञानास ) शक्ति होत नाहीं. ( अज्ञानाच्यानें शिवज्ञानी आत्म्यास वश करवत नाहीं. ) लक्षणा आणि योग ह्यांच्या साधनानें तात्पर्यार्थ समजून चुकला असतां त्यामुळें जे ज्ञान वाढतें त्या ज्ञानसंबंधास ज्ञानप्रकाशनस्थल असें म्हणतात. मुक्त झालेल्या शिवयोग्याचें ज्ञान इतकें विलक्षण असतें कीं, त्यास जाण्या जाणावयाचें असें कांहींच नसतें, सर्व त्यास समजलेंच असतें. ज्या ज्ञानाला उपाधि आहे त्या ज्ञानानें भेदबुद्धि ( द्वैतभावना ) दूर करितां येत नाहीं.

लिंगांगभरूपवस्तूच्या खंडितत्वाला ज्ञाते लोक द्वैतज्ञान म्हणतात. अखंड निरुपाधिक महाचैतन्याचा ठिकाणीं द्वैतज्ञानाची उत्पत्ति कोठून

होईल ? मुळींच होणार नाहीं.

शिवनांवाचें चैतन्यस्वरूप व सुखस्वरूप असणारें तत्वज्ञानशक्तीनें समजून येण्यासारखें नाहीं तें अगम्य आहे. आत्मा आणि परमात्मा एकच आहे असें अनुसंधान करणे ह्यालाच ज्ञाते लोक ज्ञान असें म्हणतात. ज्याचा आनंद अपरंपार आहे, ज्याची सत्ता मोठी आहे, सर्व त्रैलोक्याचा ज्याच्या स्वरूपांत समावेश होतो, ब्रम्ह हें ज्याचें लक्षण आहे त्यास ब्रम्हज्ञान असें म्हणतात. तें ब्रम्हज्ञान उत्पन्न झाल्यावर जगाची कोणतीही उपाधि राहत नाहीं जिकडें पाहावें तिकडे ज्ञानमय शिवस्वरूपच दिसूं लागतें त्याखेरीज दुसरें कांहींएक दिसत नाहीं. ह्यासाठीं शिवाद्वैताचें ज्ञान होणें हें मोक्षप्राप्तीचें कारण आहे ( शिवाद्वैतज्ञान झाल्यानें मोक्ष मिळतो ) असें नेहमीं मनांत आणून त्याप्रमाणें शिवयोग्यानें वर्तन ठेविलें म्हणजे त्यास पुन्हां संसारदुःख भोगावें लागत नाहीं.

निष्पास्वपभावाचें सत्वगुणांचे जगांत जितके शिवयोगी आहेत त्यांपेक्षां शंकर हा श्रेष्ठ आहे, त्याला कोणतीही वासना राहिलेली नाहीं, ( तो निरिच्छ आहे ) निष्फल ( प्रपंचरहित ) आहे, जगांत जीं जीं स्थानें आहेत त्यांपेक्षां तो फार प्राचीनकाळापासून आहे, सर्व स्थावर-जंगम प्राणी हे त्याचेंच स्वरूप आहे, तो सत्तास्वरूप ( सर्वजगावर त्याची मालकी ) असा असून तेजोमय आहे, चिदंबर आहे. त्या शिवाच्या स्वरूपांत ज्याचें मन गढून गेल्यामुळें त्याला आतां भेदबुद्धि म्हणून राहिलीच नाहीं, सर्वठिकाणीं त्याला जाण्यायेण्याचें सामर्थ्य आल्यानें विश्वाचा परकेपणा मुळींच राहिला नाहीं असा तो शिवयोगी प्रत्यक्ष शंकराप्रमाणें शोभूं लागतो.

ह्याप्रमाणें वींरशैव धर्माचा निर्णय असलेल्या श्री सिद्धान्तशिखामणि ग्रंथांतील शरणस्थलासंबंधाच्या बारा पोटभेद लिंगांचे वर्णन असलेला हा एकोणींसावा दीप संपला.

## = दीप २० वा =

अगस्त्य म्हणतात, रेवणसिद्धा, आपण शरणस्थलाच्या संबंधाचे बारा पोटभेद व लिंगस्थलें सांगितलीं. त्याप्रमाणें आतां ऐक्यस्थलाचे किती पोटभेद आहेत ते मला सांगा. आपण सर्व प्रमथगणांत श्रेष्ठ

आहां. ह्या ऐक्यस्थलाचे नऊ पोटभेद आहेत. ते असे– १ स्वीकृतप्रसादैक्यस्थल २ शिष्टोदनस्थल ३ चराचरलयस्थल ४ भांडस्थल ५ भाजनस्थल ६ अंगालेपस्थल ७ स्वपराज्ञास्थल ८ भावाभावविनाशस्थल ९ ज्ञानशून्यस्थल हीं नऊ स्थलें झालीं, आतां तपस्विश्रेष्ठा अगस्त्य ऋषे तुला क्रमाक्रमानें प्रत्येकाचें लक्षण सांगतो.

ज्या ज्ञानप्रकाशसंपन्न शिवयोग्याचें ठिकाणीं मुख्यार्थ आणि लक्षणार्थ ( उघड दिसणारें तात्पर्य आणि समजून घ्यावयाचें तात्पर्य ) हे दोन्हीही मुळींच नसून ज्याच्या प्रसादाला कोठेंही प्रतिबंध होत नाहीं. पाहिजे तेथें प्रसाद होतो; त्या स्थलास स्वीकृतप्रसादैक्यस्थल असें म्हणावें. शिवयोगी मोजणारा, मोजावयाच्या व प्रमाण ह्या तिन्हीही व्यवहारांत फिरणाऱ्या ज्ञानशक्तीला आपल्या मनांत जाणून स्वस्थ राहतो ( शिवयोग्याला सर्वप्रकारचें ज्ञान असतें अमुक ज्ञान त्याला नसतें असें नाहीं. )

शिवाद्वैतज्ञानामुळें ज्याची भेदबुद्धि नाहींशी झाली त्या शिवयोग्याला शिवतत्वज्ञानाच्या साधनामुळें बंधन कसें होईल ? मुळींच होणार नाहीं. शिव हा ज्ञानस्वरूप असून त्यांत हें स्थावर जंगम विश्व राहतें. अग्नींत जसें लांकूड घातलें तर ते अग्निच होतें तसें शिवस्वरूपांत सर्व जग राहत असल्यानें तें शिवस्वरूपच भासतें. चित्स्वरूप शिव दृष्टीस पडल्यावर पृथ्वीतत्व भिन्न वाटत नाहीं, जलतत्व भिन्न वाटत नाहीं, अग्नितत्व भिन्न वाटत नाहीं, वायुतत्व भिन्न वाटत नाहीं, किंवा आकाशतत्व देखील भिन्न वाटत नाहीं, सर्वतत्वें शिवस्वरूपच आहेत.

ज्ञानस्वरूपी तेजोलिंग आपल्या मनामध्यें नेहमी प्रकाशमान असल्यामुळें, त्याच तेजामध्यें लीन होणाऱ्या दुसऱ्या पृथ्वीवगैरे छत्तीस तत्वांशीं शिवयोग्याचा संबध असत नाहीं. चित्स्वरूपी आत्मतेजामध्यें (अग्नींत) अन्तर्मुख मन करून (एकाग्रमनानें) शिवयोगी सर्व आवडीचे विषय जाळून टाकून आनंद मानतो. (शिवयोगी विषयसुख सोडून देवून आत्मस्वरूपाकडे लक्ष लावून सुखानें राहतो. ) शिव आपला आत्मा असून सत् चित् आणि आनंदस्वरूप आहे, त्या शिवाला शिवयोगी आपले सर्व विषयसुखाचे पदार्थ अर्पण करितो. नंतर त्याचा प्रसाद म्हणून त्या पदार्थाचा उपभोग घेतो.

सर्व प्राणिमात्रांस माया म्हणून जी प्रतीतीस येते तीच ओदन-स्वरूप आहे, ती माया चित्स्वरूपलिंगामध्यें लय पावते म्हणून त्यास शिष्टोदनस्थल म्हणतात. मायेच्या पाशांत सांपडून जर्जर झालेलें त्रैलोक्यरूपी शरीर बोध झाल्यामुळें (शिवज्ञान झाल्यामुळे) ज्ञानस्वरूपांत तेंच कायते एक (मायातत्वच) शिल्लक राहतें. परिपूर्ण अशा सच्चि-दानंद परब्रम्हस्वरूपांत निमग्न झालेल्या धैर्यवान् जीवन्मुक्त शिवयोग्याला माया दासीसारखी तुच्छ वाटते. तो मायावश होत नाहीं, उलट माया त्याबरोबर दासभावानें वागते.

चित्स्वरूपी तेजोलिंगामध्यें निमग्न असणाऱ्या मोठ्या मनाच्या शिवयोग्यानें विषयांचा उपभोग घेतला; तरी इतर विषयी लोकांच्या विषयाप्रमाणें वरचे वर ते वाढत नाहींत, उलट आपापच नाहींसे होतात. शब्द, रूप, रस, स्पर्श, गंध हे ज्या ज्या ज्ञानेंद्रियांचे विषय आहेत, त्या त्या ज्ञानेंद्रियांनीं त्या विषयांचा शिवयोग्यानें उपभोग घेतला; तरी नद्या समुद्रांत जशा मिळून जातात, त्याप्रमाणेंच ते विषय आत्मस्वरूपांतच लय पावतात.

जसा सूर्य आपल्या बरोबर आपल्या सर्व प्रकाशमंडळास संकोच करून अस्त पावतो; तसाच शिवयोगी सर्व प्रकारच्या अर्थसमुदायास ग्रास करून शांत होतो. स्थावरजंगमांत असणारें महालिंगतादात्म्य प्राप्त झालें असतां, त्यांत शिवयोगी विदेही होवून स्थावरजंगमांत असणाऱ्या मलशक्तीचा (त्रिमलांचा) नाश करणारा होतो.

जग आपणास दिसतें, त्या दिसण्यास अनादि मायाच मूळकारण आहे. स्वात्मज्ञानानें त्या मलशक्तीचा नाश झाल्यावर जग कोठून दिसणारा ? मुळींच दिसणार नाहीं. जसे ढग आकाशांतच उत्पन्न होतात आणि आकाशांतच नाहींसे होतात; तसे उत्तम प्रकारचें शिवाद्वैतज्ञान झालेल्या शिवयोग्याचे विषय आत्मस्वरूपांतच उत्पन्न होतात आणि आत्मस्वरूपांतच लय पावतात. स्वप्नांत पाहिलेली वस्तु जागें झाल्या-बरोबर जशी नाहींशी होते; तसेंच संसारासंबंधीं कोणत्याही प्रकारचें सुख किंवा दुःख आत्मज्ञान झाल्याबरोबर नाहीसें होतें.

जागृति, स्वप्न, आणि गाढ झोंप ह्या तिन्ही अवस्थांच्या पुढें म्हणजे तुर्यावस्थेस जाऊन पोंचलेल्या शिवयोग्यास प्रमाण तरी कसले ?

जाणावयाचे तरी काय राहिलें ? आणि ज्ञानाचें साह्य तरी कशाला पाहिजे ? तुर्यावस्थेच्या पुढें जें पद आहे तेच परमेश्वराचें पद आहे, व तेथपर्यंत गेल्यावर जन्ममरणाचें दुःख दूर राहते. तेथपर्यंत शिवयोगी जाऊन पोंचल्यावर पुन्हां त्यास जग दिसत नाहीं (तो संसार चक्रांत सांपडत नाही, तो मुक्तच होतो), ज्ञानस्वरूप व आनंदस्वरूप असा शंकर एकवेळ प्रत्यक्षरीतीने दृष्टीस पडल्यावर शिवयोगी दुसरें कांही पाहात नाही. दुसरें कांहीएक जाणत नाही, किंवा दुसरें कांहीएक ऐकत नाहीं. शिवस्वरूपाखेरीज इतर कोणत्याही गोष्टीकडे त्याचे लक्ष जात नाहीं.

हें सर्व जग वास्तविक खोटें आहे तरी खरें असल्याप्रमाणें भासतें, शिवस्वरूपाचें यथार्थ ज्ञान झाल्यावर तें अज्ञान नाहींसें होवून वास्तविकस्वरूप आपल्या अनुभवास येतें. शंभरकोट ब्रम्हाण्डे उत्पन्न करणें, संरक्षणकरणें, आणि लय करणें वगैरेंस अधारभूत जो शब्दब्रम्हरूप विचार आहे, त्यास भांडस्थल असें म्हणतात.

विचारनांवाची श्रेष्ट शक्ति आहे त्या शक्तीमुळें सर्वजगाचें ज्ञान होतें, ती सर्वप्राणिमात्रांस साक्षीभूत आहे ( सर्वप्राणिमात्र जीं जीं कृत्यें करतात तीं तीं सर्व तिला समजतात. तिला चोंहोंकडे तोंडें आहेत. तिला सर्वप्रकारचें ज्ञान आहे. ती सर्वत्र प्रकाशमान आहे. ज्या विचारशक्तींत हें सर्व जग लय पावतें, व आत्मा ज्ञानस्वरूप आहे व आनंदस्वरूप आहे असे समजून येतें, ती प्रत्यक्ष विचाररूप कला होय. श्रेष्ठ परमेश्वर तो मी आहे अशी दृढभावना असल्यामुळें ज्याला परिपूर्णरीतीची विचार शक्ति आहे, जो सर्वकाहीं जाणतो, ज्याला पाहिजे तेथें जातां येतें. सर्वलोक काय करितात हें ज्याला समजतें, सर्व कामें जो करितो, तो महेश्वर शंकरच ह्या जगांत श्रेष्ठ आहे.

ही परमेश्वराची विचारशक्ति त्रैलोक्यास अवश्य उपयोगी पडणारें जें अद्वैतज्ञान त्याचा प्रसार करण्यामुळें पूर्णपणा पावली आहे; व त्या विचारशक्तीला परमेश्वराची अहंता ( मीपणाची समजूत ) असें म्हणतात. ज्यानें आपल्या विचाररूपपात्रांत सर्वत्रैलोक्याचें ज्ञानतत्व सांठवून ठेविलें आहे ( ज्याला आपल्या विचारशक्तीमुळें कोठें काय चाललें आहे तें सर्व समजतें, ) त्याला दुसऱ्याच्या तोंडाकडे मुळींच पाहावें लागत नाही. तो मुक्त आत्मस्वरूपांत निमग्न असतो.

सर्व त्रैलोक्य उत्पन्न होणें त्याचें रक्षण करणें व त्याचा संहार करणें ह्या गोष्टींस अवश्य लागणारा विचार ज्यांत असतो त्यास भाजनस्थल असें म्हणतात. जगाचा अनेकप्रकारचा चित्रविचित्रपणा दाखविणारी विमर्श नांवाची श्रेष्ठ शक्ति ज्यांत राहते ते परब्रम्हस्वरूप होय. व त्या परब्रम्हस्वरूपांत सर्व त्रैलोक्य एखाद्या पात्रांत ठेवलेल्या पदार्थाप्रमाणें राहतें ( परब्रम्हस्वरूपांत राहतें. )

अन्तःकरणाच्या रूपानें व त्रैलोक्यरूप अंकुराच्या रुपानें ज्यांत ( परबिंदूंत ) शक्ति राहते त्या विमर्शनांवाच्या परबिंदूस परब्रम्ह परशिव असें म्हणावें. जगांतील सर्ववस्तूंवर उजेड पाडणारे चांदणें जसें चंद्रामध्यें राहतें त्याप्रमाणें विचाररूपशक्ति परब्रम्हस्वरूपामध्यें राहते. " अ " ह्या अक्षराचा अर्थ शिव असा होतो " हं " ह्या अक्षराचा अर्थ शक्ति असा करावा हीं दोन्ही अक्षरें मिळून " अहं " असा शब्द झाला शिवशक्तिमयच ब्रम्ह आहे तें ब्रम्ह आहे तें ब्रम्ह एक होऊन " अहं " अहं ह्या पदांत राहतें.

शिवशक्तिरूप श्रेष्ठ मीपणास सप्तदशी चित्कलेला ( अहंतेस ) पाऊन ब्रम्हसायुज्य पावलेला शिवयोगी विश्वात्मा (त्रैलोक्याचें स्वरुप) असल्याप्रमाणें शोभतो. वडाच्या झाडास येणारीं पानें फुलें तें झाड उगवण्यापूर्वी बीजामध्यें सूक्ष्मरूपानें जशीं असतात त्याप्रमाणें हें स्थावर जंगम त्रैलोक्य परमेश्वराच्या हृदयरूप बीजामध्यें राहतें. जें ज्ञानस्वरूप दिशा आणि काल ह्यामुळे छिन्नभिन्न होत नाहीं तें अक्षय आणि सदोदित परिपूर्ण असतें तें आनंदस्वरूप असून मोठें आहे असें ज्याचें स्वरूप आहे अशी प्रसिद्धि आहे त्यास अंगालेपस्थल म्हणतात.

जसा धुराचा मोठा लोट आकाशांत जाऊन पसरला तरी आकाशाच्या स्वरूपास कांहीच विकार होत नाहीं त्याप्रमाणें शिवयोगी सर्व प्राणिमात्रांचा आत्मा आहे तरी तो ज्ञानस्वरूप असून मोठा ज्ञानी आहे त्यामुळें त्याला संसारदुःख मुळींच भोगावें लागत नाहीं.

ज्ञानस्वरुप व लौकिककर्म न करणाऱ्या शिवयोग्याला विधि नाहीं, निषेध नाही, विकल्प नाहीं, किंवा वासना नाहीं; ज्ञानस्वरुपास हे विकार होत नाहींत. पुष्कळ घागरी तयार केल्या तर प्रत्येक घागरींत राहणारें आकाश ( पोकळी ) हें निरनिराळें दिसतें, तरी तें निराळें

नव्हे तें एकच आहे, त्याचप्रमाणें उपाधिमुळें ( निरनिराळ्या कारणामुळें ) तें ब्रम्हस्वरुप अनेकप्रकारचें झालेलें दिसतें, तरी अनेकप्रकारचें नव्हें तें एकच आहे. जसें आकाश नेहमीं राहणारें ( शाश्वत ) आहे, तें अमुक एकप्रकारचे आहे म्हणून सांगतां येत नाहीं असें दिसतें; तसेंच ब्रम्हस्वरुप हें शाश्वत आणि अवर्णनीय आहे. त्यांत ज्ञान ही एकप्रकारची विशेष (अलौकिक) कला आहे. जीवमुक्त झालेल्या शिवयोग्याला सर्व ठिकाणीं शिवस्वरुपच आहे असें दिसतें. हा देवपणा आहे, हा मनुष्यपणा आहे, हा पशुपक्षीपणा आहे वगैरे निरनिराळेपणा त्याला मुळींच वाटत नाहीं, परब्रम्हस्वरूप अनुपमेय (अलौकिक) आहे, ज्ञानस्वरूप आहे, त्यांत अद्वैतमताचेंच प्राबल्य आहे. त्या परब्रम्हस्वरूपांत तल्लीन झालेल्या शिवयोग्याला हें माझें शरीर आहे आणि हें दुसऱ्याचें शरीर आहे असा द्वैतभाव मुळींच वाटत नाहीं.

ज्या परब्रम्हस्वरूपांत भेदबुद्धीमुळें ( मी वेगळा परमेश्वर वेगळा अशा समजुतीमुळें ) मीपणा आणि तूंपणा अशीं भ्रांतीच पडत नाहीं; त्यांत संयोग नाहीं, वियोग ( तुटातुट ) नाहीं. जाणावयाचें व जाणणारा ही निराळेपणाची देखील कल्पना नाहीं. त्याला बंध ( अटकाव ) नाहीं किंवा मुक्ति नाहीं, मी देव आहे म्हणून सर्वांपेक्षां श्रेष्ठ आहें असा गर्व होत नाहीं. सुख नाहीं, दुःख नाहीं, ज्ञान नाहीं किंवा अज्ञान नाहीं. त्याला श्रेष्ठपणा नाहीं किंवा नीचपणा नाहीं, वर नाहीं किंवा खालीं नाहीं, मागें नाहीं किंवा पुढें नाही दूर नाहीं किंवा जवळ नाहीं. परब्रम्हस्वरूप सर्व त्रैलोक्य मिळून एकरूप झाल्यासारखें आहे, ज्ञानस्वरूप आहे, सत्यस्वरूप असून श्रेष्ठ व निर्दोष आहे. त्या अशा रीतीच्या परब्रम्हस्वरूपांत मिळून गेलेल्या ( सामरस्यामुळें एक झालेल्या ) परकाय शिवयोग्यांस आपलेपणा आणि परकेपणाच्या समजुतीच्या थट्टेची गोष्ट कोठली ? ( त्यांस भिन्नभाव मुळींच नसतो. )

देश आणि काल ह्यामुळें छिन्नभिन्न न होतां अखंडपणानें राहणाऱ्या तेजोरूपाचा आश्रय केल्यामुळे, व स्वरूपज्ञान नाहींसें झाल्यामुळें, त्यास स्वपराज्ञस्थल ( स्वपरभाव नसणारें असें स्थल ) म्हणतात. चिदंबरस्वरूपांत मीपणा आणि तूंपणा नाहीं, तें खरोखर शून्यासारखें आहे; त्या चिदंबर ( परमेश्वर ) स्वरूपांत सामरस्य पावलेल्या शिव-

योग्याला भाव आणि अभाव ही गोष्टच माहीत नाहीं.

ज्याचा मीपणा नाहीसा झाला आहे, तसाच मी हा शब्द देखील ज्याला राहिलेला नाहीं ( मानीत नाही ), ज्याला भाव आणि अभाव माहीत नाही, तो जीवन्मुक्त होऊन शोभतो, चित्स्वरूपाला कोणताही विकार नसून तें महासामर्थ्य आहे; त्या ज्ञानस्वरूपाला सुखाचा किंवा दुःखाचा भावही नाही आणि अभावही नाही. ज्याचा भाव आणि अभाव (आहे नाहींपणा) नाहीसा झालेला आहे, त्या शिवयोग्याला त्या तेजोमय चित्स्वरूपांत चांगलें रुप किंवा वाईट रुप कांहीएक दिसत नाही, त्यास सर्वत्र शिवस्वरुपच दिसतें.

शिवलिंगैक्य झालें असतांना कोठेंही भाव आणि अभाव दिसून येत नाहीत; ह्यामुळें त्यास भावाभावलयस्थल असें म्हणतात. मीपणा तूंपणा ( आपलेपणा परकेपणा ) ह्याची आवश्यकता असलेलें भावाभावाच्या विचाराविषयी ज्ञान व ब्रम्हस्वरुप व भावाभावसंपन्न अशा शिवयोग्यांत नाही; त्याला ज्ञानशून्यस्थल म्हणतात. पाण्यांत पाणी टाकलें तर सारखेंच दिसतें, विस्तवांत विस्तव टाकलें तर तोही एकसारखाच दिसतो; त्याप्रमाणें परब्रम्हस्वरुपांत लीन झालेला शिवयोगी अमुक वस्तुहून अमुकवस्तु निराळी आहे असें मुळीच मानीत नाही, सर्वत्र शिवस्वरूपच भरलें आहे असें मानतो.

श्रेष्ठतत्व हें सर्वजगाचें स्वरूप आहे ( सर्व जग त्या परब्रम्हस्वरूपांत राहतें ). त्या तत्वस्वरूपांत निराळेपणाची कल्पना देखील नाही; त्या रूपांत ज्ञातृ ज्ञेय आणि प्रमाण ह्या तीनतऱ्हेचें ज्ञान कोठून संभवणार आहे ? मुळीच संभवत नाही.

ब्रम्हस्वरूपास विकार नाहीं, आकार नाही, तें शाश्वत आहे, त्यास मर्यादा नाहीं, तें आकाशाप्रमाणें सर्वत्र व्यापलेलें आहे, व त्यास कोंणत्याही प्रकारचा विकल्प नाहीं; तें अशा प्रकारानें राहतें. त्या परब्रम्हस्वरूपात पृथ्वी, आप्, तेज, वायु, आकाश वगैरे पंचमहाभूतांचा संबंध नाही, त्या रूपांत नऊ ग्रह किंवा तारका ह्यांचा संबंध नाही, त्या रूपांत देव नाहीत, मनुष्य नाहींत, पशुपक्षी नाहीत किंवा दुसरे कोणी नाहींत. त्या केवल ज्ञान सत्ता आणि आनंद अशाप्रकारचें लक्षण असणाऱ्या परब्रम्हस्वरूपांत तूंपणा आणि मीपणा वगैरेपासून उत्पन्न होणारे ज्ञान

कोठून अनुभवास येईल ? मुळींच येणार नाही.

त्या रूपांत जाणतां येईल अशी कोणाची शक्ति नसल्यामुळें ( त्यांत जाणण्यासारखें कांहीं नसल्यामुळें ), तें बहूत करून शून्याप्रमाणेंच दिसून येतें, त्यांत ज्ञातृज्ञेयप्रमाण वगैरे कांहींएक नाहीं. ज्ञान वगैरे दुसरे ही कोणते गुणधर्म ह्या परब्रम्हस्वरुपांत नाहीत. आधी, शेवटी किंवा तरुणपणाच्या स्थितींत जें नेहमी शून्य आहे ( त्याला जन्म नाही, त्याला तारुण्य नाही व मरणही नाही. ), त्याची बरोबरी करील असा जगांत दुसरा पदार्थ नाही. सारांश तें सर्वतोपरि शून्य असल्याप्रमाणें अनुभवास येतें. तें सत्स्वरूप, चित्स्वरूप आनंदस्वरूप प्रकाशस्वरूप आणि अद्वयस्वरुप आहे, तें शून्यासारखें असून चिदंबरस्वरूप आहे. व तें अशातऱ्हेचें असल्यामुळें उत्तमप्रकारानें शोभतें.

परब्रम्हस्वरुपांत इतर ज्ञानादिकांचें तर नांव देखील नाही, त्याला कोणतीही वस्तु प्राप्त करुन घ्यावयाची नाहीं ( तें सर्वगुणसंपन्न आहे ), तें तेजोमय लिंगस्वरूप आहे, तें ज्ञानस्वरूप असून स्वतः प्रकाशमान आहे. त्याला दुसऱ्या प्रकाशमान वस्तूंचें किरण नाहीं, तेंच इतर वस्तूंस प्रकाशित करतें, त्याचें कोणी खंडन करीत नाहीं. त्या परब्रम्हस्वरूपांत सामरस्य पावलेल्या योगीश्वरास भेदबुद्धीचें ज्ञान कसें उत्पन्न होईल ? मुळींच उत्पन्न होणार नाहीं.

ज्या योगीश्वरास कार्याची दशा नाहीं आणि कारणाचीही दशा नाहीं (ज्याला कार्य नाहीं आणि कारणही नाहीं,) ज्याला शेषपण आणि शेषिपणही नाहीं ( ज्याचें कांही शिल्लक राहिलें नाहीं किंवा जो शिल्लक राहणाराही नव्हे), त्याला मुक्त असें म्हणतात. उत्तमरीतीनें शिवज्ञान करून देणारें, आनंद व कल्याण ह्या दोहोंची ही वृद्धि करणारें, हें अद्वैतशास्त्र पूर्वी शंकरांनी स्वतः पार्वतीस सांगितलें होतें; तेंच मी आतां तुला सांगितलें. इतकें सांगून तो रेवणसिद्ध गणेश्वर शिवयोग समाधि लाऊन मुकाटयानें बसला.

इतकें बोलून स्तब्ध राहून शिवयोगसमाधि लाऊन बसणाऱ्या त्या रेणुकेंश्वरास पाहून अगस्त्यऋषि हात जोडून म्हणाला— हे रेवणसिद्धा, तूं शिवरहस्य फार चांगल्या रीतीनें समजून घेतलें आहेस, तूं शिवज्ञानाचा महासागर आहेस, तुला सर्व वेद, सर्व शास्त्रें अवगत असून

तुला व्यवहारज्ञान फार चांगलें आहे. ( तूं मोठा चतुर आहेस ). तुझें दर्शन झाल्याबरोबर प्राणिमात्रांचें सर्वप्रकारचे दुःख नाहीसें होतें. तूं स्वतंत्र-पणानें वागणारा असून आनंदी स्वयंप्रकाश असल्यामुळें 'प्रत्यक्ष शंकरा-सारखा आहेस. तुझ्या मुखापासून हें निर्दोषरीतीनें अद्वैतशास्त्र उत्पन्न झालें ( तूं स्वतः सांगितलेंस ), तें ऐकून माझ्या मनास मोठा संतोष झाला व मला प्रत्यक्ष शंकराचें दर्शन झालें. आता माझ्या जन्माचें सार्थक झालें, माझ्या मनाचा सर्व संशय फिटला, माझा संसाररूप पाशां-तून सुटका झाली. आणि माझ्या तपश्चर्यांचें सार्थक्य झालें.

आतां पृथ्वीवर जितके मोठमोठे ऋषीश्वर आहेत त्यांच्यापेक्षां मी श्रेष्ठ झालों; माझ्यासारखा कृतार्थ झालेला मुनीश्वर ह्या त्रैलोक्यांत दुसरा नाहीं. हें तूं आपल्या तोंडानें स्वतः सांगितलेलें शिवाचें अद्वैतशास्त्र ऐकण्याइतकें चांगलें तपश्चर्येचें सामर्थ्य माझ्याखेरीज इतर कोणत्याही ऋषीचें नाही. मला माझ्या पूर्वपुण्यामुळें तुझ्याकडून शिवाद्वैतशास्त्र ऐंकण्यास मिळालें. माझ्या तपश्चर्यांची सफळ होण्याची वेळ आल्यामुळें व शंकराच्या कृपेमुळेंच तूं येथें आलास, तूं मोठा भाग्यशाली आहेस, तूं मला शिवज्ञानाचा उपदेश करून कृतार्थ केलेंस.

ह्याप्रमाणें नम्रतेनें स्तुति करणाऱ्या त्या अगस्त्यऋषीश्वराकडे कृपादृष्टीने पाहून तो प्रमथगणांचा श्रेष्ठ रेवणसिद्ध म्हणूं लागला. अगस्त्यऋषे, तूं सर्व ऋषीश्वरांत श्रेष्ठ आहेस, तपःसामर्थ्यानें तुझें सर्व मनोरथ परिपूर्ण झालेलेच आहेत. तुझ्याखेरीज शिवशास्त्र ऐकण्याचा अधिकारी ह्या पृथ्वीवर दुसरा कोण आहे? शिवशास्त्र ऐकण्याची योग्यता तुझीच आहे इतरांची नाही, शिवाचा प्रसाद होण्यास तूंच एक योग्य आहेस, दुसरा कोणी नाहीं. अशी माझी पक्की खातरी असल्या-मुळेंच मी तुला हें शिवरहस्य सांगितलें. अगस्त्यऋषे, तूं आतां हे शिवतंत्र सर्व जगांत प्रसिद्ध होईल असें कर. शिवज्ञान होण्याला जगामध्यें अशा रीतीचें साधन दुसरें कोणतेंही नाहीं.

हें शास्त्र फार महत्वाचें असून गुप्त ठेवण्यासारखें आहे; तरी शंकर हा सर्वज्ञ आणि सर्व जगावर कृपा करणारा असल्यामुळें सर्व जगाचे हित होण्यासाठीं त्यानें हें पार्वतीस सांगितलें. हें शास्त्र सर्व शिवसिद्धान्तशास्त्रांच्या ग्रंथांत फारच उत्तम असें मानलें आहे, वेद

आणि उपनिषदें ह्यांचें तात्पर्य आहे, विद्येची आणि सदाचाराची वृद्धि करणारें आहें. हें शास्त्र वीरमाहेश्वर लोकांनी अवश्य स्वीकारण्यासारखें आहे, व शिवाच्या अद्वैतशास्त्राची प्रसिद्धि करणारें आहे हें शास्त्र कोणास शिकविणें झाल्यास त्या शिष्यांची अगोदर सदाचरणाबद्दल परीक्षा करून मग शिकवावें; नाहींपेक्षां कधीही शिकवूं नये. हें शास्त्र ऐकिलें असतां सर्व श्रोत्यांच्या पापाचा नाश होतो. ह्या शास्त्राची लोकांत प्रसिद्धि व्हावी ह्यासाठींच मी हें पृथ्वीलोकावर आणिलें आहे. तूंही अशा रीतीच्या ह्या शिवाद्वैतज्ञानाचा प्रसार कर.

ह्याप्रमाणें वीरशैवधर्माचा निर्णय असलेल्या श्री सिद्धान्तशिखामणी ग्रंथांतील शिवैक्यस्थलासंबंधाचा नऊ प्रकारच्या लिंगांचें वर्णन असलेला हा विसावा दीप संपला.

## = दीप २१ वा =

रेवणसिद्ध मागील दीपांत सांगितल्याप्रमाणें अगस्त्यऋषीबरोबर संभाषण करून अगस्त्यऋषी त्याकडें पाहत आहेत तों त्यांच्यासमक्ष मनामध्यें शंकराचें स्मरण करीत करीत गुप्त झाला. जो कोणी हें श्रेष्ठ आणि वीरशैव लोकांस संमत असणारें शिवरहस्य एकाग्रमनानें ऐकेल तो उत्तम गतीस जाईल. असो. स्वतंत्रपणाने सदाचार पाळण्याची आवड असणारा, आपल्या इच्छेंप्रमाणें शरीर धारण करणारा तो प्रमथश्रेष्ठ रेणुकाचार्य तेथून निघून लंकानगरीस गेला. रेणुकाचार्य मोठा भाग्यवान् होता, आणि सर्व कामिकादि वातुलांत शिवागम चांगल्यारीतीनें जाणत होता, तो दैवयोगाने आपल्या घरीं आलेला पाहून बिभीषणानें आदरसत्कार करून त्यास आपल्या वाड्यात नेलें.

आणि त्यास सुशोभित रत्नांच्या सिंहासनावर बसविलें व अर्घ्य पाद्य वगैरे सर्व उपचारांनी त्याची यथाविधी पूजा केली. बिभीषणानें आदरसत्कार करून रेणुकाचार्यांची पूजा केल्यावर रेणुकाचार्यानें संतुष्ट होऊन त्यास खाली बैस म्हणून सांगितल्यावर बिभीषण त्याचेच जवळ आपल्या आसनावर बसला. व हात जोडून बिभीषण त्या रेणुकाचार्यास म्हणाला, महाराज, आपण मनुष्याच्या आकृतीचे आहां खरे तरी आपण प्रत्यक्ष दुसरे शंकर असल्यासारखे दिसतां.

रेणुकाचार्या, तूं प्रमथगणांत श्रेष्ठ आहेस, शिवज्ञानांत प्रवीण आहेस, तूं ह्या पृथ्वीवर जन्म घेऊन आलास हें मला पूर्वींच समजलें आहे. माझ्या दैवयोग चांगला म्हणून तूं मला भेटण्यास येथें आलास. जे लोक भाग्यहीन आहेत त्यांस तुमच्या सारख्यांचे दर्शन सहजरीतीनें कसें होईल ? कधींही होणार नाहीं. सर्व त्रैलोक्यांत माझ्यासारखा भाग्यवान् कोणी नाहीं. कांतर तूं प्रत्यक्ष शंकरासारखा असून माझ्या घरीं माझ्यावर कृपा करण्यासाठीं आपण होवून आलास. ही माझी लंकानगरी धन्य झाली, हा माझा राक्षसांचा वंश कृतार्थ झाला, माझ्या जन्माचें सार्थक्य झालें कां तर तूं माझ्या दृष्टीस पडलास

ह्याप्रमाणें गोड गोड बोलणाऱ्या बिभीषणाकडे पाहून रेणुकाचार्य हांसून सर्वजगास संतोष होईल अशा तऱ्हेच्या मधुर वाणीनें बोलू लागला. बिभीषणा तूं मोठा दैववान् आहेस, तूं मोठा धार्मिक (धर्माची माहिती असणारा) आहेस. तुझ्या खेरीज इतरांचे अंगीं अशी भक्ति कोठून असणार ? कधींही असावयाची नाहीं. तूं सर्व राक्षसांचा राजा आहेस, तुला सर्व शस्त्रांचे तत्व माहीत आहेत, तूं सर्व धर्मांत प्रवीण आहेस, आणि अध्यात्मविद्येंत प्रविण आहेस. तुझी धर्मावरील श्रद्धा ऐकून माझ्या मनास मोठें आश्चर्य वाटले, व त्यामुळें मी आतां कैलास-पर्वताकडे जाण्यास निघालों असतां, तुझीं भेट घ्यावीं म्हणून इकडे तुझ्या नगरीस आलों. तुझ्या लोकांत प्रसिद्ध असणाऱ्या व कल्याणकारक चरित्रांमुळे मी फार संतुष्ट झालों, तुला मी इच्छिलेला वर देतों जें पाहिजे असेल तें मला सांग.

ह्याप्रमाणें कृपाळूपणानें रेणुकाचार्य प्रमथेश्वर बोलूं लागला असतांना, त्यास नमस्कार करून मोठ्या आवडीनें बिभीषण त्यास बोलूं लागला. प्राणिमात्रांस संपत्ति मिळणें फार कठीण आहे खरे; तरीपण आगमांच्या कृपेमुळें व तुझ्या सारख्या शिवयोग्याच्या कृपेमुळें त्या सहज मिळतात. तरी पण रेणुकाचार्य गणेश्वरा, मला तुजजवळ कांहीं मागावयाचें आहे, पुण्य परिपक्वदशेस येऊन फलद्रूप झाले म्हणजे मनोरथ आपोआप परिपूर्ण होतो.

माझा वडील भाऊ रावण शिवभक्तात ( माहेश्वरांत ) श्रेष्ठ होता. त्यानें त्रैलोक्याचें राज्य केलें, परंतु त्यास विघ्न आल्याचें व शत्रु

आल्याचें मी कधीं पाहिलें नाहीं व ऐकिलेंही पण नाहीं.

त्याचा पराक्रम इतका जबर होता कीं, तो सहन न झाल्यामुळें इंद्रादिक सर्व देव आपापलीं राज्यें सोडून पळून गेले व कितीएक देव तर रावणाच्याच घरीं सेवा करीत राहिले. तो रावण कालाच्या तडाक्यांत सांपडल्यामुळें व आपल्या दुर्वर्तनामुळें विष्णूच्या अंशानें उत्पन्न झालेल्या रामाच्या हातून मरण पावला. तो रामाच्या बाणानें व्याकुळ होऊन युद्ध भूमीवर पडला असतां, व त्याचा प्राण कंठापर्यंत येऊन अडकला असतां, फक्त मीच काय तो एक जीवंत राहिलेला पाहून मजला तो कष्टी होवून दीनस्वरानें म्हणूं लागला. बिभीषणा, तूं विलक्षण बुद्धीमान् आहेस, मोठा ज्ञाता आहेस व धार्मिक आहेस राक्षसकुलांचें दैव चांगलें म्हणून तूं तरी एकटा जीवंत राहिलास हें फार चांगले झाले. अरे बिभीषणा, आम्ही अज्ञानानें व्यापलेले आहों आम्ही महासामर्थ्यवानांशीं द्वेष केला म्हणूनच अशा स्थितीस येऊन पोहोंचलों; दैवाची गति फार विचित्र आहे

मीं ह्या ठिकाणी नऊकोटि लिंगांची स्थापना करावी असा बेत केला होता; परंतु माझी अशी स्थिति असल्यामुळें, तें कृत्य माझ्या हातून शेवटास गेलें नाहीं. तरी सहा कोटी लिंगांची स्थापना मी पूर्वींच चांगल्यारीतीनें केली आहे; तीन कोटिलिंगांची स्थापना करावयाची मात्र राहिलेली आहे, तेवढी तूं करावीस ह्याप्रमाणे मरणोन्मुख झालेल्या व दीनवदन करून माझी विनंतीं करणाऱ्या माझ्या वडीलभावाचें ( रावणाचें ) बोलणें मीं, बरें आहे, मी खरोखर तुझ्या सांगण्याप्रमाणें तीन कोटि लिंगांची स्थापना करीन, म्हणून कबूल केले आहे.

एकदम तीन कोटि उत्तम उत्तम शिवलिंगांची स्थापना यथाशास्त्र करावी असा त्या वेळेपासून माझा निश्चय झाला आहे. तीन कोटि लिंगांची एकदम स्थापना करूं शकेल असा ज्ञानीं आचार्य मला मिळाला नाहीं, म्हणून मी आजपर्यंत असाच निराश होऊन बसलों. तूं शिवशास्त्र चांगल्यारीतीनें जाणतोस, तूं प्रत्यक्ष शिवज्ञानाचा महासागर आहेस; तूं माझा आचार्य होऊन मजकडून लिंगप्रतिष्ठा करवून माझे मनोरथ पूर्ण कर. असें त्या बुद्धिमान् राक्षसेश्वराचें ( बिभीषणाचें ) बोलणें ऐकून " बरें आहे " असें म्हणून त्या सर्वजाणत्या रेणुकाचार्य

गणेश्वरानें मान्य केलें.

मग लागलेंच त्या ठिकाणीं संतुष्ट झालेल्या बिभीषणाचें कल्याण होण्यासाठीं तीन कोटि शिवलिंगांचीं स्थापना रेणुकाचार्यानें शास्त्राप्रमाणें व विधिप्रमाणें आपण स्वतःच तीन कोटि आचार्यांची ( गुरूंची ) रूपें घेऊन तत्काळ केली. अशाप्रकारचें त्याचें अलौकिक सामर्थ्य पाहून बिभीषणास मोठें आश्चर्य वाटलें, व त्यानें भक्तिपूर्वक त्याचे पायांवर वारंवार नमस्कार घातले. अशा तऱ्हेनें नम्रतेनें वारंवार नमस्कार करणाऱ्या व संतुष्ट झालेल्या बिभीषणास आपल्या अलौकिक सामर्थ्यानें कृतार्थ करून तो रेणुकाचार्य गुप्त झाला. बिभीषणास देखील मोठा संतोष वाटला; रेणुकाचार्यांच्या प्रसादामुळें त्याचें मन शिवभक्तीवर पहिल्यापेक्षां जास्त दृढ झाले, व त्यानें अनेक वर्षंपर्यंत सुखानें राज्य-कारभार चालविला.

असो, इकडे तो महासामर्थ्यवान् आणि शिवाद्वैतमतावर विश्वास ठेवणारा रेणुकाचार्य कोठें कोठें गुप्त रीतीनें आणि कोठें कोठें उघड-रीतीनें पृथ्वीवर संचार करूं लागला. त्या रेणुकाचार्यानें दयारूपरसाची वृष्टि करणाऱ्या आपल्या नेत्रकटाक्षानें ( कृपादृष्टीनें ) कितीएकांस कृतार्थ केलें. कितीएकांस शिवाद्वैतास अनुसरून असणारा उपदेश करून कृतार्थ केलें. सर्वप्रकारचे दोष दूर करणाऱ्या आपल्या सहवासानें कितीएकांस कृतार्थ केलें. अशा रीतीनें ज्यांची कर्मे परिपक्व झालीं आहेत अशा सज्जनलोकांस कृतार्थ करीत. शिवदर्शनाची आवड करणारा रेणुकाचार्य आपलें सामर्थ्य सर्वांस दाखवूं लागला. त्यानें कितीएक अन्यमती पाखंडी आणि दुर्वर्तनी लोकांस जिंकून त्यांस ताळ्यावर आणिलें. कितीएक सिद्धांचे समुदाय शिवमताचा द्वेष करीत असून यंत्र, मंत्र कला वगैरे करून प्रौढि मिरवीत होते त्यांस त्यानें आपल्या सामर्थ्यानें ( चातुर्यानें ) जिंकून त्यांस शिवागमाची अभिरुचि लावून दिली. असा जागोजाग शिवसिद्धांताचा प्रसार करीत करीत रेणुकाचार्य आपल्या कोल्लिपाकि नांवाच्या नगरास परत आला.

तेव्हां तेथील सर्व शैवधर्मी लोकांनी त्याचा मोठा आदरसत्कार केला नंतर त्या सर्व मंडळीसहित रेणुकाचार्य कोल्लिपाकि नगरांतील सोमनाथाचे मंदिरास येऊन पोंचला. तेथें येतांच रेणुकाचार्यानें सर्व

शिवयोगीं लोकांसमक्ष त्यांस आश्चर्य वाटेल अशा तऱ्हेनें शिवस्तुति करण्यास आरंभ केला. हे देवाधिदेवा, आपण सर्व त्रैलोक्याचे ईश्वर आहां, सर्व जग उत्पन्न होण्याला ज्या ज्या वस्तूंची आवश्यकता असेल त्या त्या सर्व वस्तूंस आपली आवश्यकता आहे इतकीं आपली योग्यता मोठी आहे. आपलें चरणकमल ब्रम्हदेव, विष्णु वगैरे देवांचेही देव देखील वंदन करितात,

ईश्वरा, आपण संसारनाटकांतील हरएकप्रकारचें अज्ञान दूर करणारे आहां, सर्व वेद आणि उपनिषदें आपल्या महत्वाचे वर्णन करितात त्यामुळें आपलें महत्व समजलें नाहीं तर समजलें नसतें. संसाररूपरोग दूर करणारे आपण वैद्य आहां, आपण सर्वज्ञ आहां, आपण सर्वांपेक्षां शक्तिमान् असून आपल्या शक्तीस कोठेंच प्रतिबंध होत नाहीं आपण सत् चित् आणि आनंद ह्या गुणांचे मुख्यस्थान आहां, आपलें स्वरूप चिदंबर आहे.

आपण सर्व त्रैलोक्यास आधारभूत आहां, तेजोमय लिंगांत आपण राहतां, सदाशिव, शंकर वगैरे आपणास अनेक नांवें आहेत. सत्व, रजस्तमगुणांचा आपणास संपर्क नाहीं, त्यापेक्षां आपण फार श्रेष्ठ आहां, आपण मायाकार्मिकमलांचा नाश करणारे आहां, सर्वजगांमध्यें आपण पूर्णपणाने भरलेले आहां, ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद हे तीन वेद आपले डोळेच आहेत. हे परमेश्वरा, हे पार्वतीपते, आपण माझे रक्षण करा, माझे रक्षण करा. आपल्या आज्ञेप्रमाणें मी इतके दिवस पृथ्वीवर आपण सांगितलेल्या आगमांची प्रसिद्धि होण्याकरितां राहिलों इतकेंच.

शंकरा आतां ह्यापुढें मी आपल्या स्वरूपांत लीन होण्याची (सामरस्य पावण्याची) इच्छा करितो. ह्यासाठीं मजवर मोठी कृपा करून कांही अंतर (जागा) घ्या म्हणजे मी आपल्या लिंगांत प्रवेश करीन. रेणुकाचार्यांनें अशी स्तुस्ति केल्याबरोबर एकाएकीं त्या शंकर लिंगापासून " मुला ये, तुझें सामर्थ अलौलिक आहे, तुझ्या भक्तीमुळें मी तुला प्रसन्न आहे " असा मोठ्यानें शब्द निघाला तो ऐकतांक्षणीं सर्व लोकांस मोठें आश्चर्य वाटले. त्याचवेळीं आकाशांत देवांनीं दुंदुभि (नगारे) वाजविले व विद्याधरांनीं रेणुकाचार्यावर फुलांचा वर्षाव केला.

तें शंकरलिंगापासून दयाळूपणाचे निघालेले शब्द ऐकतांच रेणुकाचार्यास मोठा संतोष वाटला व तो तेजःपुंज दिसूं लागला रेणुकाचार्य गुप्त होतो असें समजतांच त्याचे दर्शन पुन्हां होणार नाहीं म्हणून त्याच्या दर्शनाविषयी उतावीळ झालेल्या शिवयोग्यांनीं त्याची फार स्तुति केली. नंतर सर्व लोकांसमक्ष रेणुकाचार्य तेव्हांच त्या तेजःपुंज व स्वयंप्रकाश सोमनाथलिंगांत गुप्त झाला.

त्या स्वयंप्रकाश सोमनाथ लिंगांत तो सुखरूप रेणुकाचार्य गुप्त झाला असतां तो अद्भुत चमत्कार पाहून सर्व लोकांस मोठें आश्चर्य वाटले व तेव्हां शैवभक्ति सर्व लोकांच्या अनुभवास आली.

हा श्री सिद्धान्तशिखामणि ग्रंथ वीरशैव लोकांस वेद आणि शैवागम ह्यांचा मार्ग दाखविणारा आहे, षट्स्थलांचा प्रकाश करणारा (षट्स्थले दाखविणारा) रत्नदीपच आहे, जीव आणि ईश्वर यांचे ऐक्य ह्या कमलांस सूर्यासारखा आहे ( सूर्य कमलांस प्रफुल्लित करितो त्याप्रमाणें हा ग्रंथ वाचल्यानें जीवाचें शिवाशीं ऐक्य होतें. ) गुप्त ठेवावयाच्या चिंतामणिरत्नासारखें महत्वाचा आहे. हा ग्रंथ जो कोणी लिहील किंवा लिहवील, ऐकेल आणि इतरांसही ऐकवील तो पुरुष निष्पाप रीतीच्या भुक्तिसुखाचा आणि मुक्तिसुखाचा उपभोग घेईल. त्याला ह्या लोकीं सुख लागून तो मरणानंतर स्वर्गास जाईल.

ह्याप्रमाणें वीरशैवांच्या धर्माचा निर्णय असणाऱ्या श्री सिद्धान्तशिखामणि ग्रंथांतील रेणुकाचार्य आणि बिभीषण ह्यांचा संवाद आणि रेणुकाचार्य शिवलिंगांत गुप्त झाला हे वर्णन असलेला हा एकविसावा दीप संपला.

## ॥ श्री सिद्धान्तशिखामणि समाप्त ॥

